# THE RÂMÂYAṆS

OF

# MOROPANT.

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)



## PART III.

Containing 7 Râmâyans.



*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

## VAMAN DAJI OKA.




PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS

BOMBAY.

1892.

*Price* 10 *Annas.*

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# रामायणें.

## भाग तिसरा.

हा

वामन दाजी ओक

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन शुद्ध केला,

आणि

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या "निर्णयसागर" छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९२.

# तिसऱ्या भागाची अनुक्रमणिका.

पृष्ठें.

# मोरोपंतकृत रामायणें.

## भाग तिसरा.

## ३२. आर्यारामायण.[1]

(आर्यावृत्त.)

श्रीरमण[2] दशरथाच्या सुरकार्यास्तव कुळांत अवतरला, ।
तें यश गातां प्राणी अगणितभवसागरीं[3] तरला. ॥ १
पंक्तिरथाची[4] महिषी[5] कौसल्या, राम नाम तत्तनया;[6] ।
हा माराया त्या जो लंघी दशकंठ मत्त नैया.[7] ॥ २
नृपदयिता कैकेयी, तत्तनुजा नाम भरत हा स्थापी, ।
याचें यश साधुसभा हृदयांत धरूनि आस्था पी. ॥ ३
सुमति सुमित्रा तत्सुत लक्ष्मण शत्रुघ्न गुणपद[8] भ्राते, ।
रामा भरता देती प्रीति गुरुजना अदभ्रा[9] ते. ॥ ४
राजा मुनिच्या[10] पुरवी देउनि सुत जेंवि ताट[11] कामातें, ।
तो त्या[12] म्हणे, 'अभय दे, मारुनि हे ताटका[13] मातें.' ॥ ५
जीची जसि मारीची[14] प्राणिक्षयहेतु[15] तत्समा रीती, ।
विश्वामित्राज्ञेनें कौसल्यावत्स मारी ती[16]. ॥ ६

---

१. आर्याछंदाचें लक्षण:—'यस्या पादे प्रथमे द्वादश मात्रास्तथा तृतीयेऽपि । अष्टादश द्वितीये चतुर्थके पंच दश सार्या ॥'. याचा भावार्थ:–'आर्या' नामक मात्रागणात्मक छंदांत प्रथमपदीं बारा तशाच तिसऱ्यांत आणि दुसऱ्यांत अठरा व चवथ्यांत पंधरा अशा मात्रा असतात. मात्रागण वृत्तांतील पहिलें जें आर्यावृत्त तदात्मक हें काव्य आहे म्हणून यास 'आद्यार्यारामायण' असें नांव दिलें आहे. २. विष्णु. ३. असंख्यसंसाररूप समुद्रांत. ४. दशरथाची. ५. राणी. ६. तिच्या तनयाला (पुत्राला) नाम राम होतें. ७. नीतीस. ८. गुणाधारस्थान. ९. विपुल. (दभ्र=अल्प.) १०. विश्वामित्राच्या. ११. अन्नपात्र. १२. रामा. १३. ताटका सुकेतु नामक यक्षाची कन्या होती. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु, असे दोन पुत्र झाले. विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकाळीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीच उडून समुद्रांत जाऊन पडला. तेव्हांपासून तो लंकेंत जाऊन राहिला. (भा० प्रा० ऐ० कोश.) १४. महामारीची. १५. जीवनाशकारण. १६. ताटका.

त्रिजगद्गुरुला गा[1]धिज शत दि[2]व्यें सद्यशोर्थ दे अस्त्रें, ।
स्वामी प्रसन्न होउनि [3]कृतकार्याला जसीं वस्त्रें. ॥ ७
सिद्धाश्रमीं प्रभु करवि विनवुनि मुनिला [4]नवा सवारंभा, ।
राक्षस वधी, जसि रुचे हे कीर्ति न [5]वासवा रंभा. ॥ ८
दे कीर्ति अहल्येतें अर्पुनि रज [6]रामपादराजीव, ।
तरले भवार्णवीं या धरुनि यशीं आदरा जीवें[7]. ॥ ९
पापीं तरावयाला धरिति प्रभुचाचि लोक वि[8]श्वास, ।
[9]जो ऐके सोडीना नामरहित तो कवि श्वास. ॥ १०
रघुपति सीतेसि वरी मोडुनि [10]पुरंरिपुधनुष्यवल्लीला, ।
दिसला मनुष्य, भासे प्रभुची न [11]मनुष्यवल्लीला. ॥ ११
दे जनक गाधिजोक्तें [12]रामावरजां तिघां तिघी [13]कन्या, ।
दशरथ होय प्रमुदित, पाहुनियां त्या [14]स्नुषा धन्या. ॥ १२
भार्गवराम महेश्वरकार्मुक-भंगें धरूनि वाटे तें, ।
क्रुद्ध प्रसन्नही तो होय महाश्चर्य वाटे तें. ॥ १३
शत्रुघ्नसहित भरता [15]मातुळ ने पुसुनि आपल्या नगरा, ।
तन्मातृदुर्मता भी नृप भीता तापल्या न [16]गरा. ॥ १४
युवराजत्व [17]गुरुमतें देवूं लागे नृपाळ रामातें, ।
मागे वरद्वय दिलें जें ती दुर्बुद्धि [18]रामा तें. ॥ १५
'मत्सुत युवराज असो, राम वसो [19]अब्द काननीं चवदा, ।
सुज्ञ महाराज! तुह्मी सत्यव्रत कीं अवश्य वदा.' ॥ १६
जनकाचें रक्षाया सत्य, निघे मुदित राम सीता, तें ।
मान्य करी लक्ष्मणही, 'वरिलि' म्हणे '[20]तेंमसी तातें.' ॥ १७

---

१. विश्वामित्र. २. अलौकिक. ३. ज्यानें कामगिरी बजाविली आहे अशा (पुरुषाला). ४. नूतन यज्ञाच्या आरंभा. ५. इंद्राला रंभा तशी न रुचे. ६. रामचरणकमल. ७. प्राणी. ८. भरंवसा. ९. जो [राम नाम] ऐके [व] नामरहित श्वास सोडीना तो कवि (शाहणा) होय. १०. त्रिपुरारिचापलतेला. मूळांतील सामासिक पदांत 'धनुष्य' असा शब्द आहे तो कोशांत आढळत नाहीं. ११. मनुष्याचेपरी वर्तणूक. १२. रामाच्या अवरजांस (अनुजांस). १३. लक्ष्मणास ऊर्मिळा, भरतास मांडवी, आणि शत्रुघ्नास श्रुतकीर्ति अशा तीन कन्या. १४. सुना. १५. युधाजित्. १६. विषा. जो नृप (राम) तापविलेल्या विषास ज्याला नसता तो त्या कैकेयीच्या दुष्ट बुद्धीला ज्याला. १७. वसिष्ठाच्या अनुमतानें. १८. स्त्री. १९. वर्षे. २०. तमोगुणमयी वृत्ति तातें (दशरथें) वरिली असें लक्ष्मण म्हणे. तमोगुणमयी कैकेयी तातें वरिली—असाही अर्थ होईल.

नमुनि गुरुजना नेसुनि **कै**केयीदत्तवल्कलें गेले, ।
नेले रथें **सु**मंत्रें, पौर [1]म्हणति 'हा वनीं केलें', ॥ १८
भेटुनि **गु**हा निषादा भक्ता, **गं**गातटीं जटा रचितीं, ।
**गु**हसचिवांच्या हृदयीं होय [2]मुनिश्री कटारचि ती. ॥ १९
फिरवुनि नृपसूतातें **गं**गा उतरूनि [3]विप्रयागातें ।
सफळ कराया जाय प्रभु पद लावि **प्र**यागातें. ॥ २०
नमुनि **भ**रद्वाजातें प्रभु वसवी [4]**चि**त्रकूटगोत्रास, ।
सोडी मुनीस जो [5]**ख**रमुखरक्षोदत्त तो त्राम. ॥ २१
सूत कथि, '**चि**त्रकूटीं झाले बा सर्व तापसा मान्य,' ।
शोकें भूप मरे तो, काय तया ताप सामान्य? ॥ २२
जन म्हणति, 'नृपें केला आपलिया आत्मघात हा हातें.' ।
शोकविषाब्धींत बुडे, बोले **सा**केत 'हा हा' तें. ॥ २३
सानुज **भ**रत **व**सिष्ठें धाडुनि अतिशीघ्र दूत आणविला, ।
राज्यार्थ यत्न केला मातेनें त्यासि जाणविला. ॥ २४
**भ**रत म्हणे, 'हा! मूढे! दूषुनि निज वंश काय गेहा हा! ।
शोकाग्नि लाविला त्वां केलें हित काय गे! हा! हा! ॥. २५
ज्येष्ठ गुणश्रेष्ठ वना **रा**म दवडिला जया सखे दास, ।
शोचिति, राज्य किति? रुचे जीवनहि न या [6]सखेदास.' ॥ २६
**कौ**सल्या समजावी **भ**रता बोधुनि [7]गुरुक्रिया करवी, ।
मग जाय **चि**त्रकूटा, तुष्टि **भ**रद्वाज दे बरवी. ॥ २७
प्रभुला वंदुनि साश्रु स्वपित्याच्या कळवि **भ**रत हा [8]निधना, ।
**रा**म म्हणे 'हा!' होतां अतिलोभी जेंवि हानि धना. ॥ २८
पिंड पित्यासि दिल्यावरि **भ**रत म्हणे धरुनि पाद, 'या [9]परतें.' ।
ऐके न [10]सत्यसंध [11]त्रिदशहितोद्यत दयापर तें. ॥ २९

---

१. लोकांनीं रामास वनास न जाण्याविषयीं आग्रह केला होता, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां ते पौर म्हणाले—'आम्ही वनीं हा केलें, आम्ही अरण्यरुदित केलें, आमच्या प्रार्थना व्यर्थ झाल्या'. २. रामाची मुनिसदृश तेजस्विता. ३. द्विजाच्या यज्ञातें. ४. चित्रकूट पर्वतास. ५. खर-प्रमुख राक्षसांनीं दिलेला. [मुख=प्रमुख; 'मुखमुपाये प्रारंभे श्रेष्ठे निःसरणास्ययोः' इति हैमः.] ६. या खिन्न भरताला. ७. दशरथाची उत्तरक्रिया. ८. मरणास. ९. हाय. १०. खरी आहे प्रतिज्ञा (संधा) ज्याची असा. (राम.) ११. देवांचें कल्याण करण्याविषयीं तत्पर.

'म्यां त्वांहि न लंघावें स्वगुरूक्त अवश्यशब्दच वदावा, ।
राज्य करीं, बा! येतों मी सरतां अब्द[1] चवदावा.' ॥ ३०
सिंहासनीं बसाया मागुनि घे पादुका, शिरीं वाहे, ।
राहे **नं**दिग्रामीं अंत्याब्दसमाप्तितें[2] पाहे. ॥ ३१
**अ**त्रिस सानुज **र**घुपति, **अ**नुसूयेचीं पदें नमी **सी**ता, ।
दे अंगराग माल्यें[3] ती सुप्रीता सतीगीता[4]. ॥ ३२
**दं**डकवनीं **वि**राधें हरिली व्याघ्रें मृगी तसी तन्वी, ।
सोडी तीतें धरि तो ते वधिती त्या महाधन्वी. ॥ ३३
**श**रभंग[5] **सु**तीक्ष्ण **घ**टज ऐसे **दं**डकवनीं तपा रचिते, ।
जे विप्र पावले सुख विभुसि पहातां अपारचि ते. ॥ ३४
गृध्रपति **ज**टायु सखा ताताचा[6] तातसाचि तो **अ**जितें ।
हर्षविला, थोरपण प्रभुचें वदवेचिना अजि! तें. ॥ ३५
**गो**दावरीवरतटीं **पं**चवटींत छदालयीं[7] राहे, ।
प्रभुतें **द**शमुखभगिनी **शू**र्पणखा[8] कामुकी पाहे. ॥ ३६
मायारूपवती ती प्रभुसि म्हणे, 'मीच सार[9] सत्य, जुनी ।
स्त्री न बरी, कुंटजकुसुम[10] चुंबि न अळि[11] सारस[12] त्यजुनी.' ॥ ३७
स्मित करुनि प्रभु सांगे, 'स्त्री आहे मज, न **ल**क्ष्मणा तरुणा, ।
जा त्या भज' वरिली जी ईतें सोडूं न दे करुणा. ॥ ३८
**ल**क्ष्मणहि म्हणे, 'वेड्ये त्यजुनि प्रभु वांछितीस कां दास? ।
प्रतिबिंबासि चकोरी न भजे सोडूनि चांदास.' ॥ ३९
पुनरपि गळां पडे ती निर्लज्जा, म्हणुनि हांसली **सी**ता, ।
क्रोधें खाया धांवे **शू**र्पणखा, होय ती[13] भीता. ॥ ४०
**रा**म म्हणे, '**सौ**मित्रे! न करू **सी**ताविनाश हे चंडी,' ।
तों **ल**क्ष्मण तत्कर्णघ्राणातें तत्क्षणीं खंडी. ॥ ४१
तद्बंधु सबळ[14] **ख**र ये माराया, त्यासि **रा**मभद्र वधी, ।
प्रभुची दुर्जनदंडी धरि करुणार्द्राहि न द्रव धी. ॥ ४२

---

१. संवत्सर. २. शेवटच्या वर्षाच्या अखेरीस. ३. उटणें व पुष्पें. ४. साध्वींनीं स्तविलेली. ५. मोरोपंती रामायणें—भाग २, पृष्ठ ९४ टीप १२ पहा. ६. दशरथाचा. ७. पर्णशालेंत. ८. ही कपटरूप घेऊन आली होती. ९. श्रेष्ठ, उत्तम. १०. कुड्याचें फूल. ११. भ्रमर. १२. कमळ. १३. सीता. १४. ससैन्य.

प्रथम [1]अकंपन राक्षस, मग शूर्पणखा कथी परिभवातें, ।
त्या दशमुखा न सोसे, विधिसह रुचलें परि [2]भवा तें. ॥ ४३
स्त्रीरत्नजनकतनयाहरण मनीं धरि, निवे, 'न हो [3]ग्रास ।
काळाचा' ऐसें त्या [4]मारीच कथी महोग्रास. ॥ ४४
त्या [5]सांगे, 'सीतेतें हरितों म्हणवावया अरिस 'हाय!' ।
मारीन तुज, न होसिल या कार्यातें जरि सहाय.' ॥ ४५
'रामशरें मरण बरें' मारीच असें स्वमानसीं आणी, ।
ये आश्रमीं, कपटमृग होय, विलोकी तया राणी. ॥ ४६
प्रभुतें म्हणे, 'धरा हा, नेऊं स्वपुरासि, चांगला, गावें, ।
हें हरिणरत्न, याचें पुर पाहूं आंग [6]लागावें.' ॥ ४७
लक्ष्मण म्हणे, 'मृग न, हा राक्षस मारीच होय [7]मायावी, ।
जी [8]ताटका [9]निवटिली त्वां ती [10]रक्षोधमा [11]या [12]वी'. ॥ ४८
सीता म्हणे, 'उगे हो! लक्ष्मणजी! काय घालितां मोडा, ।
जोडा चापीं गुण, ध्या बाण, स्वामी! न या सोडा'. ॥ ४९
श्रीराम म्हणे, 'वत्सा! सीतेचें तूं करीं [13]परित्राण, ।
मृग असतां धरिन, हरिन राक्षस जाणोनि मी प्राण'. ॥ ५०
[14]दृश्यादृश्य मृग पळे, ब्रह्मास्त्रें बाण राम जों हाणी, ।
'हा! सीते! हा लक्ष्मण!' ऐसी राक्षस वदे वाणी. ॥ ५१
मरणीं राक्षसजाति प्रकटी जी आपल्या स्वरें हाक, ।
प्रभु शंके, पतिनाशें सीताहि धरी मनीं धाक. ॥ ५२
'स्वपतिप्राणत्राणा सत्वर जा लक्ष्मणा!' म्हणे सीता, ।
सौमित्रि कथी, 'राक्षसकपट,' करी क्रोध ती भीता. ॥ ५३

---

१. रावणदूत राक्षस. रामानें जनस्थानीं राक्षसांचा वध केला हें वृत्त रावणास प्रथमतः यानें कळविलें. हा पुढें मारुतीच्या हातानें मरण पावला. २. शिवातें. ३. कवळ, घांस. ४. भाग २, पृष्ठ : टीप १७ व पृष्ठ ६९ टीप ११ पहा. ५. रावण सांगे. ६. सीता प्रभुसी म्हणे—'हा धरा; हा चांगला [आहे], हा स्वपुरासि नेऊं; हें हरिणरत्न गावें (स्तुत्यर्ह आहे, तारीफ करण्याजोगें आहे.) याचें आंग पुर (पुरस्थ लोक यांनीं) पाहूं लागावें, (पाहण्यालायक आहे; म्हणून स्वपुरासि नेऊं.') ७. कपटी. ८. भाग २, पृष्ठ ८१ टीप १२ पहा. ९. मारिली. १०. रक्षस्+अधम=नीच+राक्षस. ११. मारीचा. १२. प्रसवे. १३. रक्षण. १४. दिसला न दिसला तों.

‘तूं ज्ञातस्त्रीकाम, [1]श्रीकाम **भरत** तसा, अरे मूढा ! ।
गूढा प्रियनिरता गुरुघातकरा दुर्नयारूढा. ॥ ५४
मद्व्रत रक्षिल मज, जा, जवळ मनुष्याधमा ! नसावास.’ ।
**लक्ष्मण** निघे, न सोसे तो त्याच्या मानसा वास. ॥ ५५
‘हाय !’ [2]म्हणे ‘काय करिल? काय न गणि [3]गरण माय दे खाया, ।
घाय उरीं स्वायश तो जाय प्रभुपाय दे[3]खाया. ॥ ५६
तों ये **रावण**, [4]देवी सिद्ध करायासि देवकार्या तें ।
नेऊं दे, गृध्रेंद्रा सोसेना सेवकार्या तें. ॥ ५७
सुर म्हणति, ‘हरुं देइल हा [5]पावक काय? या तुपा सून.’ ।
सोडविली रथ भंगुनि **सीता** [6]क्षतयातुपासून. ॥ ५८
पक्ष अधर्में खड्गें दुष्ट **दशानन जटायुचे** छेदी. ।
ने **श्री**स गगनमार्गें, सन्मुनि झाले तदा [7]खेदी. ॥ ५९
**सु**ग्रीवादि विलोकुनि, कपि पांच तयांत ती सती टाकी ।
स्वालंकार [8]सपट ते, पाहुनि ‘[9]हाँ !’ बोलिले [10]नाकी. ॥ ६०
मारी ‘हाँ **राम** !’ अशा ती ‘हाँ **लक्ष्मण** !’ अशा नभीं हाका, ।
काका हंसीसी [11]**श्री** [12]त्यों सांपडली [13]गमे ना कां? ॥ ६१
**लंके**त **अशोक**वनीं नेउनि **द**शकंठ खळ तिला ठेवी, ।
देवी ‘हा **राम** !’ म्हणे, हें नामामृतचि ती सेवी. ॥ ६२
[14]लीलामानुषविग्रह **राम** प्रभु राक्षसा वधी, परते; ।
तों **लक्ष्मण** भेटे, जो [15]गुरुपदभजनेतरीं न रते. ॥ ६३
तो साश्रु नमुनि सांगे आर्येचें [16]परुष बोलणें [17]सारें, ।
प्रभु हा म्हणे, ‘सिकविलें यद्वचनें डोलणें [18]सारें, ॥ ६४

---

१. राज्येच्छु. २. लक्ष्मण म्हणे. ३. [लक्ष्मण] ‘हाय म्हणे’ [कवि म्हणतात] माय (सीता) गरण (विष) खाया दे. [तेव्हां] काय [बिचारा] करील. [तो] काय न गणि [स्वतःचें काय होईल याची पर्वा केली नाहीं.) [त्याच्या] उरीं स्वायश (अपयशरूपी) घाय [लागे.] [म्हणून, त्यानंतर] प्रभु-पाय (रामाकडे) देखाया जाय. ४. सीता. ५. अग्नि. ६. जखमी झालेल्या राक्षसापासून. ७. खिन्न, दुःखित. ८. वस्त्रसहित. ९. हाय. १०. स्वर्गस्थ लोक, देव. ११. सीता. १२. रावणाला. १३. काकाला हंसी सांपडली असें वाटत नाहीं काय? होय, वाटतें–असा काक्वर्थ येथें इष्ट आहे. १४. कौतुकास्तव सहज मनुष्यदेह (ज्याचा तो) (विग्रह=देह). १५. रामचरणाच्या भजनाखेरीज इतर विषयीं न तत्पर असे. १६. कठोर. १७. सगळें. १८. श्रेष्ठ (‘यद्वचनें’ या शब्दाचें विशेषण.)

माझ्या तुझ्याहि दैवें तद्वचनें गरळ घातलें[1] कानीं, ।
दशरथसत्कीर्तीचा केला कीं घात लेंकांनीं.' ॥ ६५
धांवुनि येवुनि पाहे तों शून्या[2] प्रभुसि ताप दे शाला[3], ।
रम्या स्थळाहि न भजे, यति जैसा पापदेशाला. ॥ ६६
बहु शोध विलाप करी स्त्रैणतसा[4] राम काननामाजीं, ।
'गोदे! कोठें ती? दे माझ्या मन कान नामा जी[5].' ॥ ६७
अग[6] नग[7] खग[8] मृग विनवी, रडवुनि करि राम दीन वाघांस, ।
न गिळी पोतमुखींचा[9] घेइल कैसा नवा वांस? ॥ ६८
वन शोधितां क्षतार्त[10] स्वपित्याचा देखिला सखा[11] पडला, ।
घडला नाश कथी तो, प्रभु पितृशोकें तसा रडला. ॥ ६९
त्याची क्रिया करि निघे, धरिला सानुज वनीं कबंधानें[12], ।
तच्छाप हरी, याचा अरिही तापे न बंधानें. ॥ ७०
बसुनि विमानीं सांगे[13] 'सुग्रीवा भेट रविसुता आधीं ।
सख्य करुनि देवांच्या कार्यातें आपुल्या साधीं.' ॥ ७१
भेटे मतंगशिष्या प्रभुपूजा आदरें करी शबरी[14], ।
ती गति पावे, यातें स्मरतांचि जसा करीश[15] बरी. ॥ ७२
प्रभु पंपासरसीतें पावे, दयितेसि आठवि, श्वास ।
सोडी उष्ण, यदंश[16] प्रतिपाळिति आठ विश्वास. ॥ ७३
मारुतिनें भेटविल्या श्रीरामें मुदितमानस ख्यातें, ।
होय सुकंठ, तयाच्या प्रभु दे बहुमान सख्यातें. ॥ ७४
सुग्रीव अलंकारांसह दावी उत्तरीय देवास, ।
त्यातें उदश्रु[17] होउनि निजवक्षीं राम दे वास[18]. ॥ ७५

---

१. गीति ६४ उत्तरार्ध व ६५ चा पूर्वार्ध यांचा एकान्वय करावा असें बरें दिसतें. अर्थ—ज्या ...च्या उत्कृष्ट (सारें) बोलण्यानें डोलणें शिकविलें, त्याच सीतेच्या बोलण्यानें कानीं गरळ घातलें! ... कारण तुझें व माझें दैव! २. निर्जन, सीतारहित. ३. पर्णशाला. ४. स्त्रीलंपटसा. ५. [हे] ...! ती कोठें आहे? [ती कोण तर] जी माझ्या नामा कान [व] मन दे=माझें नांव जी कान... व लक्षपूर्वक ऐकत असे. हें अत्यंत प्रेमाचें चिन्ह होय. ६. वृक्ष. ७. पर्वत. ८. पक्षी. ... बालकमुखींचा. १०. जखमेनें पीडित. ११. जटायु. १२. भाग २, पृष्ठ ५ टीप ३ व पृष्ठ २० ... १० पहा. १३. विश्वावसु गंधर्व. (कबंध.) १४. भाग २, पृष्ठ ५ टीप ४ पहा. १५. गजेंद्र ...ग २, पृष्ठ २९ टीप ३२ पहा.) १६. ज्याचे आठ अंश=अष्टलोकपाल. (भाग २, पृष्ठ ९० ... ६ पहा.) १७. रडत असतां. १८. वसति, स्थान.

रविसुत सुग्रीव पुसुनि नेत्रें सांत्वूनियां सखे दास, ।
'मी तुज भेटवितों स्त्री' ऐसें बोले सखेदास.[1] ॥ ७६
'दयिता[2] हरूनि जपतो अग्रज[3]हि वधावया मला वाळी, ।
भक्ता प्रणताहि जसा अतिपापाला भला वाळी.[4] ॥ ७७
तरि कपिहि मी न कांहीं गडबडलों धैर्य धरुनि बा! पाहें, ।
तूं नर, कां 'हा!' म्हणसी? हरितों त्वद्दुःख[5] बापा! हें.' ॥ ७८
त्यासि म्हणे राम, 'सख्या! हरितों त्वद्दुःख[6] सर्व मी आधीं, ।
कार्य[7] करुनि मग माजें सयश तूंही सख्या साधीं.' ॥ ७९
अतिबळवान् वासवसुत जो वानरराज दुष्टधी वाळी, ।
त्या मारी, दे राज्य, प्रेमें प्रभु भानुजा पाळी. ॥ ८०
सर्व दिशांत सतीतें शोधाया सुगळ कपिबळें प्रेषी, ।
दिक्त्रय हुडकुनि आले देखिलि न श्री न तो द्वेषी.[8] ॥ ८१
दक्षिणदिग्गत लंघुनि मासावधि कीश चिंतितां चंडा[9] ।
प्रायोपविष्ट[10] झाले, सिंधुतटीं धाकले[11] दंडा. ॥ ८२
संपाती[12] गृध्रेश्वर भक्ष्यार्थ महेंद्रनगगुहा सोडी, ।
भक्षीन म्हणे, 'कपि हे याच्या मांसीं असे गोडी.' ॥ ८३
'मेला धन्य जटायु श्रीरामाच्या करूनियां कार्या, ।
आम्ही व्यर्थचि मरतों, प्रभुची न विलोकिली भार्या.' ॥ ८४
ऐसें अंगद बोले, स्वावरजजटायुमृत्यु[13] जाणून, ।
संपाती वृत्त पुसे, शोकें नेत्रांत तोय आणून. ॥ ८५
अंगद सविस्तर कथी 'प्रियसखदशरथसुतप्रियाहरण, ।
करि रावण, तत्खङ्गें जटायुला जाहलें मरण.' ॥ ८६
ऐकुनि अत्यप्रिय तें गृध्रेश्वर शोकमग्नधी[14] होय, ।
तो यत्नें मन आवरि, अनुजा दे सागरीं तोयें[15]. ॥ ८७

---

१. खिन्न झालेल्या रामाला. २. बायको. (तारा.) ३. वडील बंधु. ४. वर्जी. ५. तुझें सीतावियोगरूप दुःख. ६. तुझें दयितापहार आणि राज्यनाश यांपासून झालेलें दुःख. ७. सुग्रीवा. ८. शत्रु. (रावण.) ९. हें दंडा याचें विशेषण. चंडा दंडा=भयंकर शासनाला. १०. अन्नोदकादि सर्व विषय परित्यागून मरण येईपर्यंत ईश्वरस्मरण करीत एकासनीं बसलेले असे (कीश=वानर.) ११. भ्याले. १२. संपाति=हा जटायूचा ज्येष्ठ बंधु. १३. स्व+अवरज+जटायु+मृत्यु=आपला धाकटा बंधु जटायु याचा मृत्यु. १४. शोकांत बुडाली आहे धी (बुद्धि) ज्याची असा. १५. उत्तरक्रिया करी.

शतयोजनाब्धिपारीं लंकेंत दशाननें हृता आहे ।
सीता, सुदूरदर्शी गृध्र म्हणुनि हा तितें पाहे. ॥ ८८
'कपिहो! वधी अधमें ज्या काळीं देवराज वृत्रास, ।
आम्हांपासुनि भंगें पावे तो वज्रभृत् त्रास. ॥ ८९
सूर्याकडे बळमदें आम्ही भ्राते उडोनि जों गेलों, ।
रविच्या उग्रें तेजें व्याकुळ दोघे नभीं केलों. ॥ ९०
पोटाखालीं धरिला म्यां अनुज जटायु कीं म्हणे 'रक्ष.' ।
पक्ष जळाले माझे, जैसें दावानळें कक्ष. ॥ ९१
पडलों याचि महेंद्रीं, मजला मद्बळचि ताप दे, वांचे ।
जीवित, वाटे झाले पतिभंगीं शाप देवांचे. ॥ ९२
वारुनि ताप निशाकरमुनि सांगे या नगीं असाचि रहा, ।
रामप्रभुहि म्हणेल स्त्रैण नर जसा तसा चिर 'हा !' ॥ ९३
तद्दूत श्रीसीताशोधा येतील ऋक्ष कपि योध, ।
त्या अतिचिंतार्तांतें जेव्हां कथिसील तूं शोध; ॥ ९४
तेव्हां तत्काळ तुझे फुटतिल हे दग्ध पक्ष नव दोन, ।
गेला आणिक कांहीं तो सुतपोदक्ष न वदोन. ॥ ९५
सीताप्रवृत्ति कथिली, कपि हो! मज पक्ष हे पहा आले.' ।
ऐसें कथुनि रडे तो, अंगदमुख हरि सुखी झाले. ॥ ९६
'अतिदुर्घट शतयोजन सिंधुविलंघन, सचिंत कपिलक्ष; ।
जाइन, येणें नुमजें' वाळिसुत असें वदे दक्ष. ॥ ९७

---

१. इंद्र. (रामायण–किष्किंधाकांड, अध्याय ५७, श्लोक ४ पहा.) २. इंद्रानें वृत्रासुराला जेव्हां ारलें तेव्हां त्याचा पराभव करण्याच्या हेतूनें संपाति व जटायु यांनीं उड्डाण करून इंद्राला जिंकिलें अशी कथा आहे. ३. संपाति आणि जटायु. ४. वणव्यानें. ५. तृण, गवत. ६. याच महेंद्रीं पडलों. ाद्बलचि तिला ताप दे; [माझें] जीवित वांचे. देवांचे पतिभंगीं शाप झाले, असें मला [संपातीला] ाटे. पतिभंगीं=इंद्राचा संपातीनें भंग केला होता त्यामुळें, देवांचे शाप झाले असावे, असें त्याला ाटलें. ७. चंद्रऋषि. ८. हाय. ९. उत्तम तपश्चर्यारत. १०. वातमी. ११. अंगदप्रमुख. १२. वानर. १३. शतयोजन सिंधुविलंघन अति दुर्घट [असें समजून] लक्ष कपि संचित (बसले) [तेव्हां] क्ष [असा] वालिसुत (अंगद) [मी] जाईन [समुद्राच्या पलीकडे पण] येणें (परत येणें) नुमजें. माझ्यानें होईल किंवा नाहीं हें मला कळत नाहीं) असें वदे. पलीकडे जाण्यापुरती शक्ति आहे ण परतण्याचें सांगवत नाहीं.

त्या **जां**बवान् म्हणे, 'बा! तूं स्वामी, राजपुत्र साजावें, ।
त्वां आज्ञा करुनि यशें [१]प्रेष्यजनें साहसा जावें.' ॥ ९८
**मा**रुतितें स्तवुनि कथी अत्यद्भुत [२]जन्म कर्म [३]ऋक्षप हा, ।
'बा! तूं वसंत, सफळचि करिसिल संकल्पवृक्ष पहा. ॥ ९९
प्रभुचें कार्य करावें बा! त्वां न घडावयासि [४]कुत्सा हें.' ।
ऐसें म्हणतांचि उडे **वा**तात्मज वीर उत्साहें. ॥ १००
त्या **अं**जनातनूजा [५]प्रभुमार्गण **ग**रुड पवनवेगा ते ।
गाती धांवत येउनि आनंदें नवनवे गाते. ॥ १०१
द्याया [६]विश्राम उठे **मै**नाकाचळ, तया उरें ताडी, ।
मानुनि विघ्नस्तंभा [७]स्तंबेरमसा तळीं पाडी. ॥ १०२
शतयोजन मुख पसरी [८]**सु**रसा, त्यामाजि मग समा [९]नवती ।
गावें स्वतनु [१०]तनु करुनि शिरुनि निघे, देव [११]मानवती. ॥ १०३
छाया धरूनि वोढी यासि गिळी **सिं**[१२]हिका, तिला मारी, ।
सागरपारा पावे, हें कर्म नसे तया भारी. ॥ १०४
**लं**काधिदेवतेतें भंगुनि रजनीमुखीं पुरीं शिरला, ।
अंतःपुरांतही तो **सी**ता शोधावया फिरला. ॥ १०५
होउनि सचिंत **ह**नुमान् हुडकी, अंतीं **अ**शोकवन उरलें, ।
त्यांत **श्री**तें पाहे, सरलें भय, इष्ट तें पुरलें. ॥ १०६
तों **रा**वण ये **श्री**तें प्रार्थाया, कपि वनीं दडाला, [१३]हो! ।
अरिस सती धिक्कारी, 'नाश' म्हणे 'तुज [१४]जडाला [१५]हो.' ॥ १०७
तो राक्षसींस सांगे, 'बोध करा, [१६]मासयुग असे अवधी, ।
मग मानुषी मला द्या खाया, हे जरि नव्हे [१७]नवधी. ॥ १०८
[१८]तो कोठें? [१९]हे कोठें? त्या नरतेजें पहा कसी उडती? ।
त्यजुनि सुख, दुरभिमानें मुग्धा दुःखीं बळें बुडती.' ॥ १०९

---

१. पाठविण्यास योग्य अशा सेवकजनें. २. मंत्ररामायण—किष्किंधाकांड गीति १३५-१३९ पहा. ३. जांबवान्. ४. निंदा. ५. रामबाण. ६. विश्रांति. ७. हत्तीसा. ८. भाग २, पृष्ठ १२ टीप १५. ९. नव्वद. नवती गावें समा स्वतनु=नव्वद गांवा एवढें आपलें शरीर=अति विस्तृत देह. १०. बारीक. ११. स्तविती. १२. भाग २, पृष्ठ १२ टीप १६. १३. अहो. १४. मूर्खीला. १५. होऊ. १६. दोन महिने. १७. नूतन मति जिची (जिच्या मतींत फरक पडतो अशी.) १८. राम. १९. सीता.

तो जातां [1]रात्रिचरी म्हणती, 'सीते,! न [2]संप, [3]दारा हो, ।
राज्याची तज्जीवित भोगाया संपदा राहो.' ॥ ११०
सीता म्हणे, 'रहा गे! दासींनीं [4]भव्य काय सांगावें? ।
हंसींनीं निजहंसा काकींनीं वायसां गावें.' ॥ १११
दासी म्हणती, 'म्हणत्ये राजाहुनि अधिक कीं नरा, खावी, ।
मोटी खोटी कोटी, प्रभु निंदी, हे न राखावी.' ॥ ११२
त्रिजटा म्हणे, 'कुमति हो! वांचा, साध्वीस हात जोडून, ।
म्यां [5]स्वप्न देखिला दशमुख मरतो धर्म सोडून.' ॥ ११३
[6]उद्बंधनें मराया [7]वेण्युद्ग्रथनें सती गळा बांधी, ।
कां धीर कपि उपेक्षिल? तुटली आशा पुन्हां सांधी. ॥ ११४
प्रभुतें स्तवूनि वंदुनि मुद्रा दे कुशळ वृत्त आयकवी, ।
[8]तच्चूडामणि घेउनि, पुसुनि निघे वीरराय [9]कवी. ॥ ११५
[10]वन मोडी, वनपाळप्राण हरी काळसा, महाबळ [11]हीं, ।
कलहा करि, वधि अक्षा, बहु मथिले, बोलिले खळ '[12]हीं.' ॥ ११६
घननादब्रह्मास्त्रा दाटुनि घे सांपडोन बांधून, ।
नेती सभेसि म्हणती, 'खावा हिरवा, न रांधून.' ॥ ११७
पुसतां कथी दशास्या, 'शूर्पणखाघ्राणकर्ण कापविता ।
खळहंता मत्स्वामी श्रीराम खळांसि तापविता, ॥ ११८
मी वातसुत हनूमान् दूत, श्रीजानकी पहायास ।
आलों, देखुनि धालों, [13]सार्थक झाला [14]महायास. ॥ ११९
प्रभुचें स्त्रीरत्न तुवां बहुधा न कळोनि आणिलें चौर्यें, ।
शौर्यें राम अधिक, दे, मरसील स्पष्ट तूं क्रौर्यें.' ॥ १२०
या वाक्यें [15]पुत्रवधें [16]वनबळभंगें अरी करी क्रोध, ।
मारुतिस म्हणे, 'प्रभुला करिसी तूं माकडा! बोध. ॥ १२१

---

१. राक्षसी. २. मरण पावूं नको. [पुढें गीति २०६ पहा.] ३. बायको. ४. कल्याण. ५. 'स्वप्न' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ६. गळफांसानें. ७. वेणीच्या वर बांधण्यानें. ८. त्या सीतेचें शिरोभूषण. ९. सुधी, पंडित. १०. अशोकवन. येथें 'वन' शब्दाच्या वाच्यार्थाचें ग्रहण न करतां लक्षणेनें लक्ष्यार्थ जो (वृक्ष इत्यादि) त्याचें ग्रहण केलें आहे. ह्या शब्दव्यापारास लक्षणावृत्ति असें नांव आहे. ११ मारुति. १२. हाय. १३. सफळ. १४. मोठा श्रम. १५. अक्षवधानें. १६. अशोकवन आणि राक्षससैन्य यांच्या नाशानें.

मी सर्वरत्नभोक्ता, विषयीं शक्र स्मरोनि न रते जा[1].' ।
त्या मज विश्वप्रभुला भिवविसि वर्णूनि नरतेजा.' ॥ १२२
क्षोभे, बडबड करि, घे त्या मारायासि खड्ग पूतातें, ।
साधु बिभीषण विनवी, 'बा! मारावें न दूतातें.' ॥ १२३
तो राक्षसांसि सांगे स्नेहार्द्रपटें[2]करूनि पुच्छातें, ।
वेष्टुनि पेटवुनि पुरीं फिरवा, द्या दंड तुच्छातें.' ॥ १२४
केलें तसेंचि अरिंनीं कीश मनीं स्पष्ट दुष्ट तो हांसे, ।
कां सेना हर्षेना न गणुनियां मृत्युचे फांसे ? ॥ १२५
होय प्रदीप्त, सीतासंप्रार्थित वातसख[3] न या[4] पोळी, ।
होळी करि लंकेची हरि[5], कर तो दुष्टधी[6] चोळी. ॥ १२६
मारुति म्हणे, 'बिभीषणगृह रक्षीं, दे सुतासि वर कडबा, ।
लंकेसि करीं दहना तुज दिधले सर्व वरकड बा!' ॥ १२७
विझवी पुच्छ समुद्रीं लावुनि म्हणवावया अरिस 'हाय !' ।
लंघुनि सागर भेटुनि ते सर्व सुखी करि सहाय[7]. ॥ १२८
राजप्रियमधुवन[8] तें मार्गीं सुसमृद्ध लागलें लुटिलें, ।
कुटिलें बळ[9] दधिमुखसह[10], वनपाळें कळविलें कुटिलें[11]. ॥ १२९
कृतकार्य असें समजुनि सुग्रीवें सैन्य शीघ्र आणविलें, ।
मारुतिनें चूडामणि देउनियां भव्य[12] जाणविलें. ॥ १३०
आलिंगन दे प्रेमें श्रीराम प्रभु उठोनि भृत्यातें, ।
वर्णी असकृत्[13] त्याच्या हरेषुच्या[14] तेंवि कृत्यातें. ॥ १३१
देवांशर्क्षकपिबळें[15] घेउनि गेला समुद्रतीरातें, ।
शरण बिभीषण आला ससचिव लोकैकवीरातें. ॥ १३२
अपमानिला दशास्यें, 'सीता द्यावी' नमूनि वदला हें, ।
नमितांचि म्हणे त्यातें प्रभु, 'लंकाराज्यपद लाहें.' ॥ १३३
आधीं मनुष्य मानी[16], अस्त्रें तापोनि सिंधु कर जोडी, ।

---

१. ज्या. २. तेलानें भिजविलेल्या वस्त्रानें. ३. अग्नि. ४. या मारुतीला. ५. वानर. (मारुति.) ६. कुबुद्धि रावण चडफडे. ७. साहाय्य करणारे मित्र. ८. सुग्रीवास प्रिय असें किष्किंधासमीपस्थ वालीचें उद्यानवन. ९. सैन्य मारिलें. १०. दधिमुख हा रामसैन्यांतील एक वानर. हा वालीच्या मधुवनाचा रक्षक होय. ११. वांकड्यानें. ('वनपाळें' या शब्दाचें विशेषण.) १२. कल्याण. १३. वारंवार. १४. हरबाणाच्या. १५. देवांचे अंश जे ऋक्ष (अस्वल) आणि कपि (वानर) त्यांचीं सैन्यें. १६. सिंधु रामाला आधीं मनुष्य मानी—असा अन्वय.

'नळ करु सेतु, धरिन मी' म्हणतांचि प्रभु तया[1] सोडी. ॥ १३४
पांचा दिवसांत रचुनि शत योजन सेतु उतरला पारीं, ।
तीं तत्व[2] यामकाळें[3] सिंधुसि लंघिति बळें सारीं. ॥ १३५
प्रभु चढुनि सुवेळाग्रीं लंकेतें, कपिचमूसि अरि पाहे, ।
प्रथमचि सुगळ तयातें भंगी, तदघा[4] न तो साहे. ॥ १३६
प्रभु निजबळें पुरीतें वेढुनि, सामार्थ[5] अंगदा प्रेषी, ।
राक्षस चार वधुनि ये, मारित होताचि या द्वेषी[6]. ॥ १३७
दारुण रण प्रवर्ते, कपिराक्षस नाश पावले कोटी, ।
मोटी हानि न मानी, खळबळ काळाननीं[7] लोटी. ॥ १३८
सेनापति प्रहस्त प्रथम मरे, तो दशास्यही भंगे[8], ।
ती प्रभुची कीर्ति म्हणे, 'मत्सम धवला[9] न तूं गंगे!' ॥ १३९
मग घनरव मायावी[10] अहिपाशांनीं[11] मथूनि सेनातें ।
करि बद्ध दाशरथि, घे यश जें कोणाहि येना तें ॥ १४०
ती पुष्पकांत[12] वाहुनि रावणवाक्यें[13] सती[14] रणीं नेली, ।
मूर्छित रघुवीरांच्या शोकें श्री घाबरी केली. ॥ १४१
त्रिजटा सांगे, 'दोघां वीरांच्या तेज आननीं आहे, ।
वैधव्यदोप नाहीं, तरिच तुज विमान हें बाहे[15].' ॥ १४२
केली रावणपुत्रें घननादें नागपाश हे माया[16], ।
नाहीं त्वत्सौभाग्या रणदहनीं नाश हेमा[17] या.' ॥ १४३
त्रिजटेनें सांत्वुनि ती देवी नेली पुन्हा अशोकवनीं, ।
झाला शोक तिला जो माझ्या[18] तों ये न तो कवनीं. ॥ १४४
गरुड हरी नररूपप्रभु[19]फणिपाशवणव्यथा राज्या ।
होय सुख, तया त्रिजगीं रामावांचुनि न थारा ज्या. ॥ १४५

---

१. सिंधुला. २. खरोखर. ३. प्रहर भरांत, एका प्रहराच्या अवकाशांत. ४. त्याच्या पापाला. ५. सख्य करण्यासाठीं. ६. शत्रु—रावण. ७. यमाच्या आननीं (मुखांत). ८. पराभव पावे. ९. शुभ्र. १०. कपटी. ११. रामायण—युद्धकांड—सर्ग ५० श्लोक ३५-४० पहा. १२. पुष्पक हें कुबेराचें कामगामी विमान. हें रावणानें त्याचा पराभव करून आणलें होतें. १३. रावणाच्या आज्ञेनें. १४. सीता. १५. बोलावी. १६. कपट. १७. सुवर्णा. या त्वत्सौभाग्या हेमा रणदहनीं नाश नाहीं—असा अन्वय. १८. माझ्या (मोरोपंताच्या). १९. मनुष्यदेह धारण करणारा जो प्रभु राम त्याला नागपाशांनीं बद्ध केल्यामुळें झालेल्या जखमांचें दुःख.

दाशरथि बहु [1]बळक्षय करिति, तदा सर्वमारणा जागा ।
घटकर्ण करी, दशमुख सांगे, 'हो पारणा, जा, गा!' ॥ १४६
तो मारीतचि सुटला [2]अतिभीषण अद्रिसा [3]महाकाय, ।
पळति कपि म्हणति, 'काळ [4]प्लवगाशनकाम हा [5]काय?' ॥ १४७
मूर्छित कपिराजातें धरि, परते कुंभकर्ण असहाय, ।
म्हणवी सुरांसि त्याचा [6]अत्यद्भुत वीररस 'हाय!' ॥ १४८
सावध होऊनि सुटे, तत्कर्ण घ्राण [7]कीशहीर [8]हरी, ।
'जय जय' ऐसें वदले देवहि केवळ न, वीर [9]हरी. ॥ १४९
जो सुरपराभव करी, बहुत विटंबी रणीं [10]हरीश तशा, ।
परते [11]परें तेजस्वी सगळें गिळि संहरी शतशा. ॥ १५०
तरुनीं गिरिशिखरांनीं गिरिनीं ताडिति तयासि कपि कोटी, ।
वरि पडतांही न गणी शक्ति असी [12]यातुची मोटी. ॥ १५१
जैसा सुग्रीव बळा झाला प्रेक्षकहि सर्व तापविता, ।
प्रभुवरशर धरिति तया भेदाया पर्वता [13]पविता. ॥ १५२
जे[14] बाहु पाद मस्तक घटकर्णाचे रघूत्तम छेदी ।
ते दीर्घकाळ चुरिती कपि करिति करीश्वरा खेदी. ॥ १५३
बंधुवधें 'हाय!' म्हणुनि केले अन्याय आठवी राजा, ।
रडत म्हणे 'न, न वधितां लोकाधिप आठ वीरा[15]! जा.' ॥ १५४
स्वपराक्रम कथुनि तया तत्सुत घननाद धैर्य दे, वारी, ।
तो सबळ दाशरथि करि मूर्छित [16]मायाज्ञ देवारी. ॥ १५५
धुंडिति बिभीषणपवनसुत रात्रीं पुसति ऋक्षपा जीना[17], ।
तो कथि, '[18]जीवन मारुति कां [19]श्रितसुरवृक्ष पाजीना?' ॥ १५६

---

१. सैन्याचा नाश. २. फार भयंकर असा. ३. स्थूल देह. ४. प्लवग+अशन+काम=वानरभक्षणेच्छु. ५. प्रश्नार्थक अव्यय. ६. लोकोत्तर पराक्रम. ७. वानररत्न. ८. हरण करी. ९. वानर. १०. वानराधिप. ११. शत्रु. १२. राक्षसाची. १३. वज्रता. १४. रघूत्तम घटकर्णाचे जे बाहुपाद मस्तक छेदी, ते कपी दीर्घकाळ चुरिती, व करीश्वरा खेदी करिती—असा अन्वय. रामानें कुंभकर्णाच्या ज्या बाहुपादमस्तकांचा छेद केला, ते अवयव इतके प्रचंड होते कीं, त्यांनीं वानरांचा दीर्घकाळ चुराडा केला, व ऐरावतासारख्या धिप्पाड बळवान् जनावरांस सुद्धां बेजार केलें. १५. 'हे वीरा कुंभकर्णा! आठ जे लोकाधिप (दिक्पाल) आहेत यांना मारल्याखेरीज तरी जाऊं नको' असें रडत राजा रावण म्हणे. १६. कपट जाणणारा घननाद. १७. वृद्धा. १८. उदक. १९. आश्रितांस कल्पवृक्ष असे रामलक्ष्मण.

धाडी महौषधींतें कैलासानिकट वृद्ध आणाया, ।
आणी शिखरचि, गुंते कवि[1] जाणाया न खाणाया. ॥ १५७
झाले विशल्य निर्व्रण निर्मोह[2] अशेष ते शिखरवातें, ।
भीतें पक्षिपतीच्या अतिदारुणही विख रवांतें[3]. ॥ १५८
तें शृंग स्वस्थानीं स्थापुनि आला पुन्हा, तदा सुर[4] यां ।
वर्णिति, म्हणति, 'असावी अतिवृद्धि तुझ्या सदा सुरया[5]'. ॥ १५९
सुत बंधु सचिव मेले, उरला घननाद मत्त मायावी, ।
'सीता' म्हणे 'पितृकरा[7], सोडुनि रघुसत्तमा, यावी.' ॥ १६०
मायामयी जनकजा युद्धीं रघुवंशनंदना दावी, ।
मारी, म्हणे, 'यमगृहीं हे[9] चिर रे! मंद! नांदावी.' ॥ १६१
शोकार्णवांत बुडवी हनुमत्सुगळादि लक्ष मायावी[10], ।
तों ये बिभीषण म्हणे, 'भ्रांति जडा[11] अक्षमा[12] यावी. ॥ १६२
हें घनरवकृत कपट, स्वस्था आहे सती, अहो! माया[13] ।
कां नुमजा प्रभुजी! त्यां[14] द्यावा अवसर न होमाया[15]. ॥ १६३
ब्रह्मवरें साश्व रथ प्रकटाया होम तो[16] करायाला ।
गेला, अमरचि होइल, आटेल न लोकरायाला.' ॥ १६४
लक्ष्मण बिभीषणानें नेला, मग देवसत्तमा रविला ।
आनंद कुलजविजयें व्हाया, तो मत्त मारविला. ॥ १६५
देवी निकुंभिला[17] ज्या स्थानीं, तेथेंचि लक्ष्मणें मथिला, ।
'हाय!' म्हणे रावण हा सुतघात जसा चरें[18] कथिला. ॥ १६६
शमला पराभवज्वर निःशेष महाबळारिच्या[19] पातें, ।
हर्षोनि लक्ष्मणाच्या बहु गाय बळारि[20] चापातें. ॥ १६७
सर्वस्वविनाशाचें कारण सीता असें मनीं पाहे, ।
साहेना भंग, निघे श्रीघाता असि[21] करीं वाहे. ॥ १६८
त्या असिधरासि पाहुनि होय अशोकीं महासती भीता, ।

---

१. ज्ञाता मारुति औषधी जाणण्यास अथवा खणण्यास गुंतला नाहीं. २. मूर्च्छारहित. ३. शब्दातें. ४. देव. ५. मारुतीला. ६. उत्तम वेगास. ७. रावणाच्या हातास. ८. खोटी, कपटानें केलेली. ९. सीता. १०. कपटी. (घननाद.) ११. मूर्खा. १२. असमर्था. १३. कपट. १४. घनरवाला. १५. यज्ञ करण्यास. १६. घनरव. १७. निकुंभिल स्थानाची देवता. येथेंच इंद्रजितानें यज्ञ आरंभिला होता. १८. दूतें. १९. इंद्रजिताच्या. २०. इंद्र. २१. खड्ग.

सीता आठवि हृदयीं गजवरवरदा[1] जगद्गीता[2]. ॥ १६९
त्या तन्मंत्री वारी, 'रामवधें होय वध इचा, राहो ।
स्त्रीघात, तुम्हीं सुज्ञ प्रभुजी! न परा विचारा, हो!' ॥ १७०
परते पर तेथून प्रेषी चतुरंगिणी[3] चमू, हानी ।
प्रभुची करावया ती वधिली प्रभुशरसमूहांनीं. ॥ १७१
बहुकोटि सैन्य मथितां आपणचि निघे रणा दुरभिमानी, ।
दुर्बुद्धि आपली जी तीतें जड तो सुरभि[4] मानी. ॥ १७२
कथिति महोत्पात, 'रहा, रे! काळाचा हठें नें[5] हो ग्रास,' ।
साम न करि, रामप्रभुतेजा न गणी महोग्रास. ॥ १७३
दारुणतर समर करी सौमित्रिस शक्तिनें उरीं ताडी, ।
पाडी मूर्छित कपिबळ खळ बहु काळाकडे धाडी. ॥ १७४
लक्ष्मणपतनें क्षोभे, बळ मथुनि करी दशास्य भंगातें ।
काढुनि शक्ति म्हणे, 'हां[6]!' प्रभु आलिंगुनि तदंगातें. ॥ १७५
करि बहु विलाप राम, प्रभु मारुतिच्या मुखांबुजा[7] लक्षी, ।
तोंचि शिखर[8] तें आणी, भक्तोत्तम लक्ष्मणा रक्षी. ॥ १७६
दिव्यौषधिरसनस्यें[9] उठवी त्यातें सुषेण, हा जागा ।
निर्व्रण[10] होय, विभु म्हणे, 'शृंग पुन्हां पाव, बा! जा, गा!' ॥ १७७
प्रभु आपणासि बर्ही[11] मीन, तया मेघ तोयराशि वदे, ।
ऐसा व्यसनीं न पिता काय सखा सोयरा शिवें[12] दे?. ॥ १७८
करिति[13] समरयज्ञाच्या निववाया दृष्टिकान आरंभा ।
त्या वीररसासि शचीही करि, करि कां न आ रंभा? ॥ १७९
निज रथ सारथि[14] धाडी शक्र, अहोरात्र सप्त रण अरिसीं ।
करि, जेंवि सिंधुरासीं[15] सिंधुर[16] कीं हरि[17] जसा हरिसीं. ॥ १८०

---

१. गजेंद्राला वर देणाऱ्या (रामाला–विष्णूला.) २. जगतानें स्तविलेला. ३. अश्वरथगजपदातियुक्ता. ४. कामधेनु. ५. न होवो. ६. हाय. ७. मुखकमला. ८. ओषधीपर्वताचें शिखर. ९. उत्तम औषधींचा रस तेंच नाकांत घालण्याचें किंवा ओढण्याचें औषध तेणेंकरून. नस्य=नाकाचे द्वारा द्यावयाचें औषध; नस्याचे तीन प्रकार आहेत. [वाग्भट–अध्याय २० पहा.] १०. क्षतरहित. ११. मोर, मासा. १२. कल्याण. १३. दृष्टि [व] कान निववाया (शांत तृप्त करण्याकरितां) समरयज्ञाच्या आरंभा करिती. त्या वीररसासि शची ही आ करि [मग] रंभा आ कां न करि? १४. मातलि. १५. हत्तीशीं. १६. हत्ती. १७. सिंह.

श्रीराम रावण रणीं झाले क्षतजार्द्रदेह[1] शस्त्रांहीं, ।
अस्त्रांहीं इतरेतर झांकिति हे जेंवि वस्त्रांहीं. ॥ १८१

दशवदनशिरें शत जीं प्रभुबाणांहीं रणांगणीं तुटलीं, ।
सुटलीं न धडापासुनि, ऐसीं गमलीं नवीं फुटलीं. ॥ १८२

प्रभुला चुकतें लक्ष्य स्वास्त्रबळविपर्ययें असें गमलें, ।
श्रमलें भुजयुग, किंवा तें पाहुनि सुरमन[2] भ्रमलें. ॥ १८३

तों घटजमुनि प्रकटे, त्याच्या नमि कपटमनुज[3] पायाला, ।
तो योगीश्वर सांगे 'सूर्यहृदयमनु[4]' जपायाला. ॥ १८४

जपतां हृदय रवि म्हणे, 'चिंता करितोसि कां महाबाहो!?[5] ।
माझ्या वरप्रसादें पूर्ण तुझा काम हा बा! हो[6].' ॥ १८५

ब्रह्मास्त्रें[7] अभिमंत्रुनि शर मग जगदीश[8] शत्रुवरि सोडी, ।
त्या अत्यंतकठोरा परमशठोरा[9] पळें फोडी. ॥ १८६

तो पाडिला प्रभुशरें, पाडावा प्रबळ तरु जैसा[10] वातें, ।
'केलें जें' विश्व म्हणे 'भूतद्रोही[11] नसावा तें.' ॥ १८७

त्या अत्यद्भुत विजयीं सुरदुंदुभिराज[12] वाजला, गाया ।
यश नारदमुनि लागे, अमृतरसा लाज[13] लागाया. ॥ १८८

केल्या देवर्षींनीं दिव्य कुसुमवृष्टि राघवावरि, त्या ।
पाहुनि ज्या मेघांच्या त्या झाल्या लघवा वरिल्या. ॥ १८९

करि सुरवृंद[14] प्रभुचें, श्रुतिवृंद[15] जसें तयासम स्तवन, ।
प्रभु तो वसंत शोभवि तें करुनि दया समस्त वन. ॥ १९०

सुर मुनि मयूर चातक मेघ प्रभु अप्सरा विजा लास्यें[16] ।
हास्यें करिति, निववित्या प्रभुच्या चंद्राधिकें आस्यें[17]. ॥ १९१

सांगुनि बिभीषणाला प्रभु बरवी रावणक्रिया[18] करवी, ।
हरवी नरक, हितकरी सद्रस माता बळें भरवी. ॥ १९२

---

१. क्षतजानें (रक्तानें) आर्द्र (ओले) देह ज्यांचे असे. २. देवांचें चित्त. ३. कपटानें मनुष्यरूप घेतलें ज्यानें तो. (राम.) ४. 'आदित्यहृदय' नामक मंत्र. [युद्धकांड–सर्ग १०५ श्लोक २७.] ५. युद्धकांड–सर्ग १०५ श्लोक ३१ पहा. ६. होवो. ७. युद्धकांड–सर्ग १०८ पहा. ८. जगताचा प्रभु. (राम.) ९. परम+शठ+उर=परमधूर्ताचें वक्षस्थळ. १०. हें उपमेचें उदाहरण आहे. ११. जीवद्वेषी. (रावण.) १२. देवांचा मोठा नगारा. १२. लघुत्वा, अल्पत्वा. १४. देवांचा समूह. १५. वेदांचा समूह. (चार वेद.) १६. नृत्यें. १७. मुखें. १८. युद्धकांड–सर्ग १०९ पहा.

[1]राज्यपदीं बैसविला दास **बि**भीषण महादयानिधिनें, ।
अभिषेक करविला, निज [2]अनुजा सांगोनियां विधिनें. ॥ १९३
श्री**सी**ता [3]दिव्य करी, भेटे प्रेमें [4]पिता जसा पहिला, ।
सांगे, 'सुखवी [5]महिला, रक्षी धर्में नयें [6]महिला.' ॥ १९४
[7]शक्रें 'वर माग' असें म्हणतां मागीतला [8]जगद्धटकें ।
'[9]कटकें उठीव;' उठल्या, मरण क्षण भासलें लटकें. ॥ १९५
प्रार्थी प्रभुसि **बि**भीषण 'पूजा घेऊनि शुचि करीं [10]धाम.' ।
'[11]सबळ**सु**गळपूजेनें बा! पूजित मी' म्हणे **रा**म. ॥ १९६
'अवकाश अल्प उरला, दूर पुरी, अवधि लंघितां **भ**रत ।
सानुज मरेल, आहे समयीं मद्दर्शन स्मरत.' ॥ १९७
**लं**केंत सबळ **सु**गळा पूजुनि [12]**पु**ष्पकविमान देवातें ।
अर्पी, जें सुख गंधें नादें बहु हर्ष दे वातें. ॥ १९८
सबळ **सु**कंठ बिभीषण बसवुनि सानुज सदार [13]सुरयानें, ।
**त्रि**जटा [14]**स**रमा निववुनि फार, निघे **रा**म [15]सुरयानें, ॥ १९९
त्या **पु**ष्पकें विमानें क्रमितां सानंद [16]अंतरिक्षपथा, ।
[17]अंकीं घे **सी**तेतें, प्रभु सांगे सर्व [18]युद्धकथा. ॥ २००
'[19]दिनपंचकें **न**ळानें [20]शतयोजन सेतु निर्मिला, रुंद ।
सुंदरि! हा [21]दशगावें, येणें आलें जया [22]तुंद. ॥ २०१
देवि! **बि**भीषण मज या उत्तरतीरीं दया करी, भेटे, ।
धाची नीति व्याघ्री आम्ही दोघे तिचे [23]पेटे. ॥ २०२
या [24]ऋष्यमूकगोत्रीं **मा**रुतिनें मज **सु**कंठ भेटविला, ।
याणें प्रताप वातें [25]ज्वलनतसा देवि! पेटविला. ॥ २०३

---

१. युद्धकांड–सर्ग ११२ पहा. २. लक्ष्मणा. ३. भाग दुसरा, पृष्ठ ७८ टीप २० पहा. [युद्धकांड–सर्ग ११६ पहा.] ४. दशरथ. (युद्धकांड–सर्ग ११९ पहा.) ५. स्त्री जानकी. ६. पृथ्वीला. ७. युद्धकांड–सर्ग १२० पहा. ८. जगत्+घटकें=सृष्टि+कर्त्यानें. ९. सैन्यें. १०. गृह. ११. ससैन्य. १२. पुष्पक नामक विमान. भाग पहिला, पृष्ठ १५६, टीप २४ पहा.) १३. देवयानें, पुष्पकविमानें. (सर्ग १२२ पहा.) १४. बिभीषणाची पत्नी. १५. मोठ्या वेगानें. [रय=वेग.] १६. आकाशमार्गी. १७. मांडीवर. १८. असेंच वर्णन रघुवंशांत आहे. [सर्ग १३ पहा.] १९. दिनांचें पंचक. [पंचक=पांचांचा समुदाय, षट्क=सहांचा समुदाय.] २०. शतयोजन लांब आणि दशयोजन रुंद. (युद्धकांड–सर्ग २२ श्लोक ७२.) २१. दशयोजनें. २२. दोंद. २३. पेटा=वाघाचें पिलूं. २४. पर्वतीं. तुंगभद्रा नदीच्या कांठीं विजयानगर नामक नगरासमीप हा पर्वत आहे. पंपासरोवर ह्या पर्वताच्या जवळ आहे. २५. अग्नीसारखा.

सुमुखि! विलोकीं इकडे हे **कि**ष्किंधा गुहा, इतें **वा**ळी ।
पूर्वी, आतां माझा प्रियसख **सु**ग्रीव हा पाळी.' ॥ २०४
आलिस्वें[1] बाहून[2] श्री**ता**रा **पु**ष्पकांत वाहून, ।
हर्षातें लाहून, प्रभुसि पुसे पाय पाहून. ॥ २०५
प्रभु सांगे, 'हे **पं**पा त्वद्विरहीं देवि! दे मला कंपा, ।
वदलों, 'असु हो! संपा[3]' तूं मज मेघा जशी शंपा[4]. ॥ २०६
देवि! **म**[5]तंगाश्रम हा येथें बहु हृष्ट मज करी **श**[6]बरी, ।
निर्वृति[7] वरि हा तसि, जसि पावुनि सरसी[8] करीश[9] बरी.' ॥ २०७
येथें **क**बंध राक्षस आम्हां [10]दोघांसि देवि! धरि खाया, ।
[11]त्वत्प्राप्त्युपाय सांगे तो, होउनि दिव्य[12], [13]हर्षखाया. ॥ २०८
**गो**दावरी पहा हे, **पं**चवटी[14] हे त्वदीय दलशाला[15], ।
मुनि या पदा जपति, सुर जैसे पीयूष[16]कलशाला. ॥ २०९
**सी**ते! देवि! पहावा ज्याचा आश्रित **ज**टायु हा वड[17] तो, ।
माझ्या दृष्टिस तात[18]प्रासाद तसाचि आवडतो.' ॥ २१०
**घ**टजाश्रम **अ**त्र्याश्रम दावुनि जगदीश **जा**नकीस मग ।
सांगे, 'मुनिहित तो हा देवि! पहा **चि**त्रकूट[19]नग.' ॥ २११
प्रभु मग दावी **गं**गा**य**मुना तत्संगम**प्र**यागा ती ।
स्वपुरीहि सच्चरित्रा प्रेमें सद्विप्र या गाती. ॥ २१२
उतरे[20] प्रभु **प्र**यागीं नमुनि **भ**रद्वाजपादराजीवें[21], ।
राहे, धरुनि तरावें यन्नाम[22]जपादरा जीवें. ॥ २१३
**गु**ह **भ**रत हर्षखाया **मा**[23]रुतितें पाठवी पुढें **रा**म, ।
हा मतिमान् पूर्ण करी 'आला प्रभु' हें कथुनि काम. ॥ २१४

---

१. सखिस्वें. २. बोलावून. ३. मागें गीति ११० यांत 'संप' शब्द आला आहे. ४. वीज. येथें उपमालंकार आहे. ५. अरण्यकांड–सर्ग ६९ श्लोक ८ पहा. ६. मागें गीति ७२ पहा. ७. सुख. ८. सरोवर. ९. गजेंद्र. १०. रामलक्ष्मणांस ११. तुझ्या प्राप्तीचा उपाय. (गीति ७१ पहा.) १२. दिव्य देह धरणारा. १३. आनंदाया. १४ गोदावरीसमीप अगस्त्याश्रमापासून पंचवटी दोन योजनावर होती. (अरण्यकांड–सर्ग १३ श्लोक १४-२४.) १५. पर्णशाला. १६. अमृतकुंभाला. १७. युद्धकांड–सर्ग १२३ श्लोक ४२. १८. बापाचा वाडा तसाचि. १९. प्रयागापासून दहा कोसांवर चित्रकूटनग होता. (अयोध्याकांड–सर्ग ५४ श्लोक २८ पहा.) २०. चवदा वर्षें वनवास पुरा झाल्यावर पंचमीस राम भरद्वाजाश्रमांत परत आले. (युद्धकांड–सर्ग १२६ श्लोक १ पहा.) २१. कमळें. २२. ज्याच्या नामाच्या जपाविषयीं आदरा (सन्माना) धरुनि जीवें (प्राण्यानें) तरावें. २३. युद्धकांड–सर्ग १२५ पहा.

वनवास [1]**ती**र्थराजीं पूर्ण करी [2]भक्तसुरनगाराम, ।
निघुनि म्हणे '**गु**हपुर गा **श**क्राचें पुर न [3]गा' **राम**. ॥ २१५
भेटुनि **गु**हासि, भेटे सानुज **भ**रतास गुरुस [4]मातांस. ।
सचिवांस पुरजनांस प्रेमें सुत जेंवि तातांस. ॥ २१६
**वि**धि **ह**र **श**तमख सुरमुनि बहु सुरतरुपुष्पवर्ष लाग्य रची, ।
कनककुसुमवृष्टि करी पुरजन, धन हर्षला खरची. ॥ २१७
मानुषरूप सुवेषप्लवगर्क्षनिशाचरस्वबंधुसह ।
स्वपुरीं[5] प्रवेश करितां **राम** प्रभु होय मूर्त [6]मह. ॥ २१८
करिती प्रभुवरि पौरस्त्रीकन्या कोटि वृष्टि [7]लाजांच्या, ।
[8]दध्यक्षतरत्नांच्या, पक्ष्म अहित दृष्टिला ज्यांच्या. ॥ २१९
राज्याभिषेक केला प्रभुसि **व**सिष्ठें [9]महोत्सवें विधिनें, ।
सर्व प्रजा सुखविल्या राजा होउनि दयानिधिनें. ॥ २२०
ऋक्ष प्लवग निशाचर तत्पति सद्वस्त्ररत्नकनकांहीं ।
गौरविले श्री**रा**में, जेंवि तसे ते न जनकांहीं. ॥ २२१
**मा**रुतिला सत्कारुनि मोक्ष सुख जिहीं असे दिले वर, [10]हो! ।
वदला प्रभु, 'मत्सम तूं सत्पूज्य सदा [11]इलेवर हो.' ॥ २२२
**श्री** दे मणिहार म्हणे, 'प्रभुयश ऐकत असें चिरंजीव. ।
अस्मन्मन रंजविलें [12]सद्धृदय असेंचि रंजीव.' ॥ २२३
पाहे प्रजा बहु सुखी कोठेंही न अजरामरा याच्या ।
**रा**ज्यांत सदा धन्या वर्णी अज **रा**मरायाच्या. ॥ २२४

---

१. प्रयागीं. २. भक्तांची कल्पवृक्षाची बाग असा राम तो. ३. रत्नवा. ४. युद्धकांड—सर्ग १२७ पहा. [दशरथाच्या मुख्य स्त्रिया तीन—कैकेयी, कौसल्या आणि सुमित्रा; पण त्याच्या बायका एकंदर साडे-तीनशें होत्या. अयोध्याकांड—सर्ग ३२ श्लोक १३, सर्ग ३९ श्लोक ३६ पहा.] ५. राम आश्विन वद्य ६ स पुष्यनक्षत्रीं अयोध्येस परत आले. [युद्धकांड—सर्ग १२६ श्लोक ५४ पहा.) ६. उत्सव. ७. लाह्यांच्या. राजा नगरांत प्रवेश करूं लागला म्हणजे त्याजवर सुवासिनी आणि पौरकन्या यांनीं लाह्या उधळाव्या असा प्रचार प्राचीनकाळीं होता. [रघुवंश—सर्ग २ श्लोक १०, सर्ग ४ श्लोक २७, सर्ग ७ श्लोक. कुमारसंभव—सर्ग ७ श्लोक ६९ व ८०.] ८. पौर स्त्री कन्या लाजांच्या [व] दध्यक्षत रत्नांच्या कोटि वृष्टि प्रभुवरि करिती. त्या पौर स्त्रीकन्यांच्या (ज्यांच्या) दृष्टिला (डोळ्यांस) पक्ष्म (पापण्या) अहित (शत्रुरूपी) झाले. पापण्यांचें लवणें त्यांना दुःसह झालें. कारण, रामपुरप्रवेश पाहण्यास तितका अडथळा झाला. इतक्या रामदर्शनाविषयीं उत्सुक होत्याः. [रघुवंश—सर्ग २ श्लोक १९ पहा.] ९. युद्धकांड—सर्ग १२८ पहा. १०. अहो. ११. पृथ्वी. (इला=पृथ्वी.) १२. संतांचें हृदय.

संपेना कोणाची जरि म्हणति वैदान्य[1] 'संप दानांहीं.' ।
बहु राज्यें त्यामध्यें परि ऐसी संपदा नाहीं. ॥ २२५
शास्त्रा तसोंच जाणति चवघांचे पुत्र आठ[2] वेदास. ।
प्रभुला तसा तयांला स्वप्नींही आठवे दास. ॥ २२६
शत्रुघ्न वीर लवणा अंतातें कां न ने? कविप्रहित ।
श्रीरामें जो शरसा क्षिप्र करि अनेकविप्रहित. ॥ २२७
गंधर्व[3] तीन कोटि श्रीशार्ङ्गेवरुनि आशु भरतानें ।
वधिले, स्तावक[4] केले सुर भूसुर[5] या शुभरतानें[6]. ॥ २२८
कुश लव सुत सीतेचे वाल्मीकिकवीश्वरें प्रिय छात्र[7] ।
शास्त्र श्रुति स्मृति श्रीरामायण काव्य या पात्र. ॥ २२९
आठहि केले प्रभुनें स्वसमबळज्ञानवर्ण ते राजे ।
ज्यांच्या सदैवहि मुखीं सन्मनुचे[8] वर्ण[9] तेरा जे. ॥ २३०
यज्ञ अशेष करुनि सुर विप्र मुखी श्रीरघूत्तमें केले, ।
नेले ताप दिगंतीं, अर्थी[10] होउनि धनी गेले. ॥ २३१
ताताकडे विमानीं बैसवुनि प्रथम पाठवी माता, ।
धाता पूजी त्यातें झाला देवर्षिही गाता. ॥ २३२
सर्वांतें ताराया यश विस्तारुनि जगीं मरुत्तनया, ।
ठेवी प्रभुचा महिमा निरुपम, पावे मरुत्त[11] न यों[12]. ॥ २३३
प्रभु राज्य असें धर्में करि एकादशसहस्रहायन[13] हो[14]! ।
'व्याकुळ' म्हणे 'स्वविरहें कोणीहि वदोनि 'हाय!' न[15] हो'. ॥ २३४
सर्क्ष[16] कपि सुकंठ सगज हयपशुशुकसारिकादि खग पौर ।
दिव्यविमानीं बसवी करि यश शिवहास्यसें गौर. ॥ २३५
सानुज रामप्रभुही सरयूंत स्नान करुनियां विष्णु ।
झाला, स्तविती पुष्पें वर्षुनि विधि कामजिज्जिष्णु[17]. ॥ २३६
संतानकलोकीं[18] त्या पौरांतें देवदेव हा स्थापी, ।
या वैकुंठयशातें मोक्षेच्छु धरूनि आस्था पी. ॥ २३७

---

१. दाते. २. भाग दुसरा, पृष्ठ २४ टीप २२ व पृष्ठ ४० टीप ३८ पहा. ३. शैलूष गंधर्व. उत्तरकांड–सर्ग १०१ पहा.) ४. स्तुति करणारे. ५. विप्र. ६. मंगललोलुपानें. ७. शिष्य. . 'श्रीराम जयराम जयजयराम' या उत्तम मंत्राचे. ९. अक्षरें. १०. याचक. ११. राजविशेष. १२. या हिम्यानें मरुत्त न पावे. १३. अकरा हजार वर्षें. [उत्तरकांड–सर्ग १०२ श्लोक १६.] १४. अहो. ५. न होवो. १६. स+ऋक्ष=जांबवंतसहित. १७. महादेव आणि इंद्र. १८. कल्पतरुलोकीं.

## उपसंहार.

(स्रग्धरा वृत्त.)

आद्या[1] आर्या[2] कवीड्या[3] अतितरमधुरा प्राकृतीं[4] हे न आली,
झाली देवी प्रसन्ना प्रभुचरितसुधासिंधु सेवूनि घाली, ।
आली[5] श्रीमत्सितेची[6] निजशिशुवचनीं आदरें चित्त घाली;
व्याली दे पांडुपुत्रा मुनिशतसुहिता भानुची भक्तिशाली. ॥ २३८

(अनुष्टुभ् वृत्त.)

'आद्यार्यारामायण'[7] हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ॥

---

१. 'आर्या'जातींतील पहिलें वृत्त 'आर्या' म्हणून 'आद्या' हें विशेषण योजिलें आहे. २. आर्या नामक छंद (वृत्त.) ३. कवि+ईड्या=पंडित, बुध+स्तुत्या, स्तवनयोग्या. ४. प्राकृत महाराष्ट्र भाषेंत. ५. सखी. ६. 'श्रीमत्सितेची' हें पद अगदीं अशुद्ध होय. 'सिता' असा ऱ्हस्व इकारांत शब्द नाहीं, तेव्हां येथें 'श्रीभूमिजेची' 'श्रीमत्कुजेची' 'श्रीजानकीची' अशासारखा पाठ असावा. ७. हा प्रथम पाद पंचम अक्षर लघु नसल्यामुळें अशुद्ध होय. तो 'आर्यारामायणातें द्या' अथवा 'आर्या-रामायणा आद्या' असा असता तर ठीक होतें. हा श्लोक आणि अनेक रामायणांच्या अखेरीस जो या श्लोकासारखा श्लोक आढळतो तो पंतकृत नसून कोणी तरी घुसडून दिला असावा असें वाटतें. हा श्लोक चमत्कृतिजनक नाहीं इतकेंच नव्हे, तर अगदीं नीरस आहे आणि पंताच्या कृतीला आणि मार्मिकतेला शोभण्यालायक नाहीं, असें कोणीही कबूल करील. आतां "* * रामायण प्रेमें मयूरें रामनंदनें" हा श्लोक पंताचा नव्हे असा मह होण्यास जीं अनेक कारणें आहेत त्यांचा उपन्यास येथें थोडक्यांत करतों:—'ह्या मताला पुढील कारणें आहेत:—१ लें, पंतांसारखा काटेकोर, खुबीदार व प्रचंड ग्रंथ लिहिणारा कवि असा एकच चमत्कृतिहीन श्लोक करून संतुष्ट राहिला असावा असा त्याच्या इतर प्रकरणांवरून संभव दिसत नाहीं. जसें महाभारतांत आद्याक्षरांच्या योगानें एक मंत्र साधला आहे, तसा कांहींतरी चमत्कारावह प्रकार येथेंही केल्यावांचून ते राहतेना. २ रें, एक जबर कारण असें आहे कीं, * * * * रामायणांपैकीं तीन रामायणांत—म्हणजे परंतु, ओंवी व शिवरामायणांत—पंतांनीं दोन दोन वेळ नामोच्चार केला आहे. विस्तरभीरु पंतांनीं अशी व्यर्थ पुनरुक्ति केली असावी हें म्हणणें अगदीं संभवत नाहीं. पुनरुक्ति तर अगदीं निरर्थक आहे असें तीं तीं स्थलें पाहिलीं असतां कोणीही सांगेल. इतकेंच नव्हे, पण हा श्लोकात्मक पुन-रुच्चार अगदींच नीरस आहे असें आढळून येईल. ३ रें कारण जर पंतांनीं हा श्लोकात्मक उच्चार केला असें मानावें तर तो सर्व रामायणांचे ठिकाणीं कां केला नाहीं? बहुतेक सर्व रामायणांचीं नांवें अनुष्टुभांत गोंविता येतात. मग हल्लीं उपलब्ध असलेल्या ७५ रामायणांपैकीं १६'तच तो कां बरें नसावा? विशेषतः 'काव्येतिहाससंग्रह'कारांनीं अगदीं मूळाप्रमाणें पुस्तकें छापिलीं आ-

# ३३. मंत्रगर्भसाकीरामायण.[1]

## बालकांड.

(साकीवृत्त.)

भावें सद्यश **रा**माचें । गावें जगदभिरामाचें[2] ॥ ध्रुवपद. ॥

**श्रीर**घुवंशीं ब्रह्मप्रार्थित **ल**क्ष्मीपति अवतरला, ।
विश्वसहित ज्याच्या जनकत्वें **कौ**सल्याधव[3] तरला. ॥ भावें० ॥ १

**रा**घवि सिद्धी[4] आश्रमिं जो तो **गा**धिज मागुनि ने त्या, ।
शिकवि बळातिबळा[5] विद्या शत अस्त्रें **वि**धिच्या नेत्या. ॥ भावें० ॥ २

**म**थुनि ताटका[6] **सु**बाहुमस्तक बाण प्रेरुनि खुडवी,[7] ।
**मा**रीचातें प्रभु शतगावें[8] पुंखसमीरें[9] उडवी. ॥ भावें० ॥ ३

---

होत, तेव्हां त्यांच्या प्रतींत हा श्लोक नव्हता हें स्पष्ट आहे * * * ४ थें, आतां एक शेवटचें कारण असें आहे कीं हा श्लोक जर **पं**तांचा मानला तर **पं**तांवर आपल्याचा दोष येऊन ते करीत होते याचा त्यांचा त्यांसच पत्ता नव्हता, असें म्हणावें लागेल. पूर्वी '**स**र्वसंग्रहां'त एक **श्री**-मत्सुरामायण व दुसरें **सु**रामायण अशीं छापिलीं आहेत. त्यांतील दुसऱ्याचें वृत्त '**का**व्येति-हाससंग्रह'कर्त्यांनीं प्रसिद्ध करीपर्यंत आम्हांस माहित नव्हतें. त्याचें नांव 'सूरा'रामायण असावें, कारण त्याचे वृत्त 'सूरा' हें आहे. आतां हा छापील श्लोक या रामायणाचे शेवटीं लिहिला आहे. '**सु**रामायण हें भावें * * ' आतां **श्री**मत्सु-रामायणाच्या शेवटीं–'**सु**रामायण श्रीस रामास वाहे' असें आहे. आतां आमच्या मतें या रामायणाचें नांव सु-रामायण हें उघड आहे. तेव्हां दुसरें त्याच नांवाचें रामायण जर **पं**तांस मान्य असतें तर निदान 'द्वितीय' असें तरी त्यास विशेषण असतें तेव्हां या दोन रामायणांच्या नांवांत गडबड टाळण्याकरितां कोणी '**श्री**मत्' विशेषण लावून दिलें आहे. **पं**तांनां 'सूरा'वृत्त ठाऊक नसावें असें मानणें म्हणजे **पं**तांविषयीं चांगलाच गौरव करणें आहे! तेव्हां '**सूरा**'रामायण या बहुधा मूळांतील नामपाठाचा अर्थ होईनासा पाहून लेखक-प्रमाद समजून कोणीं 'सुरामायण' असा पाठ घेतला असावा, व छापील श्लोकांत हें नांव घालून रामायणांतील नांव '**सु**रामायण' असें ठेवून दिलें असावें." [शालापत्रक–पुस्तक दुसरें, अंक ११ पृष्ठ ३३३-३४ पहा.]

१. हें काव्य 'साकी'वृत्तात्मक असून यांत **'श्रीराम जयराम जयजयराम'** असा मंत्र प्रत्येक पद्याच्या प्रथमार्धांत कांडानुक्रमें प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, पंचम आणि षष्ठ अक्षर योजून साधिला आहे, म्हणून यास **'मंत्रगर्भसाकीरामायण'** असें अन्वर्थक नांव दिलें आहे. २. जगामध्यें सुंदर जो राम त्याचें. ३. दशरथ. ४. अष्टसिद्धि. ५. भाग दुसरा, पृष्ठ ८१ टीप ९ पहा. ६. सुकेतुयक्ष याची कन्या ताटका ही जंभासुरपुत्र सुंद याची बायको. हिचा पुत्र मारीच. ७. खुंटून टाकी. ८. योजनें. ९. बाणवायनें.

**ज**नकमखातें मुनिसह जातां प्रभुनें **गौ**तमभार्या, ।
उद्धरिली, ती पतिसह पूजी स्तवुनि **अ**हल्या आर्या. ।। भावें० ।। ४
**य**श करि भारी **भ**वधनु[1] भंगुनि, हर्षे **सी**ता बाळा, ।
माळा घालुनि वरिती झाली **रा**मा त्रिजगत्पाळा[2]. ।। भावें० ।। ५
**रा**जा आणवि **द**शरथराया पूजी सबळा धन्या, ।
देता झाला श्री**रा**मासह चवघां चवघी कन्या[3]. ।। भावें० ।। ६
**म**हिपतिशतयम[4] **भृ**गुराम पथीं परतुनि येतां अडवी, ।
कडवी[5] दृष्टि तयाची, वृद्ध[6] क्षणभरि मोहीं रडवी. ।। भावें० ।। ७
**ज**गदीश्वर त्याच्या तेजातें हरि[7], परि चित्त न दुखवी, ।
करुनि पराभव **भ**वशिष्याचा[8] बहु सज्जनमन सुखवी. ।। भावें० ।। ८
**य**मसा क्रूरहि शांति वरुनियां गेला **भा**र्गव, हा या ।
लोकीं वृत्तांत शिरे, लागे क्षत्रियमार्ग वहाया. ।। भावें० ।। ९
**ज**गतीपति[9] सुतविजयें पावुनि सुख, **सा**केता[10] पावे, ।
जन म्हणति, 'प्रभुशरभरवें[11] जे अरिहरि[12] ते तापावे.' ।। भावें० ।। १०
**य**द्यपि **भ**रतवियोग क्षणही अतिदुःसह राजाला, ।
तरिहि मातुलें[13] नेला स्नेहें भेटाया आजाला[14]. ।। भावें० ।। ११
**रा**त्रिंदिवस सद्गुण **रा**माचे वर्णिति हर्षे पौरें[15], ।
श्यामलमूर्ति परी यश प्रसवे **ह**रहासाधिकगौर[16]. ।। भावें० ।। १२
**मु**ददायक[17] **रा**म लहानातें तेंवि जसा थोरातें, ।
**चं**द्र चकोरांतें[18] कीं, जैसा घन[19] चातकमोरांतें. ।। भावें० ।। १३

---

१. महादेवाचें धनुष्य. २. तीन जगतांच्या पालका. ३. भाग दुसरा, पृष्ठ २ टीप ८ व पृष्ठ ३३ टीप २२ पहा. ४. शेंकडो राजांचा नाशकर्ता. ५. कटु. ६. दशरथ. ७. हरण करी. ८. महादेवाच्या शिष्याचा. (परशुरामाचा.) ९. पृथ्वीपति. (दशरथ.) १०. अयोध्येस. ११. सिंहाचा वैरी असा प्राणी जो शरभ त्याच्या शब्दानें. १२. शत्रुरूप सिंह. १३. युधाजितें. १४. अश्वपतीला. (अयोध्याकांड—सर्ग ३१ श्लोक १३ पहा.) १५. नगरवासी. १६. शिवहास्यापेक्षां अधिक गौरवर्ण. (हास्याचा रंग शुभ्र असा कविसंकेत आहे.) आद्यार्यारामायण—आर्या २३५ वी पहा. १७. उत्सवदायक १८. चकोर पक्षी चंद्रोदय झाल्यावर चंद्राकडे तोंड करून चंद्रकांतीचें पान करतो अशी प्राचीन कवींची समजत आहे. १९. मेघ.

## अयोध्याकांड.

(साकीवृत्त.)

स्व[1]**श्री रा**मा द्याया **द**शरथ युवराज करूं पाहे, ।
शिकवि [2]**मं**थरा कुमति हितहि तें **कै**केयीस न साहे. ॥ भावें० ॥ १
ती **रा**यासि म्हणे, 'वर द्यावे, त्वां जे द्याया केले, ।
[3]देय न देतां सत्यभ्रष्ट प्राणी नरका गेले. ॥ भावें० ॥ २
हो [4]**म**न्नंदन नृप, वनवासी **राम** चतुर्दशवर्षें, ।
न चुके देणें द्यायाचें तें राया! द्यावें हर्षें.' ॥ भावें० ॥ ३
'म**ज**ला वांचिव, सांचिव [5]सद्यश, दयिते! [6]मयि [7]तेऽस्तु दया,' ।
ऐसें बहु विनवी, परि न वळे [8]धवळेतरबुद्धि [9]तया. ॥ भावें० ॥ ४
सु**य**शस्कर तें प्रभु मान्य करी **सी**ता**ल**क्ष्मणसहित, ।
[10]महित गुरुसि करि नमुनि पुसुनि धरि वनपथ लक्षुनि [11]अहित. ॥ भावें० ॥ ५
त्व**रा** करुनि नृपरथीं बसुनि विभु भेटे सख्या **गु**हातें, ।
नमुनि **भ**रद्वाजातें सुखवी, **र**वि जेंवि [12]जलरुहातें. ॥ भावें० ॥ ६
**रम**णीय **चि**त्रकूटनगरिं तो मुनिसा [13]उटजीं राहे, ।
हें सचिवमुखें परिसुनि नृप असु **राम**वियोगा वाहे. ॥ भावें० ॥ ७
आ**ज**वळाहुनि सत्वर [14]गुरूनें आणविला तो **भ**रत, ।
निंदी बहु मातेतेंही कीं, तो न विषयलोभरत. ॥ भावें० ॥ ८
तो**य** पित्यातें दे, 'पद घे,' हें गुरुचेंहि वचन मोडी, ।
सुखवुनि **गु**हा **भ**रद्वाजा तो श्री**रा**मा कर जोडी. ॥ भावें० ॥ ९
[15]अ**ज**जनकाची ऐकुनि वार्ता 'हाय!' म्हणे, मग अर्पी ।
[16]मुन्यन्नरचित पिंड तिलोदक, सुश्रद्धेनें तर्पी. ॥ भावें० ॥ १०
**प्रिय भ**रत म्हणे श्री**रा**मातें जोडुनि हात, 'परतणें, ।
न वनीं तुवां असमयीं साहुनि [17]घन [18]हिम [19]आतप रतणें.' ॥ भावें० ॥ ११
[20]सा**रा** उक्ति वदे प्रभु, 'सरतां बा! [21]हायन चवदावें ।
येइन तुज मज गुरुधर्मवचन 'हा हाय!' नच वदावें.' ॥ भावें० ॥ १२

---

१. राजलक्ष्मी. २. भाग दुसरा, पृष्ठ २ टीप १८ पहा. ३. द्यावयाचें. ४. माझा पुत्र. (भरत.) ५. उत्तम यश. ६. माझ्या ठायीं. ७. ते अस्तु=तुझी असो. ८. कृष्णवर्ण बुद्धि. (कैकेयी.) ९. दशरथा. १०. पूज्य. ११. शत्रु. १२. कमलातें. १३. पर्णशालेंत. १४. वसिष्ठानें. १५. अजराजा ज्याचा पिता त्या दशरथाची. १६. देवभाताचा. १७. पर्जन्य. १८. थंडी. १९. उष्ण. २०. श्रेष्ठ. २१. वर्ष.

हेमपादुका घेउनि समजे, नंदिग्रामीं राहे, ।
मग [1]अत्रिस्त्रीपासुनि सीता अतिसत्कारा लाहे. ॥ भावें० ॥ १३

---

## अरण्यकांड.

(साकीवृत्त.)

राम [2]श्रीमद्दंडकविपिनीं राक्षसहत मुनि पाहे, ।
[3]शेषांतें दे भेटि, मग मनीं त्यांच्या ताप न राहे. ॥ भावें० ॥ १
न [4]विराध मनीं अपराध करी, उद्धरि तदपि तयातें. ।
न [5]जयंताच्या देववतें [6]कृतनुतिसहि पद पितयातें. ॥ भावें० ॥ २
आश्रम [7]शरभंग [8]सुतीक्ष्ण [8]घटज यांचे तो [9]अज पावे, ।
ते म्हणति, ‘चरण सोडुनि याचे, कल्पद्रुम न जपावे’. ॥ भावें० ॥ ३
गृध्र जटायु ‘त्वत्पितृसख मी’ ऐसें कळवी नातें, ।
कां वत्सलवरविभुहृद्गत गुरुशोका पळवीना तें? ॥ भावें० ॥ ४
[10]आलय पंचवटींत करुनि विभु गोदातीरीं राहे, ।
शूर्पणखा [11]सद्व्रतभंगेच्छा धरितां कुदशा लाहे. ॥ भावें० ॥ ५
प्रभु राक्षस खर जो त्या सबळा वधी [12]जनस्थानींच्या, ।
ती सीताहरणा प्रेरी त्या आधिजनस्था [13]नीचा. ॥ भावें० ॥ ६
हेममयमृगें लोभवुनि करी विफळ [14]अवनयत्नातें, ।
उटजीं यतिसा शिरुनि खळ हरि प्रभुच्या स्त्रीरत्नातें. ॥ भावें० ॥ ७
[15]अंडज पाडुनि नेतां, श्री [16]नग [17]कीशपंचकीं सोडी, ।
ठेवी लंकेंत अशोकवनीं, प्रभुधृति राहे थोडी. ॥ भावें० ॥ ८
हृदय प्रभुचें पितृसखघातें व्याकुळ झालें शोकें, ।
त्या जळ देउनि केलें दयिताविरहीं जैसें [18]कोकें. ॥ भावें० ॥ ९

---

१. अनुसूया सीतेला अंगरागादिक दे. २. शोभायमान दंडकारण्यांत. ३. बाकी राहिलेल्यांतें. ४. भाग दुसरा, पृष्ठ ९ टीप ९ पहा. ५. इंद्रपुत्राच्या. ६. केली स्तुति ज्यानें अशाला. ७. भाग दुसरा, पृष्ठ ९४ टीप १२ पहा. ८. ऋषिविशेष त्यांचे. ९. जन्मरहित (राम.) १०. राहण्याचें स्थान. ११. उत्तम एकपत्नीव्रतनाशाची इच्छा. १२. पंचवटीच्या. १३. रावणातें. १४. रक्षणरूप उद्योगातें. १५. जटायु. १६. अलंकार. १७. पांच वानरांत. १८. चक्रवाक पक्ष्यानें. रात्रीं चक्रवाक आणि त्याची दयिता स्त्री यांचा वियोग होत असतो, आणि ती समोप असली तर ती त्याला न सांपडून तो तिला काळोखांत शोधीत फिरत असतो व हें जोडपें रात्रीं वियुक्त असलें तरी सूर्योदयानंतर पुन: एकत्र होतें—अशी कविप्रसिद्धि आहे.

जो योजनबाहु [1]**क**बंध धरी, वारी त्याच्या शापा, ।
'**सु**ग्रीवासीं सख्य करी' हें [2]सांगे **वि**धिच्या [3]बापा. ॥ भावें० ॥ १०
उद**य** होय भाग्याचा पाहे प्रभुतें पूजी [4]**श**बरी, ।
[5]भगवत्प्रसाद पात्र न होतां उत्तम जातिहि न बरी. ॥ भावें० ॥ ११
[6]बद**रा**शन देव म्हणे, 'नम्रा स्पर्शुनि [7]हनु हो माया ।
**ब्र**ह्मपदाप्रति गेली आज्ञा मागुनि [8]तनु होमाया.' ॥ भावें० ॥ १२
उत्त**म**रूपें बसुनि विमानीं, लज्जा दे [9]शंपेतें ।
ती **श**बरी [10]**वि**धिलोका, पावे सानुज विभु पंपेतें. ॥ भावें० ॥ १३

---

## किष्किंधाकांड.

(साकीवृत्त.)

**पं**पेची **श्री** पाहुनि **रा**में आठविली निज कांता, ।
शांता करि **लक्ष्म**ण पीडा त्या [11]वीजुनि [12]सिंचुनि [13]तांता. ॥ भावें० ॥ १
**मा**रुति **रा**घव**सु**ग्रीवांसीं सख्य करी शुभलग्नीं, ।
[14]नग दाखवुनि **सु**गळ [15]धृति आणी **रा**मीं चिंतामग्नीं. ॥ भावें० ॥ २
प्रभुला **म**ग वैराचें कारण अतुळ **वा**लिबळ कळवी, ।
[16]सप्तसाल भेदुनि **सु**गळाचा संशय **र**घुपति पळवी. ॥ भावें० ॥ ३
[17]**श**क्रात्म**ज** एकशरें वधिला, **सु**गळ [18]कीशपति केला, ।
प्रभुमैत्रीनें लज्जा दिधली देवांच्या [19]लतिकेला. ॥ भावें० ॥ ४
प्रभुप्रि**य**तमाशोधा वानर बहू **सु**गळें पाठविले, ।
दक्षिणदिग्गतकपिंनीं मरतां प्रभुचे गुण आठविले. ॥ भावें० ॥ ५

---

१. भाग दुसरा, पृष्ठ ५ टीप ३ व पृष्ठ २० टीप १० पहा. २. शापमुक्त कबंध. (विश्वावसु गंधर्व.) हा 'सांगे' या क्रियापदाचा कर्ता. ३. रामा. ४. भाग दुसरा, पृष्ठ ५ टीप ४ पहा. ५. भाग दुसरा, पृष्ठ ४६ टीप ११ पहा. ६. बोरें खाणारा. [शबरीनें उष्टीं बोरें रामाला दिल्याची कथा वाल्मीकि रामायणांत नसून शबरी रामाला फळें देते असें अध्यात्मरामायणांत आहे.] ७. हनुवटी. ८. काया, शरीर. ९. वीजेतें. १०. ब्रह्मलोका. ११. वारा घालून. १२. उदकसेक करून. १३. श्रमलेल्या. १४. अलंकार. १५. धैर्य. १६. ताडवृक्ष. [सप्ततालीभेदाची कथा किष्किंधाकांडाच्या १२ व्या अध्यायांत आहे. रामानें एका सालवृक्षाचा भेद करावा म्हणून जो बाण टाकिला त्यानें सात सालवृक्षांचा भेद करून, ते वृक्ष ज्या भूमिवर होते तिचा भेद करून सप्तभूमि रसातलांत प्रवेश केला असे वर्णन आहे.] १७. इंद्रपुत्र. (वाली.) १८. वानरांचा पति. १९. वल्लीला. (कल्पवल्लीला.)

'फार बरा मृत्यु घडेल जरी प्रभुच्या झटतां कार्या'. ।
आर्या जटायुला हें घडलें सोडवितां प्रभुभार्या. ॥ भावें० ॥ ६
गृध्रोत्तम संपाती ऐसी ऐके स्वानुजवार्ता, ।
शोची, जळ दे, निज वृत्त कथी कपिचक्रा तापार्ता. ॥ भावें० ॥ ७
जातां तेजस्विवररविकडे तेजें पक्ष जळाले, ।
पोटाखालें अनुज रक्षिला, तत्तावयव गळाले. ॥ भावें० ॥ ८
पतन यदृच्छेनें मज घडलें मुनिवर्याश्रमनिकट, ।
ज्याचें नाम निशाकर तेणें ताप शमविला विकट. ॥ भावें० ॥ ९
मातें द्विजवर वदला जेव्हां कथिसिल सीताशोध, ।
तो धर्म तुला पक्षद होइल नच विसरें हा वोध. ॥ भावें० ॥ १०
मत्तनय कथी मज दशवदनें नेतां सीता पाहे, ।
ती शतयोजनसिंधुपलिकडे लंकेंत सती आहे.' ॥ भावें० ॥ ११
गृध्रवराला ऐसें कथितां पक्ष पळांतचि आले, ।
झाले उडतां तो प्रमुदित कपि, परि जलनिधिला भ्याले. ॥ भावें० ॥ १२
ऋक्षेश मह स्तवुनि वाढवी जगत्प्राणतनयाचें, ।
स्वबळपरिज्ञानोत्साहें या सिद्ध करी मन याचें. ॥ भावें० ॥ १३

---

## सुंदरकांड.

(साकीवृत्त)

जैसा वेगें श्रीकंठाचा बाण त्रिपुरा गेला, ।
तैसा लंकेवरि तो मारुति, सदहितरिपु रागेला. ॥ भावें० ॥ १
मैनाकधरा थडकुनि पाठी ठकवुनि सुखवी सुरसा, ।
वधुनि सिंहिका पावे पारा साधु विमानग सुरसा. ॥ भावें० ॥ २

---

१. आपल्या धाकट्या भावाची (जटायूची) बातमी. २. वानरसैन्याला. ३. जटायु. ४. स्वेच्छेनें. ५. चंद्रमा. ६. भयंकर. ७. दग्ध झालेले पंख पुनः देणारा. ८. माझा पुत्र. (सुपार्श्व.) [आपला पुत्र सुपार्श्व यानें पूर्वी सांगितलेली सीताहरणाची कथा संपाति जांबवंतास व वानरांस सांगतो असें वर्णन आहे. किष्किंधाकांड–सर्ग ५९ पहा.] ९. परंतु. १०. जांबवान्. ११. तेज. १२. वायुपुत्र मारुतीचें. १३. विषकंठ जो महादेव त्याचा. १४. या त्रिपुरासुराला महादेवानें जाळून टाकलें–अशी कथा आहे. १५. साधूंच्या शत्रूचा शत्रु. १६. मैनाकपर्वताला. १७. भाग दुसरा, पृष्ठ १२ टीप १५ पहा. १८. भाग दुसरा, पृष्ठ १२ टीप १६ पहा. १९. देवसा.

हरुनि भ्र**म** **लं**कादेवीचा, लघुदेहें पुर शोधी, ।
पाहे प्रमदवनीं[1] धीरेतें त्याहि[2] तिला[3] जो रोधी. ॥ भावें० ॥ ३
न गणी र**ज**निचरातें पाहे, कुळ वर्णुनि, दे मुद्रा; ।
चूडामणि खुण घे प्रिय सांगुनि कळवी बळ त्या क्षुद्रा[4]. ॥ भावें० ॥ ४
सुतरुक्ष**य**[5] सबळाक्ष[6] व्यय करि, **घ**ननादाला गांवे[7], ।
गावे ऐसे बोल वदे जे गुरुहृदया लागावे. ॥ भावें० ॥ ५
बहु कोपे **रा**वण, खळ पेटवि जित[8] आणुनि पुच्छातें, ।
**लं**का जाळुनि सद्गृह[9] रक्षुनि अघफळ दे तुच्छातें. ॥ भावें० ॥ ६
**श्री**स पुसे, **म**करालय[10] लंघी, बहु सुखवी युवराजा, ।
झाले पात्र महाकपि व्हावे वरुनि गतिद सुवरा ज्या. ॥ भावें० ॥ ७
ते परम **जं**वन[11] पवनसुतसहित महित **मं**धुवना[12] लुटिती, ।
वनरक्षक **द**धिमुख जो त्यातें **अं**गदवचनें कुटिती. ॥ भावें० ॥ ८
सांगे अप्रि**य** **द**धिमुख, समजे **सु**गळ सिद्धि कार्याची, ।
परिमुनि **म**धुवनमथन सुखावे गति त्याही आर्याची. ॥ भावें० ॥ ९
'ते पाठीव **जं**वें[13] जा' ऐसें **सु**गळ **द**धिमुखा सांगे, ।
कथुनि निरोप तयांसि म्हणे तो स्वमतिस, 'खिन्ना कां गे?' ॥भावें०॥ १०
वायुतन**य**सह **जां**बवदंगद[14] **नं**ळ[15]**नी**ळादि[16] उसळले, ।
तद्रव[17] अद्भुत **मं**दर तेणें दिक्प्रांताब्धि घुसळले. ॥ भावें० ॥ ११
वाततनुज **रा**जीवाक्षातें[18] चूडामणि[19] दे, वंदी, ।
आलिंगन देवुनि त्या त्याचा प्रभुवर झाला बंदी. ॥ भावें० ॥ १२
प्रेमें म्हणे, '**म**रुत्पुत्रा ! त्वां ऋणी **राम** हा केला, ।
सोडुनि शत कार्यें म्यां द्यावी हाक तुझ्या हाकेला'. ॥ भावें० ॥ १३

---

१. प्रमदवन=जेथें राजा सस्त्रीक क्रीडा करतो तें. प्रमदांचें (स्त्रियांचें) वन. २. त्या रावणालाही. ३. सीतेला. ४. नीचा. (रावणास.) ५. उत्तम वृक्षांचा नाश. ६. सैन्य आणि अक्ष नामक रावणपुत्र यांसह. ७. मिळे. ८. जीवंत. ९. साधु जो बिभीषण त्याचें गृह. १०. समुद्र. ११. वेगवान्. १२. हें वाळीचें उद्यान होतें. १३. त्वरेनें. १४. जांबवान् ब्रह्मदेवाच्या जांभईपासून झाला. १५. विश्वकर्म्याचा पुत्र नळ. १६. अग्नीचा पुत्र नीळ. १७. त्याचा नाद. १८. कमललोचनातें. (रामातें.) १९. हाच चूडामणि सीतेला जनकानें विवाहसमयीं दिलेला होता. (सुंदरकांड—सर्ग ६६ श्लोक ४.)

## युद्धकांड.

(साकीवृत्त.)

तेजें विजयश्री साधाया सानुज ससुगळ सबळ, ।
राम निघे सुमुहूर्तीं घ्याया स्वशरांतें अरिकबळ. ॥ भावें० ॥ १
जलनिधितीरा जातां प्रभुला शरण बिभीषण आला, ।
झाला प्रसन्न लंकाराज्य स्वनमनफळ दे त्याला. ॥ भावें० ॥ २
नळकपि सुमहान् सेतु रची त्या मार्गें प्रभु तो उतरे, ।
[1]पतिमथनें अरि सुगळा भ्याले, [2]हरिला जैसे कुतरे. ॥ भावें० ॥ ३
प्रभु [3]तारात्मजदूतमुखें [4]त्या हित कथिलें, परि न गणी, ।
त्यांत वक्रपण आदीं मध्यें अंतींहि जसें [5]मगणीं. ॥ भावें० ॥ ४
समरीं सहाय सचिव सुत सुभट कुंभकर्णेही खपला, ।
इंद्रजित् तसा [6]मायावीही जरि बहु विजया जपला. ॥ भावें० ॥ ५
[7]खळबळपारावारातें तो प्रभुवरकुंभज भेटे, ।
कीं [8]राक्षसकुळकक्षीं रघुवर तो [9]प्रलयानळ पेटे. ॥ भावें० ॥ ६
गरुडाहून मरुत्सुत आला समरीं बहु कामाला, ।
आणुनि औषधिगिरिशिखरातें हृष्ट करी रामाला. ॥ भावें० ॥ ७
सप्ताहोरात्रें [10]जन्य करुनि दशमुख तो खपवीला; ।
संपादुनि विजयश्री रामें दिधला [11]तोखें [12]पवीला. ॥ भावें० ॥ ८
झाले जयजयकार बहु स्तव दिव्य वाद्यरव हर्षें, ।
नृत्यें गीतें केलीं कल्पद्रुमकुसुमाचीं [13]वर्षें. ॥ भावें० ॥ ९
[14]दशकंठानुज पदीं बसविला, मग [15]दिव्यें करी सीता, ।
गुरु सुखवुनि कपि उठवुनि केली कीर्ति कविसभागीता. ॥ भावें० ॥ १०
मग वरि [16]विर्यद्यान, विभुस प्रियजन भेटे, भरतातें, ।
प्रभु तद्वेह आपण घे जो दिधला भूभर तातें. ॥ भावें० ॥ ११

---

१. स्वामी जो रावण त्याच्या मथनानें. २. सिंहाला. ३. तारेचा पुत्र जो अंगद दूत त्याच्या मुखानें. ४. रावणाला. ५. मगणांत आदीं मध्यें आणि अंतीं सारखींच गुरु अक्षरें असतात तसें. गुरु वर्ण वक्र असतो, कारण त्याची आकृति नागदंतासारखी लिहिण्यांत येते. 'गुरुस्तु द्विकलो ज्ञेयो नागदंतसमाकृतिः'. मगण चिन्हानें दाखविलें असतां (ऽऽऽ) असा लिहिला पाहिजे. [काव्यमाला—प्राकृतपिंगलसूत्र, प्रथम परिच्छेद—२ टीका पृ० ३ पहा.] ६. कपटी. ७. दुष्ट सैन्यसागराला. ८. राक्षसकुळरूप गवतांत. ९. प्रलयकाळचा अग्नि. १०. युद्ध. ११. संतोष. १२. वज्राला. १३. वर्षणें. १४. बिभीषण. १५. शपथ. १६. आकाशीं जाणारें पुष्पकविमान.

सहपरिवा**रा सु**गळा पूजी त्याही **लं**कापतितें, ।
व्हावें शुचि रुचिरयशें ज्याच्या क्षाळुनि अंका पैतितें, ॥ भावें० ॥ १२
सुख निरुप**म** दे सर्वजनातें राज्य श्री**रा**माचें, ।
आ[3]धि [4]व्याधि भ[5]व हरि ज्याचा उच्चारण नामाचें. ॥ भावें० ॥ १३

---

## उत्तरकांड.

(साकीवृत्त.)

**कुं**भजवदनें **श्रीरा**म प्रभु [6]दशवदनकथा परिसे, ।
ज्या मत्ता **वि**धिदत्त महावर घातक झाले अरिसे. ॥ भावें० ॥ १
घे स्वाग्रजा **कुबेरा**पासुनि [7]**कैं**कस्यात्मज **लं**का, ।
कथितां हित हरि **पु**ष्पक, उपडी **ह**रगिरि न धरी शंका. ॥ भावें० ॥ २
[8]**वे**दवतीशप्त [9]**म**रुत्तक्रतु मुनिविध्वंसक खोटा, ।
[10]**अ**नरण्यातें हांसुनि शाप स्वीकारी जो मोठा. ॥ भावें० ॥ ३
जिंकी नृप दिग्वि**ज**यीं भग्ना काळाच्या करि सेना, ।
काळदंड आटोपी **वि**धिचें उक्त कोण परिसेना? ॥ भावें० ॥ ४
असुरपराज**य** मात्र न घडला त्यांसीं **वि**धि सख्य करी, ।
**वा**सुकिवरुणपुरें तो जिंकी स्त्रीरत्नें सर्व हरी. ॥ भावें० ॥ ५
भगिनीरत्नह**रा म**धुवरि तो कोपे परि सख्य घडे, ।
अक्षौहिणी सहस्रचतुष्टय घे **ह**रिसीं गांठि पडे. ॥ भावें० ॥ ६
**घ**नरव शत**म**ख धरुनि पुरा ने, वरद **वि**धि करी मुक्त, ।
**अ**र्जुन **वा**ळी हरिति म्हणुनि मद सुर मुनि झाले युक्त. ॥ भावें० ॥ ७
रवि राहु स्वर्ग**ज**फळमति शिशु वज्रें मूर्छित झाला, ।
क्षोभे पवन, उठवि **वि**धि, बहु वर सुरवर देती त्याला. ॥ भावें० ॥ ८
हें मुनि कथि जा**य,** मग सखखे सत्कारुनि बोळविले, ।
सुरवरमुदितपवनजें प्रभुपदिं स्वशिरो[11]लंक लोळविले. ॥ भावें० ॥ ९

---

१. दोष. २. पापी पुरुपानें. ३. मानसिक व्यथा. ४. देहव्यथा. (रोग.) ५. संसार. ६. रावण. ७. कैकसी+आत्मज=सुमालीची कन्या+पुत्र=रावण. विश्रवा+कैकसी यांचा पुत्र रावण; विश्रवा+भारद्वाजकन्या देववर्णिनी यांचा पुत्र वैश्रवण. (कुबेर.) ८. वेदवती=बृहस्पतिपुत्र जो कुशध्वज त्याची कन्या, हिनें रावणाला शाप दिला. (मंत्ररामायण–उत्तरकांड, गीति ७७-८४ पहा.) ९. मंत्ररामायण–उत्तरकांड, गीति ८९-९३ पहा. १०. मंत्ररामायण–उत्तरकांड, गीति ९४-९५ पहा. ११. आपल्या मस्तकसंबंधी केश.

गर्भवतीसहि जननिंदेस्तव यश रक्षाया टाकी, ।
लवणासुर मर्दुनि शत्रुघ्न प्रमुदित करि मुनि नाकी[1]. ॥ भावें० ॥ १०
[2]मृतविप्रतनय उठवी प्रभु, हयमेधीं कुशलवगीता ।
स्वयशा सेवी, दिव्य करवितां क्षितिमाजि शिरे सीता. ॥ भावें० ॥ ११
आठां पुत्रांतें दे राज्य प्रभुवर करि सत्या[3]गी, ।
धर्मीं अत्यादर कळवि जना, [4]इंद्रजिदरिस त्यागी. ॥ भावें० ॥ १२
माता तारुनि अमरस्तुतगति दे पुरवी श्रितकाम, ।
संतानकलोकीं जन ने वरि वैकुंठप्रियधाम. ॥ भावें० ॥ १३

### उपसंहार.

मंत्रगर्भ हें श्रीरामायण रामनंदनें रामीं ।
नमुनि वाहिलें हृदय रमाया प्रभुच्या चरितीं नामीं. ॥

---

## ३४. [5]पंचशतीरामायण.

### बालकांड.

(साकीवृत्त.)

गातां रामचरित्रास । [6]स्मरमुख धरिति अरि त्रास. ॥ ध्रुवपद. ॥
श्रीरविकुळमणि दशरथ राजा [7]शतमखसख शूरवर, ।
ज्याचें अरिकुळसह [8]दुरित पिटित यश गेलें दूरवर. ॥ गातां० ॥ १
[9]अनपत्यनृपासि म्हणे चिंताज्वर [10]उतला 'भाजीन,' ।
परि पात्र होय गुरुमखसुकृतें तो सुतलाभा जीर्न[11]. ॥ गातां० ॥ २
प्रभुसि विनवि विधि, 'हो खळदशमुखनाशास नरसमान, ।
अमृताधिक पावेलचि [12]खळजनता शासनरस मान. ॥ गातां० ॥ ३

---

१. देव. २. मंत्ररामायण—उत्तरकांड, गीति ३१७-३२९ पहा. ३. वाणी. ४. लक्ष्मणाला. [मंत्ररामायण—उत्तरकांड, गीति ४००-४०३ पहा.] ५. या प्रकरणांत पांचशें पद्यें आहेत म्हणून याला '**पंचशतीरामायण**' असें नांव दिलें आहे. [पंचशती=पांचशयांचा समाहार.] ६. कामप्रमुख अरि. ७. इंद्राचा मित्र. ८. पाप. ९. निःसंतान. १०. उतास आलेला. ११. वृद्ध. १२. दुष्टजनांचा समुदाय.

अंशें झाले कपि ऋक्ष, सुर [1]ज्वलनादि हरिसहाय।
म्हणावया त्या अतिमदमत्ता [2]सर्वजगदरिस 'हाय!' ॥ गातां० ॥ ४
[3]भक्तसुरद्रुम [4]जगदवनव्रत जो [5]वरद उदारांतें।
मूर्ति[6]र्चतुष्टय धरि, नरपतिच्या धन्य करि [7]सुदारांतें. ॥ गातां० ॥ ५
कौसल्यासुत राम सुगुणनिधि, कैकेयीसुत भरत, ।
लक्ष्मण शत्रुघ्न सुमित्रासुत, सर्वहि सदय [8]शुभरत. ॥ गातां० ॥ ६
वाढति मूर्त महोत्सव बरवे सुगुणगणांसह अवघे, ।
चवघे सुत आलिंगुनि दशरथ निरुपम सुख नवनव घे. ॥ गातां० ॥ ७
निवविति सुजन[9]चकोरांच्या ते [10]राकोडुप नयनांतें. ।
[11]अर्थी सुखवुनि [12]रघुराज करी त्यांच्या [13]उपनयनांतें. ॥ गातां० ॥ ८
होय वसिष्ठ जगद्गुरुगुरु कीं सद्विद्या दे त्यांतें, ।
शिष्य करूनि प्रणतां सर्वां सद्विद्या देत्यांतें. ॥ गातां० ॥ ९

---

१. अग्निप्रमुख देव. [अग्नीचा पुत्र नील वानर, इंद्राचा वाली, सूर्याचा सुग्रीव, बृहस्पतीचा तार, कुबेराचा गंधमादन, विश्वकर्म्याचा नल, अश्विनीकुमारांचे मैंद व द्विविद, वरुणाचा सुषेण, पर्जन्याचा शलभ आणि वायूचा हनूमान्. (बालकांड—सर्ग १७ श्लोक १० पहा.)] २. सकल जगताच्या शत्रूला. (रावणाला.) ३. भक्तांचा कल्पवृक्ष. ४ जगताचें अवन (रक्षण) हेंच व्रत ज्याचें तो. ५. 'वरद' या विशेषणानें भक्तमनोरथपरिपूरकत्वरूप भगवद्गुणाचा बोध होतो. ६. चार. ७. उत्तम स्त्रियांतें. ८. मंगलैषी. ९. चकोर पक्षी हा चंद्रकिरणांवर उपजीवन करतो, असा प्राचीन कविसंकेत आहे. या कविसंकेतांविषयीं विश्वनाथकविराजकृत 'साहित्यदर्पणां'तील तीन पद्यें (सप्तमपरिच्छेद) उपयुक्त आहेत म्हणून येथें दिलीं आहेत. यांत बऱ्याच कविसमयांचा समावेश केला आहे:—'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता वर्ण्यते हासकीर्त्यो रक्तौ च क्रोधरागौ सरिदुदधिगतं पंकजेंदीवरादि। तोयाधारेऽखिलेऽपि प्रसरति च मरालादिकः पक्षिसंघो ज्योत्स्ना पेया चकोरैर्जलधरसमये मानसं यांति हंसाः ॥,' 'पादाघातादशोकं विकसति बकुलं योपितामास्यमद्यैर्यूनामंगेषु हाराः स्फुटति च हृदयं विप्रयोगस्य तापैः। मौर्वी रोलम्बमाला धनुरथ विशिखा कौसुमाः पुष्पकेतोर्भिन्नं स्यादस्य बाणैर्युवजनहृदयं स्त्रीकटाक्षेण तद्वत् ॥,' 'अह्न्यंभोजं निशायां विकसति कुमुदं चंद्रिका शुक्लपक्षे मेघध्वानेषु नृत्यं भवति च शिखिनां नाप्यशोके फलं स्यात्। न स्याज्जाती वसंते न च कुसुमफले गंधसारद्रुमाणामित्याद्युन्नेयमन्यत्कविसमयगतं सत्कवीनां प्रबंधे ॥.' दुसऱ्या एका पद्यांत या कविसमयांचा समावेश केला आहे तो असा:—'पादाघातादशोकस्तिलककुरबकौ वीक्षणालिङ्गनाभ्यां स्त्रीणां स्पर्शात्प्रियंगुर्विकसति बकुलः सीधुगंडूषसेकात्। मंदारो नर्मवाक्यात्पटुमृदुहसनाच्चंपको वक्त्रवातात्चूतो गीतान्नमेरुर्विकसति च पुरोनर्तनात्कर्णिकारः ॥'. १०. पूर्णिमेचा चंद्र. (राका+उडुप. 'राका नवरजोनार्यां पूर्णचंद्रतिथावपि' इति रभसः.) ११. याचक. १२. दशरथ. १३. मुंजीबंधन. संस्कारांतें.

गाधिज ये, पूजुनि त्यासि म्हणे दशरथ नृप, 'बा! ज्ञात्या ! ।
ज्या कार्यें तव येणें, करिनचि मी, करितां आज्ञा त्या'. ॥ गातां० ॥ १०
मुनि सांगे, 'ऋष्यामिष भक्षुनि, सेवुनि मद्या, गाते ।
दशमुखयश जे तदनुग पीडिति येउनि मखागा ते. ॥ गातां० ॥ ११
राम सलक्ष्मण मख रक्षाया मज देचि महाबाहो ! ।
वेचुनि तप, अपराधी दंडुनि, ऋषि रिक्त न हा बा ! 'हो'. ॥ गातां० ॥ १२
नृप वचके, नच केवळ लोभी, परि भी सुतविरहातें, ।
गुरुवचनें दे, म्हणवि न भेटुनि जें मत्सख चिर 'हा!' तें. ॥ गातां० ॥ १३
मार्गीं क्षुधा तृषा सुकुमारा तिळमात्र न बाधाया, ।
दोन बळातिबळा विद्या दे सानुजदेवा धाया. ॥ गातां० ॥ १४
वधवि ताटका, शत दिव्यास्त्रें दे सुतपोराशि कवी, ।
अतुला विद्या न निजा सोडुनि गुरु सुतपोरा शिकवी. ॥ गातां० ॥ १५

---

१. विश्वामित्र. २. त्या कार्या. ३. ऋषि हेंच आमिष. ४. गाणारे. [गाता=गाणारा. धातूंस तृ (ता) प्रत्यय लागून कर्तृवाचक नाम होतें:—जसें गै–गाता, नी–नेता, दा–दाता, भृ–भर्ता, भुज्–भोक्ता, इत्यादि.] ५. त्याचे सेवक. ६. माझ्या यज्ञाला. ७. यज्ञ. [विश्वामित्रानें राम दहा दिवस मागितला. बालकांड–सर्ग १९ श्लोक १७-१८ पहा.] ८. होवो. ९. या दोन विद्यांच्या प्रभावांचें वर्णन रामायणांत केलें आहे तें असें:—'हे रामा! बला आणि अतिबला या दोन्ही विद्या तूं घे. यांचा जप केल्यानें तुला श्रम, वार्द्धक्य किंवा अंगविकृति कांहींच होणार नाहीं. तूं असावध अथवा निद्रावश असतांही तुझ्यापुढें राक्षसांचे कांहीं चालायाचें नाहीं. हे रामा! पराक्रमानें तर तुझ्या सदृश अन्य कोणी होणार नाहीं. देवलोकीं, मनुष्यलोकीं व नागलोकीं या तिन्हीं ठिकाणीं सौभाग्य, चातुर्य, बुद्धि, श्रुति, पौरुष, समयोचित उत्तर देणें, धारणाशक्ति, या सर्व गुणांत तुझी बरोबरी करणारा कोणी पुरुष होणार नाहीं. या दोन्ही विद्या बला आणि अतिबला तुला प्राप्त झाल्यानें तुझी अक्षय कीर्ति होईल. हे रामा! या विद्यांच्याच प्रभावामुळें तुला क्षुधेची आणि तृषेची बाधा होणार नाहीं. मोठ्या बिकट आडरानांत व अरण्यांतही तुला जय अवश्य प्राप्त होईल. हे राघवा! या विद्यांचें पठन व अध्ययन केलें असतां तुझी भूमंडळीं अनुपम कीर्ति होईल. हे रामा! या विद्या सकल ज्ञानाच्या उत्पादक माता आहेत. ह्या साक्षात् ब्रह्मदेवाच्या कन्या होत.' याप्रमाणें या विद्यांचें वर्णन रामायणांत आहे. [बालकांड–अध्याय २३ पहा.] १०. रामा. ११. तृप्त कराया. १२. पृष्ठ १ टीप १३ पहा. १३. दंडचक्र, धर्मचक्र, कालचक्र, विष्णुचक्र, ऐंद्रचक्र, ऐषिकास्त्र, मोदकी आणि शिखरी नामक दोन गदा, वारुणास्त्र, पैनाकास्त्र, वायव्य, गांधर्व, पैशाच, मोहन, तामस, सौर, इत्यादि अनेक अस्त्रें. [अध्याय २७ पहा.] १४. उत्तम तपाच्या ठायीं आहे उर=हृदय (मन) ज्याचें असा. १५. हें अर्ध सुभाषितरूप आहे.

ज्याचे चरण [1]भवीं सुज्ञानीं जाया [2]आधि जपावे, ।
त्या प्रभुसह निज **[3]सि**द्धाश्रमपद भगवान् **गा**धिज पावे. ॥ गातां० ॥ १६
यज्ञा[4]यतनद्वारीं टाके प्रभु करवि प्रारंभा, ।
तों ये [5]यातुचमू, मोहाया [6]जसि [7]वरविप्रा **रं**भा. ॥ गातां० ॥ १७
प्रबळ **[8]सु**बाहु वधुनि तद्राक्षसकटकातें प्रभु बुडवी, ।
तेव्हां [9]पत्रिपवन [10]शतगावें **[11]मा**रीचातें उडवी. ॥ गातां० ॥ १८
तरि न **[12]ता**टकासुत तो मेला, उडुनि समुद्रीं पडला, ।
झाला [13]तापस, रघुवरखरशरसंत्रास मनीं जडला. ॥ गातां० ॥ १९
[14]म्हणति श्रीस्तुत्याशींस सगुरु मुनिवरविप्र 'भुला' जे, ।
गुरुजनसमक्ष पूजा नवरी, जरि बरवि, प्रभु लाजे. ॥ गातां० ॥ २०
तों मुनितें 'यावें यज्ञातें' **जनक** असें आमंत्री, ।
**[15]त्र्यं**बकदर्शनकुतुकिप्रभुतें प्रेमें ने हा मंत्री. ॥ गातां० ॥ २१
प्रभु [16]करि रजें [17]अहल्यावपुतें ध्यानें [18]धौतें मनातें, ।
प्रभुसीं पिता श्वशुर हें लाविति साध्वी **गौ**तम नातें. ॥ गातां० ॥ २२
**जनक** निववि आलिंगुनि मुनितें, तीर्थें न वपु निवे तें, ।
न नृप **श्री**मूर्तितें, चकोरचि पाहे नव [19]पुंनिवेतें. ॥ गातां० ॥ २३

---

१. संसारीं. २. मनोव्यथा, चिंता. ३. याला 'सिद्धाश्रमपद' असें म्हणण्याचें कारण हा वामनरूपधारी श्रीविष्णूचा पूर्वाश्रम होय. [सर्ग २९ श्लोक १-५ पहा.] ४. आयतन=स्थान, मंडप. ५. राक्षससेना. ६. येथें उपमालंकार जाणावा. ७. थोर ब्राह्मणाला. (शुका.) शुकाला मोहून त्याच्या तपाचा भंग करून त्याला कामपाशबद्ध करण्यासाठीं इंद्रानें रंभेला पाठविलें होतें व ती निराश होऊन परतली—ही कथा सुप्रसिद्ध आहे. ८. ताटकेचा ज्येष्ठ पुत्र. ९. बाणवायु. १०. शतयोजनें. ११. मारीचाला साहावे दिवसीं रामानें शंभर योजनें दूर समुद्रांत बाणाच्या योगानें उडविलें. (बालकांड—सर्ग ३१ श्लोक १८ पहा.) १२. मारीच. (बालकांड—सर्ग २५ पहा.) १३. तो मारीच तप करूं लागला. १४. जे सगुरु मुनिवर विप्र (विश्वामित्रासह इतर ऋषि व ब्राह्मण,) श्री, स्तुति-आशींस (लक्ष्मी स्तुति व आशी या देवतांस) [या रामास] 'भुला' [असे] म्हणति, [त्या] गुरुजनासमक्ष (वडील, मान्य लोकांच्या समक्ष) प्रभु (राम) पूजा जरि बरवी [तरी] न वरी (स्वीकारी), कारण तो (राम) लाजे. या पद्यांत रामाची शालीनता दाखविली आहे. १५. त्र्यंबक=शिव. [या स्थळीं 'त्र्यंबकदर्शन' असें जें पद आहे तें कदाचित् लेखकप्रमादमूलक असावें; 'त्र्यंबककार्मुक' असें पद असतें तर तें इष्टार्थास अनुगुण होतें. १६. येथें 'करि' या क्रियापदाची योजना काकाक्षिगोलक न्यायानें केली पाहिजे. १७. बालकांड—सर्ग ४८ पहा. १८. क्षालित, स्वच्छ. १९. पौर्णिमेतें.

गाधिजवचनें दशरथसुत हे जनकनृपा या समजे, ।
स्वसमाधिसमसुखें ब्रह्म असें त्यांसहि कवि यासम जे. ॥ गातां० ॥ २४
[1]स्वमखावनसत्युद्धरणचरित मुनिनें जनका [2]कथिलें, ।
या पावुनि इतर बळें तैसीं जैसीं कनका [3]कथिलें. ॥ गातां० ॥ २५
त्र्यंबकचापविलोकन[4]कामहि रघुपतिचा जाणविला, ।
बहुशत [5]भट आज्ञापुनि [6]तो त्या नरनाथें आणविला. ॥ गातां० ॥ २६
सीता प्रभुसि विलोकुनि वदली, 'तात जनक! थोर पण, ।
घोरपण प्रकटुनि कळवितसे परम स्वकठोरपण.' ॥ गातां० ॥ २७
प्रभु नमुनि गुरुसि शिवधनुसि तया सज्य करी आकर्षी, ।
[7]मोडी, थोडी शक्ति प्रकटुनि, एक न भी [8]नाकर्षी. ॥ गातां० ॥ २८
वंदुनि हृदयीं श्रीसांबातें मुदिता सीता बाळा, ।
[9]वाळाया परवदनें घाली प्रभुच्या कंठीं माळा. ॥ गातां० ॥ २९
कौशिकवचनें जनकें दशरथ [10]सगुरु ससुत आणविला, ।
स्वविचार 'तिघांसि [11]तिघी कन्या द्याव्या' हा जाणविला. ॥ गातां० ॥ ३०
श्रीसीता रामासि वरी, ती मांडव्याख्या भरता, ।
देति ऊर्मिला श्रुतकीर्त्या[12]व्हा सुमति [13]यमातें [14]वरता. ॥ गातां० ॥ ३१
वर्षे नृप पौरबळांवरिहि [15]स्वंबरमणिकनकांहीं, ।
हर्षे रघुप वदे नातें बहु, वांछा अणिक न कांहीं. ॥ गातां० ॥ ३२
दासी दास तुरग रथ हस्ती वस्त्रें रत्नें कनकें, ।
विपुळ दिलें प्रिय जामात्यांतें [16]परमवदान्यें [17]जनकें. ॥ गातां० ॥ ३३
प्रथमचि कन्यादानसुनिश्चय करवुनि [18]कौशिक गेला, ।
जनकहि सानुज राम प्रभुही विरहें व्याकुळ केला. ॥ गातां० ॥ ३४

१. स्वमख+अवन+सती+उद्धरणचरित=आपल्या यज्ञाचें रक्षण आणि पतिव्रतेचा (अहल्येचा) उद्धार हें कृत्य. २. सांगितलें. ३. धातु. (कथिल.) येथें हा उपमालंकार जाणावा. ४. इच्छा. ५. योद्धे. ६. तो चाप. ७. अयोध्येहून निघाल्यापासून पंधरावे दिवसीं रामानें शिवधनुर्भंग केला व जनकानें दशरथाकडे दूत पाठविले. (बालकांड–सर्ग ६७ श्लोक २०-२७ पहा.) ८. नारद. ९. शुष्क करायासाठीं. १०. वसिष्ठ वामदेव हे गुरु व भरतशत्रुघ्न पुत्र यांसह. ११. लक्ष्मणास ऊर्मिला, भरतास मांडवी आणि शत्रुघ्नास श्रुतकीर्ति–अशा तीन कन्या सीरध्वजानें दिल्या. १२. नांव. १३. लक्ष्मण आणि शत्रुघ्न यांतें. १४. पतिपणा, पतित्व. १५. उत्तम वस्त्रें रत्नें आणि सुवर्णें यांनीं. १६. उत्तम उदारानें. १७. सर्ग ७४ श्लोक २-६ पहा. १८. विश्वामित्र २६ वे दिवशीं गेला. (सर्ग ७४ श्लोक १ पहा.)

घेइ सकळ [1]सकळत्रसुत **नृप जन**काज्ञेतें परते, ।
[2]परतेजा **भा**र्गव भेटे त्या गमले नम्रहि [3]पर ते. ॥ गातां० ॥ ३५
**वि**धि[4]जन्मद [5]तन्मद [6]हरि, पावे **सा**केतातें हर्षें, ।
प्रभुच्या सुयशें सुजन निववि [7]जैसे [8]बर्ही [9]वर्षें. ॥ गातां० ॥ ३६
निजनगरासि **यु**धाजित् मातुळ ने [10]सानुज **भ**रतातें, ।
निश्चय केला स्थापायाचा **रा**मीं भूभर तातें. ॥ गातां० ॥ ३७

---

## अयोध्याकांड.

(साकीवृत्त.)

देव म्हणति, '**द**शवदन वधावा प्रभु या कार्या [11]नरें हा, ।
नृपदयिता **कै**केयीच म्हणो [12]यीं ती आर्या न रहा.' ॥ गातां० ॥ ३८
**ब्र**ह्मादि अमर अशा विचारें [13]**मं**थरिकामति हरिती, ।
करि ती **कै**केयीधीभेदा, लोभा झाली धरिती. ॥ गातां० ॥ ३९
[14]वरयुग देऊं केलें होतें ती अडवुनि तें मागे, ।
सत्यव्रतरतमति पति, सतिचें वाक्य करावें लागे. ॥ गातां० ॥. ४०
अभिषेकोत्सवसमयींच रुसे, नृप साम वदे, विनवी, ।
'यश न मळिव, कळिव प्रिय, दाखिव रीति मज न देवि! नवी'॥ गातां० ४१

---

१. स+कलत्र+सुत=सह+पत्नी+पुत्र=सस्त्रीकपुत्रांसह. २. मोठा तेजस्वी. ३. शत्रु. ४. ब्रह्मदेवाचा पिता. ५. त्या भार्गवरामाचा गर्व. ६. या पद्यांत 'हरि' 'पावे' अशीं जीं रूपें योजिलीं आहेत त्यांचा प्रयोग येथें शुद्ध भूतकाळीं केला हें उघड आहे. याविषयीं सामान्य नियम असा दिसतो कीं, ज्या रूपांचा प्रयोग गद्यात्मक ग्रंथांत रीतिभूतकाळीं होतो, त्या रूपांचा प्रयोग पद्यात्मक ग्रंथांत बहुधा वर्तमानकाळीं अथवा शुद्ध भूतकाळीं होतो; जसें:—'**पूजी** नरदेवातें **करि** तेव्हां स्ववपु दीपकज्योती.' अशीं अनेक उदाहरणें आहेत. ७. हा येथें उपमालंकार जाणावा. ८. मोर. ९. पर्जन्यवृष्टीनें. १०. शत्रुघ्नासह. (सर्ग ७७ श्लोक १६-१९ पहा.) ११. मनुष्यदेहधारी प्रभु. (विष्णु.) १२. रामा. १३. ही विरोचनकन्या. रावणवधरूप देवकार्य साधण्यासाठीं देवांनीं या कुब्जावेषधारिणी अप्सरेला केकयराजाकडे पाठविलें होतें. केकयराज अश्वपति यानें दासी म्हणून हिला कैकेयीपाशीं ठेविलें होतें. (सर्ग ७ श्लोक १-३० पहा.) १४. इद्राचें तिमिध्वज नामक दैत्याशीं युद्ध चाललें असतां दशरथानें इंद्राचा पक्ष धरून मोठें युद्ध केलें त्यांत तो क्षतदेह होऊन मूर्च्छित पडला. तेव्हां कैकयीनें दशरथाला रणभूमीपासून दूर नेऊन सावध केलें म्हणून संतुष्ट होऊन त्यानें तिला दोन वर देण्याचें वचन दिलें. [अध्याय ९.]

ती बोले, 'हे दोन वर प्रिय घे, हें हर्षेंच वदा, ।
**भरत** असो युवराज, **राम** वनवासी वर्षें चवदा.' ॥ गातां० ॥ ४२
भूप म्हणे, 'सर्वस्वहि दयिते! घे, प्रेमा [1]आठीव, ।
या वृद्धीं करुनि कृपा, न वनीं **रामा**तें पाठीव.' ॥ गातां० ॥ ४३
नकळे **कै**केयी सुतशोकें पतिचें मन घाबरवी, ।
प्रभु वनवास वरी, दे कीर्ति स्वपित्या [2]अनघा बरवी. ॥ गातां० ॥ ४४
[3]गुरुसत्यव्रत संरक्षाया **लक्ष्मणसी**तासहित, ।
प्रभु पितृपद नमुनि निघे, द्याया साधुनि भीतास हित. ॥ गातां० ॥ ४५
बळकटसुतशो[4]केंव्याघ्र धरी नृपहरिणाचें नरडें, ।
आलें फार **अयोध्ये**ला, परि **कै**केयीला न रडें. ॥ गातां० ॥ ४६
प्रभुसि **सु**मंत्र सचिव राजरथीं राजाज्ञेनें वाहे, ।
साहे पुरजन न क्षण विरह, प्रभुतें वेढुनि राहे. ॥ गातां० ॥ ४७
क्षुधिततृषितनिद्रितपौरांतें सदयहि ठकवुनि सोडी, ।
गोडी प्रभुकृत वंचन दावी बहु, अमृत [5]निपट थोडी. ॥ गातां० ॥ ४८
भेटे प्रभु भक्त सखा जो त्या स्वविरहभीत[6]**गु**हातें, ।
[7]वांटे अमृत चकोरा भरवी प्रेमें [8]शीतगु हातें. ॥ गातां० ॥ ४९
[9]वटदुग्धें रचुनि जटा होय प्रभु सानुज तापससा, ।
[10]वल्कलजटाधर मूर्ति ध्याल्यां हरि तद्भवताप ससा. ॥ गातां० ॥ ५०
[11]गुरुसचिवासि '[12]गुरुकडे जा' हें कथि बहु मानवरीती, ।
प्रभु दावी जी साधुसभेंत स्तुति बहुमान वरी ती. ॥ गातां० ॥ ५१
ज्याची कीर्ति सुदुस्तरभवजलनिधिपतितांची [13]सुतरी, ।
त्यांसि सखा **गु**ह निजनौकेनें **गं**गापारीं उतरी. ॥ गातां० ॥ ५२

---

१. स्मरण कर. २. निष्पापा. ३. बापाचें सत्यव्रत. ४. हें रूपकालंकाराचें उदाहरण आहे. येथें सुतशोक आणि नृप या उपमेयांशीं अनुक्रमें व्याघ्र आणि हरिण या उपमानांचा अभेद वर्णिला आहे. ५. निस्तुक, केवळ. ६. शृंगवेरपुरीं निषादराजा गुह रामाला भेटला. (सर्ग ५० श्लोक २६ पहा.) ७. हा येथें उत्प्रेक्षालंकार जाणावा. ८. चंद्र. (शीत) (थंड) आहेत गो (किरण) ज्याचे तो शीतगु=चंद्र. ९. वडाच्या चीकानें. १०. वल्कलजटाधर मूर्तीचें ध्यान करणारांस [तो प्रभु राम] हरि (सिंह) [होय, व] तद्भवताप (त्या ध्यान करणारांचा–भजकांचा संसारताप) हा ससा (सशा-प्रमाणें होय.) ११. सुमंत्रातें. १२. नृपाकडे. १३. उत्तम नौका.

वंदी प्रभु **प्र**यागीं प्रेमें [1]तातसख[2]**भ**रद्वाजा, ।
त्या मुनि सुखवी वेद कवि म्हणति नित्य [3]सुखभरद्वा ज्या. ॥गातां०॥ ५३
**श्री**स उतरिती **य**मुनेंत प्रभु काष्ठमय करिति [4]तापा, ।
जे नेती भवसागरपारीं, नामेंचि हरिति तापा. ॥ गातां० ॥ ५४
करिति **चि**[5]त्रकूटस्थमुनींसीं प्रभु सहवास, वनाचे ।
गुण घेती पावुनि, ऋषिगणसा [6]बहुमह **वा**सव नाचे. ॥ गातां० ॥ ५५
तें [7]प्रभुवृत्त **गु**हपुरुषकथित श्रवण करि सचिव देहें ।
विकळें परते स्वपतिस व्हाया मुदित अरिसचि वदे हें. ॥ गातां० ॥ ५६
'सुतशोकें मरण' असा कळवुनि **कौ**सल्येतें [8]शाप, ।
'**राम राम**' म्हणतचि [9]असु सोडी जोडी [10]सुगति [11]क्ष्माप. ॥ गातां० ॥ ५७
[12]तैलीं स्थापुनि [13]नृपवपु [14]गुरुनें त्वरित **भ**रत [15]आणविला, ।
मातेनें येतांचि तया तो [16]स्वकृतानय जाणविला. ॥ गातां० ॥ ५८
**कै**केयीतें **भ**रत [17]परमगुरुविरहाकुळतनु गांजी, ।
गुरुघात करुनि शोकीं बुडवी [18]दुष्प्रज्ञा अनुगां जी. ॥ गातां० ॥ ५९

---

१. बापाचा (दशरथाचा) मित्र. [तातसख यांतील सखि हा शब्द 'राजाहःसखिभ्यष्टच्' या सूत्राधारें अकारान्त झाला आहे.] २. सर्ग ५४ श्लोक ४-९ पहा. ३. सुखातिशयाचें द्वार. ४. नदींत तरण्यास्तव काष्ठमय केलेलें साधन तापा, नौका, इत्यादि. असेंच वर्णन मूळांत आहे. (सर्ग ५५ श्लोक १४ पहा) ५. प्रयागापासून दहा कोसांवर चित्रकूट पर्वत होता तेथें राम आले. (सर्ग ५४ श्लोक २८-२९, सर्ग ५५ श्लोक १ पहा.) ६. मोठा उत्साह. ७. तें गुहपुरुषकथित प्रभुवृत्त सचिव श्रवण करी; विकळें देहें स्वपतिस तो परते, [व] अरिसचि मुदित व्हाया हें वदे—असा अन्वय; याचा भावार्थ:—गुहाचे लोकांनीं (नावाड्यांनीं) सांगितलेलें रामाचें वर्तमान ऐकून तो सुमंत अमात्य दशरथाकडे परत आला; पण दशरथ मेला असल्यामुळें त्यानें जें वर्तमान सांगितलें तें कैकयीस आनंदासच कारण झालें. ८. श्रावण मुनीच्या पित्याचा शाप. ९. प्राण. १०. मोक्ष. ११. पृथ्वीपति दशरथ. (राम अयोध्येहून गेल्यावर साहावे दिवसीं मध्यरात्रीस दशरथ मरण पावला. (सर्ग ५७ श्लोक २ टीका, सर्ग ६२ श्लोक ४, आणि सर्ग ६४ श्लोक ७८ पहा.) १२. पुत्रांपैकीं कोणी समीप नसल्यामुळें सचिवांनीं राजाचें प्रेत तैलपूर्ण कटाहांत घालून राखून टेविलें होतें. [सर्ग ६६ श्लोक १३.] १३. दशरथाचें शरीर. १४. वसिष्ठानें. १५. राम गेल्यापासून आठवे म्हणजे राजा दशरथ मृत झाल्यानंतर एक दिवस व एक रात्र गेल्यावर भरतास आणण्यासाठीं दूत पाठविले. (सर्ग ६८ श्लोक ११-२२.) भरत अजोळाहून (राजगृह नामक नगराहून; सर्ग ६७ श्लोक ७) अयोध्येस आठवे दिवसीं आला. (सर्ग ७१ श्लोक १८, सर्ग ७२ श्लोक ८ पहा.) १६. आपण केलेला अन्याय. १७. पित्याच्या मरणानें अत्यंत व्याकुळ झाला देह ज्याचा असा. (भरत.) १८. दुर्मति.

त्या **मंथरेसि** मारित होता **शत्रुघ्न** क्रोधानें, ।
**भरत** निवारी त्यातें प्रभुमतसुयशस्करबोधानें. ॥ गातां० ॥ ६०
करुनि पित्याचें उत्तरकार्य प्रभुसि पुरा आणाया, ।
**भरत** निघे, 'सस्वजन' म्हणे 'मी नत घालिन आणा या.' ॥ गातां०॥६१
धरि **गंगेचा** घांट होय **गुह** सिद्ध कराया युद्ध, ।
मग तो प्रभुचा भक्त सखा दे वाट वाटतां शुद्ध. ॥ गातां० ॥ ६२
सिद्धिबळें सबळा सत्कारी **भरद्वाज** कैसा या, ।
नुमजुनि सोडिल मुनि दावी त्या सिंहासन बैसाया. ॥ गातां० ॥ ६३
भद्रासन वंदुनि तत्पार्श्वीं **भरत** कृतांजलि राहे, ।
पाहे साश्रु मुनि शिरीं त्याच्या आशीरत्नें वाहे. ॥ गातां० ॥ ६४
मुनि आज्ञा दे नमुनि तयातें प्रभुतें भेटे **भरत**, ।
'न रत वनांत' म्हणे 'तापससा, **साकेता** ये परत.' ॥ गातां० ॥ ६५
**भरत**कथित ताताची वार्ता **सीता**लक्ष्मणसहिता ।
प्रभुला 'हा !' वदवी, प्रकट करी गुरुवत्सलता [10]महिता. ॥ गातां० ॥ ६६
**ब्रह्म** स्वीकारी पुत्रत्व प्रेमें दे पिंड [11]विर्ल्या, ।
क्षाळी नयनजळें तत्कर्मा संसारीं [12]हिंडविल्या. ॥ गातां० ॥ ६७
हठ करितां प्रभु [13]बोधी **भरता** भक्ता परमा ज्ञात्या, ।
'म्यां त्वांही जो गुरु यश द्यावें वंदुनि [14]चरमाज्ञा त्या.' ॥ गातां० ॥ ६८
**भरत** वदे, 'चरमांतीं दर्शन [15]सरं दे, हा हो मीन, ।
चुकतां दिनहि [16]दहनकुंडीं मीं नरदेहा होमीन. ॥ गातां० ॥ ६९

---

१. सर्ग ७८ श्लोक ५-२१ पहा. २. अयोध्येस. ३. शपथ. (आज्ञा=आण.) ४. रामा. ५. येथें 'भरत' या कर्तृपदाचा अध्याहार जाणावा. ६. सर्ग ८३ श्लोक १९ पहा. ७. दुसऱ्या दिवसीं प्रहर दिवसास गुहानें भरताला वाट दिली तेव्हां तो नदी उतरला. (सर्ग ८९ श्लोक २१.) ८. अणिमादि अष्टसिद्धींच्या बळानें. ९. सिंहासन. भद्रासनाचें लक्षण 'देवीपुराणां'त आहे तें असें:–'हैमं च राजतं ताम्रं क्षीरवृक्षमयं च वा । भद्रासनं प्रकर्तव्यं सार्धहस्तसमुच्छ्रितम् ॥ सपादहस्तमानं च राज्ञो मांडलिकांतरात्.' याचें लक्षण वराहसंहितेंत आहे:–'त्रिविधस्तस्योच्छ्रायो हस्तः पादाधिकोऽर्धयुक्तश्च । मांडलिकानंतरजित्समस्तराज्यार्थिनां शुभदः ॥' [रंगनाथकृत विक्रमोर्वशीयनाटकटीका–पृष्ठ १३९ पहा.] १०. पूजनीय, वर्णनीय, स्तवनीय. ११. विणाऱ्या, प्रसवणाऱ्या (पित्याला). १२. संसारांत हिंडविला (हिंडविणाऱ्या, भ्रमण करविणाऱ्या) त्याच्या कर्मा क्षाळी. १३. सर्ग १०५ यांत रामाचा भरतास बोध आहे. १४. अखेरची आज्ञा. १५. सरोवर. १६. अग्निकुंडांत.

श्रीचरणानुगृहीता द्याव्या बा! पादुका नयातें ।
धर्मातें पाहुत रक्षुत जें बापा! दुकान यातें.' ॥ गातां० ॥ ७०
देउनि अभय पादुका सांत्वुनि भरत पुरा पाठविला; ।
पाठ विलाप जया तो प्रभुनें प्रेमळ बहु आठविला. ॥ गातां० ॥ ७१
नंदिग्रामीं[1] वल्कजटाधर फळशाकाशी[2] राहे, ।
श्रीपादुका पदीं स्थापुनि तें राज्य तयांवरि वाहे. ॥ गातां० ॥ ७२
बसतां निकट पुन्हा स्वजनागम ऐसें चिंतुनि चित्तीं, ।
भेटे[3] प्रभु अत्रिस जो स्वजनीं जैसा लोभी वित्तीं. ॥ गातां० ॥ ७३
अनुसूयोक्ति[4] सुधेचा सर्वहि हरि गर्व स्वादुहिता,[5] ।
श्री केली पात्र तपःमुक्ता जसि सर्वस्वा दुहिता.[6] ॥ गातां० ॥ ७४

## अरण्यकांड.

(साकीवृत्त.)

ऋषिवृंदासि म्हणे प्रभु, 'निर्भय वधुनि विराधा[7] राहें.' ।
आधार प्रभुयश होय जना परमनिराधारा हें. ॥ गातां० ॥ ७५
प्रभुसि समर्चुनि शरभंग[8] मुनि ज्वलनीं वपु करि सर्पी,[9] ।
वसुनि विमानीं वरि सुगतिस, हें प्रभुयश कविशत तर्पी.[10] ॥ गातां० ॥ ७६
निववुनि सुतीक्ष्णादि[11] मुनि निजनुतिसुरुचि[12] नवि प्रभु लावी; ।
म्हणति, 'त्यजुनि प्रभुयश, अमृता जीभ न' विप्र 'भुलावी.' ॥ गातां० ॥ ७७
यत्तत्व कथाया पुरति असे योजति न रवें[13] पुराणा, ।

---

१. सर्ग ११५ श्लोक २-२१ पहा. २. फळें आणि शाका (भाज्या) यांतें अशन (भक्षण) करणारा. ३. सर्ग ११७ श्लोक ५ पहा. ४. अनुसूयेचा सीतेसह संवाद (सर्ग ११७). ५. मधुर आणि हितप्रद. ६. कन्या. ७. क्रौंचावह नामक वनांत राहणारा राक्षस. विराध हा जव+शतऱ्हदा यांचा पुत्र. याला रामलक्ष्मणांनीं बाण घालून मारिलें. हा मूळचा तुंबुरु नामक गंधर्व असून वैश्रवणाचे शापानें राक्षस झाला. रामबाणानें गतप्राण होतांच हा शापमुक्त झाला. [रामायणें—दुसरा भाग, पृष्ठ ९ टीप ९ पहा. ८. रामायणें—दुसरा भाग, पृष्ठ ९४ टीप १२ पहा. विराधाचे स्थानापासून शरभंग मुनीचा आश्रम सहा कोसांवर होता. [सर्ग ४ श्लोक २०-२१]. ९. तूप. शरभंगानें रामाचें दर्शन झाल्यावर अग्निप्रवेश केला (सर्ग ५). १०. संतुष्ट करी. ११. शरभंग आणि सुतीक्ष्ण यांचे आश्रम चित्रकूटावर अथवा त्या पर्वताचे समीपच होते असें दिसतें (सर्ग ७). सुतीक्ष्ण हा अगस्त्यशिष्य होय. १२. आपल्या स्तवनाची उत्तम गोडी. १३. शब्द. पुराणग्रंथ ज्याचें वर्णन करूं शकत नाहींत—असा भाव.

शस्त्रें[1] देवुनि हर्षविला तो घटजें[2] नरवपु राणा. ॥ गातां० ॥ ७८
दशरथसख गृध्रेंद्र प्रभुला भेटे, कळवी नातें, ।
प्रभुच्या गुरुविरहजतापातें मग कां पळवीना [4]तें. ॥ गातां० ॥ ७९
‘गोदावरीतटीं [5]पंचवटी तेथें वस वत्सा! जें ।
प्रिय तें कळिव करिन, [6]सुसरःस्थितनवसारसवत् साजें. ॥ गातां० ॥ ८०
प्रभु त्यासि म्हणे, ‘धर्मे आम्ही सुत, हे बापा! सून, ।
तूं राजा [7]दंडकगहनाचा रक्षीं [8]यापासून.’ ॥ गातां० ॥ ८१
प्रभुसि जटायु[3] म्हणे, ‘स्वस्थ रहा, जय जोडुनि जा गेहा, ।
न वन तातगृह हें, निद्रेतें [9]जळ सोडुनि जागे [10]हां.’ ॥ गातां० ॥ ८२
नमुनि पुसुनि ते त्या ताताला प्रेमामृतकलशाला, ।
जाउनि पंचवटींत रहाती रचुनि रुचिर [11]दलशाला. ॥ गातां० ॥ ८३
कांहीं काल सुखानें क्रमिला तों [12]शूर्पणखा आली, ।
झाली कामार्ता प्रभुरूपें दुर्मति तीच न [13]धाली. ॥ गातां० ॥ ८४
ज्याचें तत्त्व [14]असुगम युक्तिशत जरि कवि लाख [15]विवरिती, ।
त्या भुलवाया कपटें सुंदरपण बहु दाखवि वरि ती. ॥ गातां० ॥ ८५
कपटप्रेमवती बरवीहि प्रभुसि नको विदरी ती, ।
हंस साररुचि नसतां गाते वरिलि न कोविदरीती. ॥ गातां० ॥ ८६
ती प्रार्थी, ‘न बरी स्त्री पहिली, बहु बरवी मी दुसरी, ।
रमवि न गमवि न धन्य, वरा मज, जाणे [16]सुकळाकुसरी.’ ॥ गातां० ॥ ८७
प्रभुवर म्हणे, ‘मदनुजासी तूं वरीं पुरुष सुंदरि! तें ।
या सुरतरुकुसुमें पाडावें पुरुषांतर कुंद रितें.’ ॥ गातां० ॥ ८८

---

१. वैष्णवचाप, ब्रह्मदत्त नामक शर, इत्यादि (सर्ग १२ श्लोक ३१-३७). २. अगस्त्यमुनीनें. सुतीक्ष्णाचे आश्रमापासून अगस्त्याचा आश्रम पांच योजनांवर होता. [सर्ग ११ श्लोक ३७-४१.] ३. जटायु याचें दर्शन रामाला पंचवटीप्रवेश केल्यावर झालें. (सर्ग १४.) ४. नातें. ५. अगस्त्याश्रमापासून पंचवटी दोन योजनें दूर होती. (सर्ग १३ श्लोक १३-१४.) पंचवटसमूहास्तव या स्थानाला पंचवटी असें नांव पडलें. ६. उत्तम सरोवरांत असणाऱ्या नूतन कमळा(सारसा)प्रमाणें. ७. दंडकारण्याचा. ८. आजपासून. ९. जळ सोडणें=पाणी सोडणें=त्याग करणें, सर्वस्वी सोडून देणें. [कोणतेंही दान केलें असतां, त्या देय पदार्थावरील दात्याची स्वत्वनिवृत्ति व्हावी म्हणून जळ सोडण्याचा प्रचार आहे त्यावरून जळ सोडणें म्हणजे सोडून देणें असा अर्थ निष्पन्न झाला.] १०. मी गृध्रराज. ११. पर्णशाला. १२. रामायणें—भाग दुसरा, पृष्ठ ८५ टीप ८ पहा. १३. तृप्त झाली. १४. दुर्बोध. १५. प्रतिपादन करतात. १६. चतुराई.

प्रभुवचनें ती प्रभुसि तसेंचि प्रार्थी कामांधा त्या ।
त्यजुनि सुधांगुळि[1] सुरुचि[2] सुरांगुलि देइल कां मांधात्या[3]? ॥ गातां० ॥ ८९
लक्ष्मण म्हणे, 'स्वामिनी हो, जा पावें मुदतिशयातें[4], ।
पडतां गळां, प्रभु स्वीकारिल[5] तुझिया सुदति! शयातें[6]'. ॥ गातां० ॥ ९०
केला बोध वरुनि गुरुसी सुख यश वाढिव हा तेणें, ।
उच्चैःश्रव्याप्रति[7] पुन्हा ती गेली गाढिव हातेणें[8]. ॥ गातां० ॥ ९१
समजे न विनोद, प्रभुहरितें[9] विनवि जडा ती कुतरी, ।
हास्यें श्रीतें लंघूं पाहे जसि गंगेतें कुंतरी[10]. ॥ गातां० ॥ ९२
आर्याज्ञेनें[11] धरिलि लक्ष्मणें हंसें जैसी कोंकी[12], ।
खड्गें कर्ण घ्राण खंडितां हर्पति भीतिहि नौकी[13]. ॥ गातां० ॥ ९३
श्रुतिनासाहीन म्हणे, 'रुचिरा जी हरिची[14] हीनें[15] कटी' ।
गुर्वपराधें स्वसा होय हरिच्या[16] अरिची ही नकटी. ॥ गातां० ॥ ९४

---

१. अमृतरूप अंगुली. २. सुधांगुळि त्यजुनि सुरांगुलि (इंद्राची अंगुलि) मांधात्या सुरुचि (उत्तम गोडी) कां देइल?—असा अन्वय. ३. इक्ष्वाकुकुलोत्पन्न एक राजा. मां धास्यति (मला पिईल) असें म्हणून इंद्रानें आपली अंगुलि याच्या मुखांत घातली म्हणून यास 'मांधाता' असें नांव पडलें. हा आपल्या बापाच्या (युवनाश्वराजाच्या) कुक्षींतून बाहेर आला म्हणून मातृस्तन्यपान यास नव्हतें. याची जन्मकथा अशी आहे:—युवनाश्व राजास शंभर स्त्रिया होत्या, परंतु त्यांतून कोणासही संतति नव्हती. यानें संतति होण्यासाठीं पुष्कळ यज्ञ केले; पण कांहीं फळ प्राप्त झालें नाहीं, असें पाहून यानें आपला राज्यकारभार मंत्र्यांच्या हातीं देऊन अरण्यगमन केलें. एके दिवशीं रात्रीं फिरत फिरत युवनाश्व भार्गवाश्रमीं आला. तेथें रात्रीं त्याला तृषा लागली, तेव्हां पाणी शोधूं लागला, तों तेथेंच त्याला एक उदककलश सांपडला. त्यांतील उदक प्राशन करून तो निजला. प्रातःकालीं ऋषि उठल्यावर पाहतात तों कलश रिकामा आहे, तेव्हां त्यांतील जल कोणी प्राशन केलें ह्याची विचारपूस केली, तेव्हां युवनाश्वानें 'मी जल प्राशन केलें' असें सांगितलें. तें पाणी अभिमन्त्रित असून पुत्रफलप्रद होतें. त्याप्रमाणें युवनाश्वास गर्भ राहिला व तो गर्भ पूर्णकाल होतांच कुक्षिभेद करून बाहेर आला. ४. आनंदाच्या अतिशयातें. ५. शयातें स्वीकारिल=पाणिग्रहण करील, विवाह करील. ६. हातातें. ७. इंद्राचा अश्व, चवदा रत्नांतील एक. ८. कामाच्या इच्छेनें. [हातेण=घोडीची अथवा खेचरीची कामेच्छा.] ९. प्रभुसिंहातें. [हा येथें रूपकालंकार जाणावा.] १०. वाईट नौका. ११. रामाच्या आज्ञेनें. [रामानें शूर्पणखेच्या पाठीवर लिहून तिला लक्ष्मणाकडे पाठविलें अशी कथा वाल्मीकिरामायणांत नाहीं. 'या राक्षसीला तूं विरूप कर' असें रामाचें वचन लक्ष्मणास आहे. सर्ग १८ श्लोक १९-२२.] १२. काकस्त्री. [हा येथें उपमालंकार जाणावा.] १३. देव. १४. सिंहाची. १५. कमी योग्यतेची. १६. विष्णुशत्रूची बहीण.

जाय दटावुनि रडत राक्षसी, तद्बंधु खर क्षोभे, ।
[1]समनुसहस्रबळा त्या वधुनि प्रभु [2]पुरहरसा शोभे. ॥ गातां० ॥ ९५
कुमति जनस्थानातें बुडवुनि बुडवाया लंकेला, ।
भेटुनि मुख दशवदना दावी ती न धरुनि शंकेला. ॥ गातां० ॥ ९६
सांगे, 'पंचवटींत निरखिलें अतुळ नरस्त्रीरत्न, ।
तें द्याया साधुनि तुज भोक्त्या म्यां केला बहु यत्न. ॥ गातां० ॥ ९७
तद्भ्रात्यानें केल्यें तव भय न धरूनि [3]विनासा हे, ।
[4]मानी पळही अपमानातें नच मृत्युविना साहे.' ॥ गातां० ॥ ९८
खवळुनि दशमुख करुनि कनकमृग [5]दभ्रमहा [6]मारीचा ।
जाय पडाया वदनीं दाटुनि सभ्रम हा [7]मारीच्या. ॥ गातां० ॥ ९९
कपटहरिण जाय पुढें, मागें पाप चापधर राहे, ।
स्वाश्रमपदीं तयातें फिरतां सीता सहसा पाहे. ॥ गातां० ॥ १००
प्रभुसि म्हणे, 'नाहींच कनकमय मृग लोकांत असा या, ।
द्यावाचि धरुनि मज हा उचित [8]स्वसदोकांत असाया.' ॥ गातां० ॥ १०१
प्रभु उटजीं बंधुसि ठेवुनि घे शर [9]कोदंड करांनीं, ।
जाय मृगामागें [10]रुद्राचा धरि तो [11]दंडक रानीं, ॥ गातां० ॥ १०२
भिउनि कपटमृग करुनि पवनसम [12]जवें नव नीच पळाला, ।
प्रभु शर सोडी लागे तो [13]अतिजवन वनीं चपळाला. ॥ गातां० ॥ १०३

---

१. चौदा हजार सैन्य. २. त्रिपुरारिसम. ३. नासारहित. ४. अभिमानी पुरुष. हें अर्थ सुभाषितरूप आहे. ५. अल्पतेजा. (अमा मारीच.) ६. भाग दुसरा पृष्ठ ४ टीप १७, व पृष्ठ ६९ टीप ११ पहा. ७. महामारीच्या. ८. आपल्या उत्तम गृहीं. [स्व+सद्+ओक=स्वीय+उत्तम+गृह.] ९. धनुष्य. १०. ही कथा अशी आहे—सरस्वती उत्पन्न केल्यावर ब्रह्मदेव तिचें रूप पाहून तिचा अभिलाष करूं लागला. तेव्हां तिनें भीतीनें रोहिणीचें म्हणजे हरिणीचें रूप घेतलें. तें पाहून ब्रह्मदेव मृगाचें म्हणजे हरिणाचें रूप घेऊन तिचे पाठीस लागला. ब्रह्मदेव हें दुष्कर्म करीत आहे असें पाहून सर्व देवांनीं आपापल्यांतील क्रूर अंश देऊन त्यांपासून रुद्र देव उत्पन्न केला. नंतर त्या रुद्रानें व्याधरूप धारण करून त्या मृगाचें मस्तक कापिलें, तें आकाशांत 'मृगशीर्ष' या नांवानें नक्षत्रांत प्रसिद्ध आहे. हरिणी झालेली सरस्वती 'रोहिणी' नांवानें व रुद्र 'लुब्धक' या नांवानें आकाशांत तारारूपानें प्रसिद्ध आहे. रोहिणी, मृगशीर्ष, व लुब्धक या ताऱ्यांचा संबंध दाखविणारी ही कथा ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांत आहे. वनपर्वांतील पुढील वचनांत या कथेचा उल्लेख आढळतो—'अन्वधावन्मृगं रामो रुद्रस्तारामृगं यथा.' (अध्याय २७८ श्लोक २०.) रुद्र (रडविणारा—धात्वर्थ) हा संहार करणारा शिव होय. ११. रीति. १२. वेग. १३. अत्यंत वेगयुक्त.

'हा सीते! हा लक्ष्मण!' ऐसें मोठ्यानें आरडला, ।
खळहि धन्य कीं 'आइ बा!' म्हणुनि तो न करुनि आ रडला.॥ गातां० १०४
[1]अत्यार्तप्रभुकृत शब्द असें मानुनि झाली भीता, ।
'बा सौमित्रे! धांव, प्रभुला पाव' म्हणे श्रीसीता. ॥ गातां० ॥ १०५
लक्ष्मण विनवी,'आर्ये! स्वस्थ प्रभु आहे, हे[2]मा या ।
बेगड, परशक्ति न जिंकिल त्या हरिणाची हे माया.' ॥ गातां० ॥ १०६
क्रोधें बोले सीता, 'माझा अभिलाप मनीं धरिसी, ।
प्राणव्य[3]सनीं तरिच उपेक्षा मन्ना[4]थाची करिसी. ॥ गातां० ॥ १०७
[5]विंगळ मणि म्हण सर्वांहि विटिव संता पाप्या वेंच, ।
म्यां विप अयशें न भजाया चिर संतापा प्यावेंच. ॥ गातां० ॥ १०८
तापें वि[6]घरे मन, निघ रे! या न गृहांत [7]असें, जाची' ।
व्यसनीं तत्काळ पडाया ती भक्तासि असें [9]जाची. ॥ गातां० ॥ १०९
आर्येतें नमुनि निघे लक्ष्मण 'हाय!' म्हणत शोकानें, ।
तों श्रीतें हरि, हरिच्या सभयें आयकिला जो कानें. ॥ गातां० ॥ ११०
'हा रघुवर! हा लक्ष्मण!' ऐसी हाक तिची परिसून, ।
पावे श्वशुर [10]जटायु, तयातें ती अंजलि करि सून. ॥ गातां० ॥ १११
दे अभय, विरथ करि अरिस, तिला रोधूनि नभा [11]जीन ।
सोडवि म्हणे, 'अरे! अंडीं कां शोधूनि न भाजीन'. ॥ गातां० ॥ ११२
[11]खड्गें पक्ष च्छेदुनि पाडुनि संमूर्छित खगपतितें, ।
स्कंधीं वाहुनि नेली देवी दशकंठें मग [12]पतितें. ॥ गातां० ॥ ११३
ऋष्यमूकगिरिवरि पाहुनि कपि पांच तयांतचि [13]नग ती, ।
[14]जगतीजा सोडी कीं प्रभुला आपुलि मोहिल न गती. ॥ गातां० ॥ ११४
खळ शतयोजन सिंधु विलंघुनि लंकेतें तो पावे, ।
श्रीस [15]अशोकवनीं रोधी, ज्या कर्में यति कोपावे. ॥ गातां० ॥ ११५

---

१. अत्यंत पीडित. २. या हेमा (सुवर्णाला, रामाला) बेगड (मारीचरूप बेगड) जिंकणार नाहीं. ३. संकटीं. ४. माझ्या नाथाची. (रामाची.) ५. निखारा, विस्तव. ६. विरम होई. ७. राहें. ८. गमन कर. ९. पीडी. १०. वृद्धजटायु. ११. सर्ग ५१ श्लोक ४२-४३ पहा. १२. अधः-पातोन्मुख पापी (रावणानें). १३. अलंकार. (सर्ग ५४ पहा.) १४. सीता. १५. अशोकवन या नांवाच्या उद्यानांत. [अशोकवनिकान्याय=रावणानें सीतेस अशोकवनांत नेऊन ठेविलें या प्रसिद्ध पुराणकथेवरून हा न्याय उत्पन्न झाला आहे. रावणानें सीतेला ठेवण्यासाठीं हेंच वन कां पसंत केलें

फिरतां गहनीं[1] लक्ष्मण वंदी साश्रु तया आर्यातें[2], ।
कळवी वदली पदलीना जें त्यजुनि दया आर्या[3] तें. ॥ गातां० ॥ ११६
प्रभु परिसुनि तें स्त्रैणतसाचि[4] व्याकुळ होय वदे 'हा!', ।
उटजीं[5] दयितेसि तसा पाहे आपुलियाहि न देहा. ॥ गातां० ॥ ११७
सांजलि साश्रु पुसे असकृत्[6] प्रभु, 'देखिलि गोदावरि! तीं? ।
तुज भेटुनि दिवसांत दहादां जी बहुमोदा[7] वरिती. ॥ गातां० ॥ ११८
वत्सा! त्वांहि पुसावें पुनरपि विनवुनि तुळसी लवती, ।
जी सुमति तुला देखिलि काय सुगात्री कुलशीलवती? ॥ गातां० ॥ ११९
कनकमृग न तो राक्षस वधिला म्हणुनि देवि! न रुसा हो! ।
मरुसा[8] हो जलधि म्हणा नंदनविरह कल्पतरु साहो. ॥ गातां० ॥ १२०
वत्सा! वनवासींहि मला जी नित्य नवा उत्सव दे, ।
न रुसावीच जनकजा चुकतां दासहि गतकुत्स वदे. ॥ गातां० ॥ १२१
हिंस्त्रें[9] वधिली तरि रुधिराचा एकहि न दिसे बिंदु, ।
इंदुमुखी नेलीच पलाशें[10] त्या जग शापू निंदु.[11]' ॥ गातां० ॥ १२२
प्रभु धरि विषयिजनविडंबन[12] जें त्यास्तव नव सोंगातें, ।
कवि म्हणति, 'वसों वैकुंठीं भवचक्रीं नवसों गा! तें.' ॥ गातां० ॥ १२३
जातीमल्लीधात्रींस[13] पुसे आम्रा पनसा बकुळा, ।
नकुळा सर्पा खग मृग यांच्या मग पुसेल कां न कुळा[14]? ॥ गातां० ॥ १२४
'बा! सीता सांग' पुसे ऐसें अंजलि करित नगातें[15], ।
गातां शोक न हरितें तरि कविकुळ हें चरित[16] न गातें. ॥ गातां० ॥ १२५

---

याचें सयुक्तिक कारण सांगणें मोठें कठीण आहे. त्यानें सीतेला इतर कोठें ठेविलें असतें तरी चाललें असतें, म्हणजे कोणतेंही स्थल सारखेंच कामीं पडलें असतें. यावरून कोणतेंही काम कोणाच्या हातून अनेक मार्गांनीं तडीस जाण्यासारखें असतां, त्यानें तें काम कोणा एका मार्गानें तडीस नेलें, तेव्हां तोच मार्ग त्यास अधिक आवडता होता असें नाहीं—अशा अर्थानें या न्यायाचा प्रयोग करतात.]

१. अरण्यांत. २. वडील भावातें. (रामातें.) ३. सीता. ४. स्त्रीलंपट. ५. सर्ग ६० पहा. ६. वारंवार. ७. पुष्कळ आनंदाला. ८. मारवाडदेशसा. ९. घातकें. १०. मांसभक्षकें राक्षसें. ११. सीताविषयक रामाचा शोक ६० व्या सर्गांत पहावा. १२. संसारी अथवा विषयसुखेच्छु पुरुषाचें अनुकरण, कामुकपुरुषाचें सोंग घेणें, विषयलंपट पुरुषाची हुबेहूब नक्कल करणें. १३. लताविशेषांस. १४. कुळ=समुदाय. [येथें भगवान् रामाचें नरसदृशकामकत्व या काक्वर्थानें ध्वनित होतें.] १५. पर्वतातें. १६. हें रामचरित्र.

सानुज गहनीं हुडकित फिरतां प्रभु [1]तातसखा पाहे, ।
साहे न सुनेच्या हरणा जो [2]सासु कथाया राहे. ॥ गातां० ॥ १२६
उदकें पवनें सावध करुनि प्रभु त्यासि पुसे, 'बा ! हे ।
झाली दशा असी कां? सांग त्वत्पुत्रचि [3]हा आहे.' ॥ गातां० ॥ १२७
सांगे, 'वत्सा ! रावण गेला सीतेतें घेऊन' ।
सोडी प्राण प्रभुच्या अंकीं स्पर्शें सुख सेवून. ॥ गातां० ॥ १२८
त्याचें [4]उत्तरकार्य करि प्रभु साश्रु तिळोदक ओपी, ।
तो पी दशरथसा, मुक्ति तया, यश गात्या ही सोपी. ॥ गातां० ॥ १२९
योजनबाहु [5]कबंध धरी त्या वधुनि, तयाच्या पापा, ।
शापा वारुनि बसवि विमानीं प्रभु निववी भवतापा. ॥ गातां० ॥ १३०
तो [6]दनुनामा सांगे, 'शबरीप्रोक्तपथें जा, आर्या ! ।
सुग्रीवातें भेट, सखा हो, तो करिल तुझ्या कार्या.' ॥ गातां० ॥ १३१
प्रभुतें पाहुनि मतंगमुनिची सच्छिष्या ती [7]शबरी ।
पूजुनि होमी वपु तीतें दे गति तो जगदीश बरी. ॥ गातां० ॥ १३२
शबरीकथितपथें जाय प्रभु पावे [8]पंपासरसी, ।
कामासि म्हणे, 'न क्षण मागें देउनि कंपा सरसी. ॥ गातां० ॥ १३३
कुसुमशर म्हणति धन्य न [9]पावति जे कवि दयिताविरहा, ।
चिर '[10]हां !' रघुकुलजा मजहि म्हणवि काम, नव्हेचि रुचिर हा॥गातां० १३४
त्वत्प्रिय सन्मुनिशिष्य दाशरथि सति ! म्हणतां [11]पविस रहा ।
दयिते ! न पडों देचि कुसुमशरभव पण ताप विसर हा. ॥ गातां०॥ १३५
तुजहुनि मज मजहुनि तुज अधिकचि ताप नवनवा सीते ! ।
रक्षिति तप मज तुजहि न देती शाप न वनवासी ते. ॥ गातां० ॥ १३६
हा ! हा ! राक्षसवृक तो गेला घेवुनि तुज [12]एणीतें, ।
त्वन्मृदुपण नवनीतींहि नसे सखि ! कैचें मेणीं [13]तें. ॥ गातां० ॥ १३७

---

१. जटायु. रावणानें सीतेचें आणि माझ्या प्राणांचें हरण केलें असें जटायूनें सांगितलें. [सर्ग ६७ पहा.] २. सप्राण, जीवंत. ३. मी राम. ४. रामानें जटायुदेह दहन करून त्याची सलिलक्रिया केली. [सर्ग ६८.] ५. रामायणें—भाग दुसरा, पृष्ठ ५ टीप ३, व पृष्ठ २० टीप १० पहा. ६. दनु नामक असुर; हाच कबंध होय. ७. रामायणें—भाग दुसरा, पृष्ठ ५ टीप ४ पहा. ८. पंपासरोवर. ९. जे दयिताविरहा कवि न पावति ते धन्य [पुरुष तुज] कुसुमशर म्हणति—असा अन्वय. १०. हाय. ११. वज्रास. १२. हरिणीतें. १३. मृदुपण.

सीते ! तुज विरहानळ कीं तो क्रव्याद[1]चि भक्षील, ।
रक्षील प्राण न हा राघव जरि न तुला लक्षील.' ॥ गातां० ॥ १३८

---

## किष्किंधाकांड.

(साकीवृत्त.)

सौमित्रि म्हणे, 'आर्या[2]! आर्या[3] व्रत[4]वज्रकवच वाहे, ।
पापा त्या[5] पाताळगताही तव शर वधितिल बा! हे. ॥ गातां० ॥ १३९
धैर्य धरुनि, भेटावें आधीं सुग्रीवा आर्यातें, ।
सख्य करावें, पावविलचि तो सिद्धिस या कार्यातें.' ॥ गातां० ॥ १४०
तेथुनि ऋष्यमूकपथ धरुनि प्रभु सानुज जों चाले, ।
देहीं भुजनेत्रस्फुरण वनीं शुभ शकुनहि बहु झाले. ॥ गातां० ॥ १४१
तापस शस्त्रीं दूरुनि पाहुनि भी सुगळ मनीं मानी, ।
वाळीनें पाठविले बहुधा करवाया निजहानी. ॥ गातां० ॥ १४२
शोध कराया वातसुतातें धाडी द्विजसा तो[6] या, ।
भेटे, पाहोनि निवे सहसा बहु तृषित जसा तोयां[7]. ॥ गातां० ॥ १४३
पुसतां लक्ष्मण आर्याज्ञेनें वृत्त कथी ऋजुभावें[8], ।
'जातों सुगळा शरण म्हणाया, व्यसनीं आम्हां पावें[9].' ॥ गातां० ॥ १४४
सूक्तिश्रवणें मारुति हर्षे, दोघे पृष्ठीं[10] वाहे. ।
अचलीं[11] भेटवि सुगळा, यश हित अन्योन्याचें पाहे. ॥ गातां० ॥ १४५
पावकसाक्षिक[12] सख्य करुनि, तो दावी ते नग[13] यातें[14], ।
ज्याची कीर्ति सुकृत दे दीना न सुरनदी[15] न गया तें. ॥ गातां० ॥ १४६
राम म्हणे, 'नग मद्दयितेचे हे कीं काय पहावे? ।
वत्सा! श्रुत्यर्थ तसे निरुपम तव हृदयांत रहावे.' ॥ गातां० ॥ १४७
लक्ष्मण म्हणे, 'न जाणे अन्या दृष्टि अळंकारा हे, ।
नमितां पळ या नूपुरतीर्थी धूतकळंका[16] राहे.' ॥ गातां० ॥ १४८

---

१. राक्षस. (क्रव्य=मांस, अद=खाणारा.) २. रामा. ३. सीता. ४. पातिव्रत्यरूप व्रत हेंच वज्रासारखें दृढ कवच (चिलखत). ५. मारुति भिक्षुरूपानें रामाकडे आला होता. (सर्ग ३ श्लोक २ पहा.) ६. सुग्रीव. ७. उदका. येथें उपमालंकार जाणावा. ८. सरळपणानें. ९. प्रसन्न हो. (सर्ग ४ श्लोक १७-२० पहा.) १०. सर्ग ४ श्लोक ३४-३५ यांत मारुतीनें रामल[illegible] [illegible]स पाठीवर घेऊन ऋष्यमूकपर्वतावर आणिलें असें वर्णन आहे. ११. ऋष्यमूकपर्वतावर. १२. पावक (अग्नि) आहे साक्षी ज्यास असें. १३. अलंकार. १४. रामातें. १५. गंगा. १६. गतमला, विमला, क्षालितमला.

प्रभु हृदयीं धरुनि प्रक्षाळी नयनजळें नग गमले, ।
श्रमले सखे वियोगें समसुख दुःखालिंगित शमले. ॥ गातां० ॥ १४९
सुगळ म्हणे, '[1]वाल्यपहृतदार प्लवगहि मीं बा! न रडें, ।
जरि धरिलें [2]प्रबळाधिव्याघ्रें दृढ चावाया नरडें. ॥ गातां० ॥ १५०
व्यसनीं [3]कठिन असावें सखया! 'हा!' म्हणणें [4]कुत्सा हें, ।
तुज सीता भेटवितों तूं हो युक्त निजें उत्साहें.' ॥ गातां० ॥ १५१
प्रभु त्यासि पुसे. '[5]भ्रात्यासीं हें अतिवैर कसें घडलें? ।
सांग सविस्तर कोणापासुनि अंतर कैसें पडलें?' ॥ गातां० ॥ १५२
सुगळ कथी, '[6]मायावी नामक असुर रणातें [7]बाहे, ।
धांवे वाळी त्यावरि, अरिचें पळहि न गर्जित साहे. ॥ गातां० ॥ १५३
झालों सहाय बंधुस मी [8]कीं काळा [9]अरि [10]हो घांस, ।
पाताळबिळीं पळुनि शिरे जड, भी आम्हां दोघांस. ॥ गातां० ॥ १५४
द्वारीं स्थापुनि मजला, वाळी जाय बिळीं त्यामागें ।
रागें, [11]आखुवधार्थी जैसा व्याळ खवळला रागें. ॥ गातां० ॥ १५५
[12]असुरबळाचे शब्द ऐकिले, न भ्रात्याचे रामा! ।
[13]रक्तपूर बिळवदनीं आला, बंधु न, [14]जगदभिरामा! ॥ गातां० ॥ १५६
वर्षांतींहि न येतां वाळी, वधिला ऐसें गमलें, ।
ठेविलि महाशिळा विवरमुखीं, शोकें चित्त भ्रमलें. ॥ गातां० ॥ १५७
[15]किष्किंधेप्रति परतुनि आलों, अग्रजशोकें रडलों, ।
कथितां वृत्त स्वाप्तजनाला रामा! मूर्छित पडलों. ॥ गातां० ॥ १५८
रामा! पात्र बळें सचिवानीं केला राज्यपदा हा, ।
[16]जैसा ज्वररोगी बंधूनीं विपुला [17]आज्यप दाहा. ॥ गातां० ॥ १५९

---

१. वालीनें हरिली स्त्री (तारा) ज्याची असा. २. मोठ्या चितारूप वाघानें. ३. दृढमनस्क. ४. निंदा. ५. वालिसुग्रीवांचें भ्रातृत्व भीमार्जुनांच्या भ्रातृत्वासारखें होय. हें भ्रातृत्व मात्रैक्यापासून उत्पन्न झालेलें असें समजावयाचें. ६. हा मयासुरास हेमा नामक स्वर्वेश्येपासून झालेला ज्येष्ठ पुत्र. हा वालीच्या हातून मरण पावला. (किष्किंधाकांड—सर्ग १०.) मयासुराचा दुसरा पुत्र दुंदुभि. ७. बोलावी. ८. अशासाठीं कीं, ह्या हेतूनें कीं. ['कीं' या अव्ययाचा अर्थ 'प्रश्न,' 'विकल्प,' 'आधार' किंवा 'कारण' असा होतो.] ९. मायावी असुर. १०. व्हावा. ११. उंदीर मारण्यास इच्छिणारा. १२. मायावीच्या सैन्याचे. (श्लोक १८ सर्ग ९ पहा.) १३. रक्तपूर आला, बंधु न आला—अशी काकाक्षिगोलकन्यायानें 'आला' या क्रियापदाची योजना केली पाहिजे. १४. जगतांत अत्यंत रम्य अशा (रामा). १५. हें प्रस्तुतचें तुंगभद्रानदीतीरस्थ अनागोंदी खेडें होय. १६. हा येथें उपमालंकार जाणावा. १७. तूप पिणारा.

खळबळ वधुनि बिळमुखीं येतां न मला [1]पाहे दगडा ।
'रगडा' मुष्टींस म्हणे मजसीं करि अरि मानुनि झगडा. ॥ गातां० ॥ १६०
दंडुनि सचिवासि मज वधाया **वा**ळी पाठीं लागे, ।
भ्रमतां भूवलयीं बा **रामा**! [2]होहि न [3]तोहि न भागे. ॥ गातां० ॥ १६१
या [4]ऋष्यमूकगोत्रीं न शके याया बापा! **वा**ळी, ।
अपराध करुनि [5]**म**तंगमुनिच्या पावुनि [6]शापा [7]वाळी. ॥ गातां० ॥ १६२
असुर [8]महिषतनु [9]**दुं**दुभिनामा युद्ध कराया आला, ।
झाला [10]व्यंसु, बाहुबळें **वा**ली दूर झुगारी त्याला. ॥ गातां० ॥ १६३
सिद्धाश्रमांत [11]तच्छव वाली [12]शोणित वमुनि सडा जो ।
गर्वें अपराध असा केला, तो कां न [13]मुनिस डाजो? ॥ गातां० ॥ १६४
'करिल प्रवेश या स्थानीं जरि तरि तो **वा**ळी पापी, ।
[10]व्यंसु हो, तत्प्रिय कपिहि [14]उपल हो.' ऐसें सुतपा शापी. ॥गातां०॥ १६५
न करी प्रवेश मरणभयें या स्थानीं **रामा**! **वा**ळी, ।
त्या काळापासुनि मज [15]नगे हा [16]ऋषिला **शि**वसा पाळी.' ॥ गातां० ॥ १६६

---

१. न मला पाहे, दगडा पाहे. येथें 'पाहे' या क्रियापदाची योजना काकाक्षिगोलकन्यायानें केली पाहिजे. २. हा सुग्रीवही. ३. तो वाळीही थकला नाहीं. ४. हा पर्वत वानराचें मूळ ठिकाण. ५. हा शबरीचा गुरु होता. ह्याचा आश्रम क्रौंचारण्याचे पूर्वेस होता. ह्यानेंच शबरीस रामाला फळें देण्यास सांगितलें, असें वर्णन अध्यात्मरामायणांत आहे. ६. पुढें साकी १६५ पहा. ७. वर्जी, गाळी. ८. रेड्यासारखें मोठें शरीर ज्याचें तो. ९. हा मयासुराचा दुसरा पुत्र. (मंत्ररामायण—किष्किंधाकांड—गीति ४६, काव्यसंग्रह पृष्ठ ६७ पहा.) १०. मृत, गतप्राण. ११. त्याचें शव (प्रेत). १२. रक्त. १३. मतंगमुनीस. १४. पाषाण. १५. पर्वत. १६. मार्कंडेयाला. 'मृकंडुऋषीस पुत्र नव्हता, म्हणून त्याचे स्त्रीनें 'तुम्ही शिव प्रसन्न करून घेऊन त्यापाशीं पुत्र मागा,' असें त्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें पुत्र मागितला; पण शिव म्हणाला कीं, 'एक १६ वर्षें आयुष्याचा पण सुंदर व शाहाणा आणि दुसरा १०० वर्षें आयुष्याचा पण कुरूप आणि मूर्ख अशा दोन पुत्रांपैकीं जो तुला आवडेल तो तूं घे.' मृकंडूनें पहिल्या प्रकारचाच मागितल्यावरून शिवानें तो दिला. पुढें १६ वर्षें भरण्याचे सुमारास आईबापांस फार वाईट वाटूं लागलें; तेव्हां मार्कंडेय (मृकंडुपुत्र) 'भिऊं नका, मी शिव प्रसन्न करून घेतों म्हणजे मला भय नाहीं,' असें सांगून शिवपूजेस लागला. पुढें शिव प्रसन्न होऊन त्यानें मार्कंडेयाचे अंतसमयीं आलेल्या यमास लाथ मारून पाडून मार्कंडेयास चिरंजीव केलें' (नवनीत)—

रघुवीर म्हणे, 'वधुनि खळातें देतों कपिराज्य तुला, ।
गंधतैलहि न पावे होउनि यज्ञोचित आज्यतुला.' ॥ गातां० ॥ १६७
सुगळ म्हणे, 'वधिन म्हणसि परि तो सखया! अरि बळकट कीं, ।
देवांच्याहि नसे वध याचा होय असें बळ कैटकीं. ॥ गातां० ॥ १६८
दुंदुभिदेह पहा तो दिसतो जो श्वेताद्रिशिखरसा ।
योजन एक उडविला अरिला हा हर जेंवी खरसा.' ॥ गातां० ॥ १६९
पादांगुष्ठें त्यातें उडवि प्रभु दशयोजन दूर, ।
गुरु पूर्वी लघु आतां म्हणतां तो संशय हरि शूर. ॥ गातां० ॥ १७०

---

१. येथें १६७-१७३ या सात साक्यांतील प्रसंगास पुढील टीका कितपत अनुरूप आहे ती पहावी:—'यावरून भगवान् रामचंद्र यांच्या राज्यांतही एकमेकांच्या नुसत्या भाषणावर विश्वास ठेवून चालत नसे असें दिसतें. तशांत हा अविश्वास केवळ प्राकृत जनामध्येंच होता असें नाहीं; तर, त्रिभुवनेश्वर एकवचनी जो रामचंद्र महाराज आणि परमभक्त सुग्रीव ह्या उभयतांचे मनांत एकमेकांविषयीं होता हें पाहून फारच आश्चर्य वाटतें. [रामाच्या बळाचें ज्ञान सुग्रीवास होऊं नये, रामानें दुंदुभिदेह पादांगुष्ठानें दश योजनें दूर उडविला असतांही सुग्रीवाची पक्की खात्री न व्हावी, सुग्रीवानें वालीच्या पराक्रमाची रामापाशीं पुनः स्तुति करून भगवंताचे सामर्थ्याविषयीं पुनः आपला अविश्वास ध्वनित करावा, रामानें त्याची खात्री करण्यासाठीं सप्त शालतरु एका शरानें भेदून तदाधारभूत खडकाचाही भेद करावा आणि तेणेंकरून सुग्रीवाची खात्री व्हावी—हा सर्व प्रकार ह्या युगांतील सामान्यजनासच शोभतो, त्रेतायुगांतील जनास शोभण्यासारखा नाहीं.] त्रेतायुगांत रामचंद्र व सुग्रीव ह्यांच्या वचनाविषयीं त्यांस इतका बंदोबस्त करून घ्यावा लागला तर, हल्लीं कलियुगांत शपथप्रमाण बेलभांडारादि क्रिया होतात तेव्हां कांहीं विश्वास वाटतो, हा कलिप्रादुर्भाव मानणें अप्रशस्त होय. कोणत्याही कालीं कोणत्याही स्थितींत मनुष्याचे मनोविकार सारख्याच संशयादि जालांनीं परिवेष्टित असतात. त्यांत युगपरत्वें कांहीं फेरबदल होत असेल असें वरील गोष्टीवरून वाटत नाहीं. युगपरत्वें मनुष्याच्या अंतःकरणप्रकृत्यंशांत फेरफार होत असतो अशी पुष्कळ लोकांची व ग्रंथांची समजूत आहे, व तशी समजूत असणें हें लोकांचें सदाचरण व भक्ति वाढविण्यास उत्तम कारण आहे. वास्तव भगवान् रामचंद्राच्या काव्यांत वरील गोष्ट प्रकारांतरानें वर्णावयाची होती. म्हणजे रामचंद्राच्या भाषणाबरोबर तें सुग्रीवानें निःसंशय अनन्यभावानें मान्य केलें असें वर्णन असावयाचें होतें. अशा वर्णनानें रामचंद्रस्वभावास भूषण होऊन, त्रेतायुगांतील मनुष्यस्वभाव कलीहून भिन्न होता असेंही लोकांस दिसलें असतें. हा खुबीदार फेरफार पंतानें केला नाहीं हें उघड आहे. दुसरें सुग्रीव हा वनचर होता, यामुळें त्याची स्वाभाविक बुद्धि निष्कपट आणि श्रद्धालु असलीच पाहिजे. त्याहून विपरीत वरील वर्णन झालें. अर्थात् हाही प्रकृतिविपर्यय दोष झाला.' (बाळकृष्ण मल्हार हंसकृत मोरोपंतावरील निबंध—पृष्ठ ९६-९७ पहा.) २. तुपाची बरोबरी. ३. सैन्यांत. अरि (इतका) बळकट कीं त्याचा वध होय असें बळ देवांच्याहि कटकीं नसे—असा अन्वय. येथें पहिलें वाक्य कारणदर्शक आणि दुसरें फलदर्शक अथवा परिणामद्योतक आहे. ४. हिमालयाच्या शिखराप्रमाणें.

'एकें एक असे शालद्रुम सप्त भेदि तो [1]रोपें' ।
ऐसें म्हणतां, प्रभु बळ दावी तें कळवाया सोपें. ॥ गातां० ॥ १७१
एकेंचि शरें सप्त शालतरु भेदुनि खडकहि भेदी, ।
छेदी संदेह, प्रभु राहों दे न स्वाश्रित खेदी. ॥ गातां० ॥ १७२
सुग्रीव म्हणे, 'बा रघुवीरा! आला प्रत्यय पूर्ण, ।
चूर्ण प्रभु तूं करिसिल अरिला एकेंचि शरें [3]तूर्ण.' ॥ गातां० ॥ १७३
गेला सानुज राम सुगळसह किष्किंधेच्या जवळ, ।
[4]कवळ स्वशरा वाळी देउनि यश जोडाया [5]धवळ. ॥ गातां० ॥ १७४
[6]एकीकडे वनीं गुप्त प्रभु बाणधनुर्धर राहे, ।
समरा होउनि सिद्ध सुकंठ स्वभ्रात्यातें बाहे. ॥ गातां० ॥ १७५
वाळी क्रोधें ये अनुजाचे घ्याया युद्धीं प्राण, ।
दोघांत न लेशहि भेद दिसे, राम न सोडी बाण. ॥ गातां० ॥ १७६
भंगव्याकुळ सुग्रीव पळे, पावे स्वस्थानातें, ।
त्या प्रभु सांत्वुनि, 'सत्य सखा हें,' कळवी स्वस्था नातें. ॥ गातां० ॥ १७७

---

१. बाणानें. २. सुग्रीव म्हणतां. ३. त्वरित. ४. ग्रास, घांस. ५. शुभ्र, विमल. [यशाचा रंग शुभ्र—असा कविसमय आहे.] ६. साक्या १७५-१८२ यांत वर्णिलेल्या प्रसंगावर एका मार्मिक मयूरभक्ताचा अभिप्राय काय पडला असता हें याच प्रसंगाचें जें अन्य ठिकाणीं पंतांनीं वर्णन केलें आहे त्या वर्णनावरील अभिप्रायावरून सहज समजेल. पंतांनीं ग्रंथरचना करतांना जशी निवडानिवड करायास पाहिजे होती तशी केली नाहीं असें दिसतें. मूळांतील फल्गु अंशाचा त्याग करून नवीन हृदयंगम मजकूराची स्वप्रतिभेनें भर घालून त्यांनीं अनेक ठिकाणीं बहार करून दिली आहे तसें या प्रसंगींही करायास पाहिजे होतें. या प्रसंगास अनुलक्षून पुढील उतारा वाचण्यासारखा आहे. या उताऱ्यांत निबंधकारानें जेथें 'मंत्ररामायणां'तील पद्यें घातलीं आहेत तेथें आम्ही 'पंचशतीरामायणां'तील तत्तदर्थद्योतक पद्यें ठेवून दिलीं आहेत:—'रामानें अन्यायानें वालीचा वध केला असें ग्रंथरचनेंत स्पष्ट दाखविलें आहे. 'सुग्रीवाचा रामचंद्र मित्र झाला आहे; तो मोठा पराक्रमी आहे; यास्तव तुम्ही सुग्रीवाबरोबर युद्ध करण्यास जाऊं नये' म्हणून वालीस त्याच्या तारा स्त्रीनें सांगितलें असतां तो तिला म्हणाला:—[वाळी म्हणे प्रिये मी जाणें रामा गुणपात्रास । तोष पहातां सुजना चंद्रा कुजना कुणपा त्रास । १८०॥ पंचशतीरामायण.] याप्रमाणें उदार व निष्कलंक मनानें वालीनें रामचंद्रावर भरंवसा ठेविला असतां—[एकीकडे वनीं गुप्त प्रभु बाणधनुर्धर राहे । समरा होउनि सिद्ध सुकंठ स्वभ्रात्यातें बाहे ॥ १७५॥ प्रभुनें तो सुगळ सखा रक्षुनि लक्षुनियां वल्ग्यंका । उर चिरुनि शरें वाळी केला उचित चितापल्यंका ॥ १८२ ॥ पंचशतीरामायण.] अशा प्रकारें कपटयुक्तीनें रामचंद्रानें वालीचा वध केला, हें चरित्र पाहून रामचंद्राच्या नीतिवर्तनाविषयीं क्षणभर तरी रोमांचयुक्त होऊन कोण साशंक होणार नाहीं बरें? तेव्हां अशा प्रकारचें चरित्र अभियुक्त कवींनीं रूपांतर करून लिहिलें पाहिजे तसें मोरोपंतानें केलें नाहीं.' (हंसकृत निबंध—पृष्ठ ९७ पहा.)

पुष्पित वेल्ली[1] कंठीं बांधुनि पुनरपि **सु**गळा प्रेषी, ।
गुप्त बसे प्रभु, तोहि हटकितां क्षोभे परम द्वेषी. ॥ गातां० ॥ १७८
**ता**रा म्हणे, 'भग्नही आला, झाला **रा**म सहाय, ।
**सु**गळा न भिडें' अभिमानें तो म्हणतो तामस 'हाय!' ॥ गातां० ॥ १७९
**वा**ळी म्हणे, 'प्रिये! मी जाणें **रा**मा गुणपात्रास, ।
तोष पहातां सुजना चंद्रा कुजना कुणपा[2] त्रास.' ॥ गातां०॥ १८०
ऐसें म्हणे निघे श्येनास ईयेन[3] तसा झडपाया, ।
परि तोचि खचे, **सु**ग्रीव टिके, कीं[4] त्याचा धड पाया. ॥ गातां० ॥ १८१
प्रभुनें तो **सु**गळ सखा रक्षुनि लक्षुनियां वल्लयंका[5], ।
उर चिरुनि शरें **वा**ळी केला उचित चिंतापल्यंका[6]. ॥ गातां० ॥ १८२
**वा**ळी निंदी प्रभुला[7], ईश्वर समजुनि मग कर जोडी; ।
पितृदत्त कनकमाळा[8] देउनि अनुजासीं करि गोडी. ॥ गातां० ॥ १८३
**ता**रा महिषी, पुत्र **अं**गद, प्रभुला अंतीं निरवी, ।
प्रभुदर्शनबोधामृत त्यांच्या शोकविषातें[9] जिरवी. ॥ गातां० ॥ १८४
कपिचें उत्तरकार्य[10] करवुनि प्रभु यश जोडी प्रांज्य[11]. ।
देववि देव विश्वहित **सु**गळा अनुज प्रेरुनि राज्य. ॥ गातां० ॥ १८५
राज्यश्री **ता**[12]राहि रु[13]मासी **सु**गळासि दिली **रा**में, ।
**सी**तेच्या तेंवि जिच्या जळतें अघ संकीर्तितनामें. ॥ गातां० ॥ १८६
विनवी बहु **सु**ग्रीव, परंतु व्रतसंरक्षण पाहे, ।
राहे **कि**ष्किंधेंत न वर्षा[14] प्रस्रवण[15]नगीं साहे. ॥ गातां० ॥ १८७
वृष्टि सरे, तरि **सु**गळ न भेटे, न मनावरि घे कार्य. ।
मानी परम कृतघ्न तया [16]कीं **सी**ताविरही आर्य[17]. ॥ गातां० ॥ १८८
अनुजासि म्हणे, 'जा त्या पाठिव बंधुकडे[18] मत्तातें ।
परि शोधीं स्वर्गीं लावावा शब्द न मज मत्तातें[19].' ॥ गातां० ॥ १८९

---

१. गजपुष्पी नामक कुसुमयुक्तलता लक्ष्मणानें सुग्रीवाच्या गळ्यांत खुणेसाठीं बांधली. (सर्ग १२ श्लोक ३८-४० पहा.) २. प्रेत, शव, मडें. ३. ससाणापक्षी. ४. कारण. ५. गजपुष्पी-वल्लीरूप चिन्हाला. ६. चितारूप शय्येला. ७. सर्ग १७ पहा. ८. दिव्य कांचनीमाला. ९. येथें रूपकालंकार जाणावा. १०. सर्ग २६ पहा. ११. थोर, मोठें. १२. तारा (सुषेणात्मजा, सर्ग २२ श्लोक १३) ही सुग्रीवस्त्री झाली. (सर्ग २९ श्लोक ४ पहा.) १३. सुग्रीवाची स्त्री. १४. पावसाळा. १५. पर्वतविशेष त्याचे ठायीं. १६. कारण. १७. सुग्रीव आपली प्रतिज्ञा विसरला असें रामाला वाटलें. (सर्ग ३१ पहा.) १८. वालीकडे. [त्या किष्किंधाराज्यश्रीमत्ता सुग्रीवाला वालीकडे (अर्थात् यमसदनीं) पाठीव—असा भावार्थ.] १९. माझ्या बापानें. (दशरथानें.)

गेला लक्ष्मण किष्किंधेतें गुण जोडुनि चापातें, ।
तापातें कपि पावति जैसे करुनि महापापातें. ॥ गातां० ॥ १९०
अंगदतारायुत सुगळ म्हणे, 'बा! समज, न कोपावें; ।
मानूं हृदयांत कृतघ्नत्वा वास मज नको, पावें. ॥ गातां० ॥ १९१
गेले दूत ऋक्षकपिकटकें येतिल, करितिल कार्या, ।
आर्या भेटवितिल, वधुनि रणीं दशवदनाप्रति, भार्या.' ॥ गातां० ॥ १९२
सौमित्रि म्हणे, 'चाल स्वमुखें प्रभुसि असें सांगाया. ।
न कळविला केला उद्योग प्रथम तुवां कां गा ! या.' ॥ गातां० ॥ १९३
लक्ष्मणसह बैसुनि शिबिकेंत प्रभुला भेटे सुगळ, ।
ज्याचा प्रताप काळासि म्हणे गिळितां 'कवळा उगळ.' ॥ गातां० ॥ १९४
तों बहुलक्ष यूथपति आले, गगनीं भरला धुरळा, ।
जे म्हणणारे निजनखरांतें वज्रशिळांतें भुरळा. ॥ गातां० ॥ १९५
शोधाया श्रीस सुषेणातें वरुणदिशेला राजा, ।
शतबळिस उत्तरेला, विनता पूर्वेस, म्हणे, 'बा! जा.' ॥ गातां० ॥ १९६

---

१. महापापें पांच आहेत:—'ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः । महांति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमम् ॥' याचा अर्थ:—ब्रह्महत्या, सुरापान, ब्राह्मणाचें दहा मासे किंवा अधिक सोनें चोरणें, गुरुपत्नीगमन हीं चार व यांशीं संसर्ग करणें हें एक अशीं पांच महापातकें होत असें मन्वादिक म्हणतात. २. या पद्यांत 'संदष्टक' नामक यमकालंकार आहे. ज्या पद्याचे द्वितीय आणि चतुर्थ पाद समवर्णात्मक असतात तेथें संदष्टक यमक असतें. याचें लक्षण:—'प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति ॥.' [काव्यालंकार—अध्याय ३ श्लोक ७; काव्यमाला २ पृष्ठ २२ पहा.] ३. रहाणें किंवा घर. येथें 'वास' शब्द 'बास' असा 'बवयोः सावर्ण्यम्' या नियमानें मानिला असतां संदष्टक यमक साधून वर्णव्यत्ययरूप दोष येत नाहीं. ब, व यांत अभेद मानण्याचा प्राचीन कविसंप्रदाय आहे. यास आधार:—रलयोर्डलयोस्तद्वज्जययोर्बवयोरपि । शसयोर्मनयोश्चांते सविसर्गाविसर्गयोः । सबिंदुकाबिंदुकयोः स्यादभेदेन कल्पनम् ॥ [किरातार्जुनीय—सर्ग १५ श्लोक १० घंटापथ टीका] 'रलयोर्डलयोश्चैव शषयोर्बवयोस्तथा । वदंत्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जनाः ॥.' ४. केलेला. ['केला' या रूपाचा प्रयोग गद्यात्मक ग्रंथांत भूतकालवाचक क्रियापद म्हणून होतो तथापि तें मूळचें विशेषण असून कवितेंत शुद्ध विशेषणासारखा त्याचा उपयोग अनेकस्थळीं आढळतो. दुसरीं उदाहरणें—पडला, मळला, इत्यादि. (१) जरि उकिरड्यांत **पडला, मळला,** न हिरा तथापि सामान्य, (२) किं बहुकाळ विसरला, फारचि **संकोचला** सखा लाजे, (३) निष्फळ होती मेघें **त्यजिलीं आलीं** हि जीविका शेतें.] ५. बाहेर काढ. ६. वानरसमूहांचे स्वामी. ७. भात बहुत दिवस एकत्र ठेविलें असतां त्यांत जो पक्षयुक्त प्राणि पडतो तो. ८. पश्चिमेला. ९. मंत्ररामायण—किष्किंधाकांड—गीति १०६. काव्यसंग्रह पृ० ७२ पहा.

[1]जांबवदंगद वायुसुत बळी अन्यहि [2]हरि [3]शमनाशा ।
धुंडाया पाठविले गेले, वाहुनि [4]अरिशमनाशा. ॥ गातां० ॥ १९७
मास अवधि न विलंघुनि शोधुनि [5]काष्ठात्रय [6]कपि आले, ।
विंध्यबिळीं सुतृषित [7]कपि शिरले, फळ जळ सेवुनि धाले. ॥ गातां० ॥ १९८
[8]सुरगणिका हेमाप्रिय मयकृत दिव्य स्थळ पाहून, ।
झाले [9]साधि [10]अलब्धविनिर्गम कपि तेथें राहून. ॥ गातां० ॥ १९९
हेमाप्रियालि [11]सावर्णिसुता [12]स्वयंप्रभा ते [13]साधी ।
नेत्रें झांकवि, बाहिर काढी कपि, यश सदया साधी. ॥ गातां० ॥ २००
शोध न लागे प्रभुदयितेचा, अवधि लंघिला, श्रमले, ।
[14]उग्रशासना भ्याले सुगळा, सांगद सर्व भ्रमले. ॥ गातां० ॥ २०१
सागरतीरमहेंद्रपर्वतीं झाले सिद्ध मराया, ।
कीं न सुचेचि उपाय तयांला मृत्युविपत्ति तराया. ॥ गातां० ॥ २०२
'[15]धन्य जटायु यशस्वी, न तसें [16]अस्मद्भाळीं मरण, ।
न रण, व्यर्थ मरतसों, घडलें न प्रभुचें [17]परिचरण.' ॥ गातां० ॥ २०३
अग्रज जटायुचा संपाती तो ऐके ती वाणी, ।
ज्याच्या मनीं असें कीं आपण भक्षावे ते प्राणी. ॥ गातां० ॥ २०४

---

१. जांबवान् आणि अंगद. २. वानर. ३. यमाच्या दिशेला, दक्षिणदिशा. ४. शत्रुनाशाची आशा. ५. दिशात्रय. (सर्ग ४७ श्लोक ६ पहा.) ६. सुषेणादिक कपि. ७. तारांगदप्रमुख कपि विंध्यगुहेंतील मयासुरानें रक्षिलेल्या ऋक्षबिळांत शिरले. (सर्ग ५० पहा.) ८. अप्सरा. ९. स+आधि=सहित+चिंता=सचिंत, दुःखी. १०. बाहेर पडण्याचा मार्ग ज्यांना सांपडला नाहीं असे. ११. सावर्णिमनूची कन्या. १२. स्वयंप्रभा—ही हेमानामक सुरगणिकेची सखी. मयासुरानें एक रमणीय स्थळ निर्माण करून तेथें आपल्या आवडत्या हेमेला ठेविलें, व तो तेथेंच तिच्याशीं क्रीडासक्त होऊन कालक्षेप करूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं इंद्रानें मयासुरास तेथून हांकून लाविलें, तेव्हां हेमा ही स्वर्गास गेली. जाते समयीं तिनें हें स्थळ या स्वयंप्रभेस दिलें. ही तेथें बराच काळ राहत होती. पुढें तारांगदादिक वानर सीताशुद्धीसाठीं लंकेस चालले असतां, हिची व त्यांची भेट विंध्यगुहावर्ती ऋक्षबिलांत होऊन, हिनें त्यांचा सत्कार केला. विंध्यगुहेंतील ऋक्षबिल हें तिमिराच्छादित असल्यामुळें वानर हे बाहेर निघण्यास असमर्थ होते. तेव्हां तिनें त्या वानरांस नेत्र मिटण्यास सांगून त्यांस समुद्रतीरीं पोहोंचवून, आपणहि रामाचें दर्शन घेऊन स्वर्गास गेली. (वाल्मीकिरामायण—किष्किंधाकांड—सर्ग ५०-५२ पहा.) १३. मनोव्यथायुक्त. १४. सीताशुद्धीस गेलेल्या वानरांस एक महिन्यांतच परत येण्याची सुग्रीवाची आज्ञा होती. [सर्ग ४० श्लोक ६९-७०.] ती आज्ञा उल्लंघित झाल्यामुळें वानर भयाभीत झाले. १५. सीताशोधाविषयीं हताश झालेल्या वानरांची ही उक्ति आहे. १६. आमच्या कपाळीं. १७. सेवा.

जाणुनि [1]अनुजमरण तो त्यातें वृत्त पुसे, तें [2]हरि ते ।
कथिति सविस्तर **राम**प्रभुचें सद्गुणवर्णन करिते. ॥ गातां० ॥ २०५
बंधुस्नेहें क्षण रडुनि म्हणे, 'न्या जलधिजवळ मजला, ।
तोयांजळि देइन अनुजाला, साधु मला बहु भजला.' ॥ गातां० ॥ २०६
सिंधुप्रति गृध्र विपक्ष तिहीं नेला, जळ दे भावा, ।
पुनरपि म्हणे, 'साधुहो! मज न्या, स्वस्थानातें पावा.' ॥ गातां० ॥ २०७
नेला होता तेथें मग तो निज वृत्त कथी 'हरि [3]हो! ।
[4]परिसा **सी**ताशोध सांगतों स्थिर तुमचें मन परि [5]हो. ॥ गातां० ॥ २०८
जातां [6]**त**पननिकट तत्तेजें मदनुज **ज**टायु [7]भाजे, ।
पोटाखालें धरिला तो म्यां, पक्ष जळाले माजे. ॥ गातां० ॥ २०९
याचि **म**हेंद्रनगीं मी पडलों मूर्छित दुःसहतापें, ।
हरिला दाह [8]**नि**शाकरमुनिनें, शिशुचा [9]ज्यापरि बापें. ॥ गातां० ॥ २१०
वदला तो मुनि [10]तेथेंचि रहा, श्री**सी**तेचा शोध ।
सांगुनि हृष्ट करीं श्री**राम**प्रभुचे वानर योध. ॥ गातां० ॥ २११
फुटतिल पक्ष पुन्हा, मग जा, तूं तोंवरि येथेंचि रहा, ।
या कार्याकरितां या स्थानीं होता कपि हो! चिर हीं. ॥ गातां० ॥ २१२
नेली श्री**सी**ता **द**शतुंडें [12]वरबळमत्तें अनयें, ।

---

१. धाकट्या भावाचें (जटायूचें) मरण. २. वानर. ३. अहो. ४. परिसणें=परिश्रवण. ५. होवो. ६. सूर्याजवळ. ७. माझे. कवितेंत माझा=माजा, तुझा=तुजा अशीं रूपें कधीं कधीं प्रास साधण्यासाठीं कवि योजितात:—जसें (१) **माजी** आख्या बल्लव (विराटपर्व—अध्याय १ गीति ८), (२) हें मति वरील कैंची मुख **माजी** (विराटपर्व—अध्याय ३ गीति ५३), (३) म्हणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे **तुजी** (केकावलि १०७), (४) या सबळा सुगळाचें पूजन करसील सत्य तें **माजें** [सप्तम स्तोत्ररामायण ७६], (५) आनंदवूनि घे भरतासि म्हणे जो नसे दया **माजी** [ऋषिरामायण ७०], (६) राजा मरे भरत ये, मातेसि म्हणे विनाश हा **माजा** [दामरामायण १९], (७) होतों ब्राह्मणसुत मी, मन्नाम सहस्रपाद् सखा **माजा** [आदिपर्व—अध्याय ४।५०], (८) 'मज न कळतां, न कोणी यावा; आज्ञा मनीं धरा **माजी** [आदिपर्व—अध्याय ६।१५], (९) तुमच्या पदप्रसादें वांच्छा सफळा जगांत हो **माजी** [आदिपर्व—अध्याय ७।४५], हीं रूपें कविजनांस जें एक प्रकारचें सर्वसंमत निरंकुशत्व प्राप्त झालें आहे त्यामुळें सदोष लेखीत नाहींत. ८. चंद्रमा नामक मुनीनें. ९. येथें हा उपमालंकार जाणावा. १०. महेंद्रपर्वतीं. ११. हा संपाती. १२. प्राप्त केलेल्या वरांच्या सामर्थ्यानें माजलेल्या (दशतुंडें).

रोधुनि मार्ग, प्रणत[1] सोडिला सदयें माझ्या तनयें[2]. ॥ गातां० ॥ २१३
कपिहो! वाटो तुमच्या कथितों हें सत्य मना दिसती, ।
कीं गृध्र दूरदर्शी मी, ती लंकेंत अनादि सती.' ॥ गातां० ॥ २१४
ऐसें वदतां होय सपक्ष व्योमीं[3] भरला उडुनीं, ।
तो हर्षप्रद नमिला कपिनीं, अमृतांशु[4] जसा उडुंनी[5]. ॥ गातां० ॥ २१५
'शतयोजन सिंधु उडुनि जाणें कोणाची किति शक्ती' ।
ऐसें अंगद युवराज पुसे व्हाया तदभिव्यक्ती[6]. ॥ गातां० ॥ २१६
'दशयोजनें उडेन' गज म्हणे, दुसरा गवाक्ष 'वीस,' ।
शरभ 'तीस,' ऋषभहि 'चाळीस,' प्रेक्षीन नमी श्रीस. ॥ गातां० ॥ २१७
'पन्नास' गंधमादननामा, मैंदाभिध कपि 'साठ,' ।
द्विविद 'म्हणे, सत्तर, अधिक न मी, जरि थापटिली पाठ.' ॥ गातां० ॥ २१८
वीर सुषेण म्हणे, 'मी गावें जाइन उडोनि ऐशीं,' ।
ऋक्षेंद्र[7] वदे, 'नव्वद संप्रति मच्छक्ति असे[8] ऐशी. ॥ गातां० ॥ २१९
पूर्वी[9] प्रदक्षिणा म्यां केल्या तीन[10] त्रिविक्रमातें[11] ।
करितां अमृतार्थ मथन [12]ओषधिशत मेळविलें बा! तें.' ॥ गातां० ॥ २२०
अंगद म्हणे, 'उडुनि जाइन मी लवणजळधि शतगांवें, ।
परि वाटे मज परतुनि येतां बळ माझें न तगावें.' ॥ गातां० ॥ २२१
वृद्ध म्हणे, 'उडसिल युवराजा! जरि तूं बहुशतगांवें ।
भृत्यांहीं न प्रेषावें न स्वामीनेंही जावें.' ॥ गातां० ॥ २२२

---

१. शरणागत. २. याचें नांव सुपार्श्व. हा संपातीसाठीं भक्ष्य शोधीत असतां, यानें सीतेसह रावणास पाहिलें आणि त्यासच पित्याच्या भोजनासाठीं मारून घेऊन जावें असा निश्चय केला. पण रावणानें शरण येऊन सामोपचारानें त्याची प्रार्थना करून मार्ग मागितला, तेव्हां सुपार्श्वानें त्यास सोडून दिलें–अशी कथा आहे. (मंत्ररामायण–किष्किंधाकांड, गीति १२८; सर्ग ५९ श्लोक ७-११ पहा.) ३. आकाशांत. ४. चंद्र. (अमृत+अंशु=सुधा+कर.) ५. नक्षत्रांनीं. हा उपमालंकार जाणावा. ६. त्याची स्पष्टता. ७. जांबवान्. ८. या प्रकारची. ९. वैरोचनाच्या यज्ञप्रसंगीं. (रामायण–किष्किंधाकांड–सर्ग ६५ श्लोक १५, सर्ग ६६ श्लोक ३२-३४.) १०. एकवीस असें मूळांत आहे. (सर्ग ६६ श्लोक ३२ पहा.) ११. वामनावतारसमयीं त्रिविक्रमरूप धारण करणाऱ्या विष्णूला. १२. सागराचें मथन करून अमृत काढलें तेव्हां सागरांत ज्या औषधी टाकिल्या होत्या त्या जांबवंतानें देवांच्या आज्ञेवरून गोळा केल्या होत्या–अशी कथा आहे. (सर्ग ६६ श्लोक ३३ पहा.)

अंगद म्हणे, 'तरि कसी प्रभुची कार्यसिद्धि बा! होती?' ।
वृद्ध[1] म्हणे, 'प्रभुतेजें होती जाण महाबाहो! ती.' ॥ गातां० ॥ २२३
एकांतस्थितमारुतिस म्हणे, 'सुगळासम तूं बापा! ।
लक्ष्मणसम किंबहुना रामप्रभुसम तूं निष्पापा! ॥ गातां० ॥ २२४
[2]पुंजिकस्थला केसरिभार्या होय अंजना शापें ।
केलासि समुत्पन्न तदुदरीं प्रिय सुत वातें बापें. ॥ गातां० ॥ २२५
तूं उपजतांचि पक्क फळ असें मानुनि चित्तीं रवितें, ।
त्रिशत[3] योजनें उडालासि, बा? गाती ज्ञाते कवि तें. ॥ गातां० ॥ २२६
[4]शतमख वज्रें ताडी पाडी मूर्छित, कोपे वायु, ।
तुज दे शस्त्रास्त्रावध्यत्व ब्रह्मा पुष्कळ आयु. ॥ गातां० ॥ २२७
गरुडतरणिमारुतसम गति तूं सिंधुलंघनीं शक्त, ।
जा, देवीतें पाहुनि ये, बा! हो प्रभुचा प्रिय भक्त.' ॥ गातां० ॥ २२८
[5]तापसशापें जें निजशक्तिज्ञान लोपलें होतें. ।
करी प्रकाशित मारुतिहृदयीं बोधें विधिसुत[6] तो तें. ॥ गातां० ॥ २२९
दशयोजनतनु झाला वृद्धें स्तवितां हर्षें[7] फुगला, ।
भगवत्प्रसादसद्यश मिळतां सुज्ञ न राहे उगला. ॥ गातां० ॥ २३०
शिरला तळीं, दडपला भारें उडतां नग तो खचला. ।
मुनि म्हणति, 'कुतुक पावों आधीं ध्यानें मग तोखें, चला.' ॥ गातां० २३१

---

१. जांबवान् म्हणे—असा अर्थसंदर्भ जाणावा. २. पुंजिकस्थला या नांवाची एक विख्यात अप्सरा. ही मुनिशापानें वानरयोनींत जन्मास आली. ही कुंजरवानराची कन्या आणि केसरिवानराची भार्या झाली. (सर्ग ६६ श्लोक ८-१२ पहा). ३. सर्ग ६६ श्लोक २१ पहा. ४. सर्ग ६६ श्लोक २३ पहा. ५. भृग्वंगिरसवंशज ऋषिजनांनीं मारुतीला शाप दिला. (उत्तरकांड—सर्ग ३६ श्लोक ३२-३५.) हा मुनिजनांला फार उपद्रव देई म्हणून त्यांनीं याला शापिलें. 'ज्या बळाच्या आश्रयानें तूं आमच्या यज्ञक्रियांचा विध्वंस करतोस त्या बळाला तूं आमच्या शापेंकरून बहुत दिवसपर्यंत जाणणार नाहींस, तुला तुझ्या बळाचें ज्ञान पुष्कळ दिवस व्हावयाचें नाहीं, पण तुला कोणी त्या बळाची आठवण करून दिली तर तें प्रकट होऊन वृद्धिंगत होईल' असा मारुतीला शाप होता. जांबवंतानें मारुतीला त्याच्या बळाचें स्मरण करून दिलें तेव्हां तें प्रकाशित झालें. ६. ब्रह्मपुत्र. (जांबवान् हा ब्रह्मदेवाच्या जांभईपासून झाला होता.) ७. संतोष.

## सुंदरकांड.

(साकी.)

[1]शक्रप्रेरित मैनाक उठे, त्यास उरें कपि ताडी, ।
पाडी सांत्वुनि[2] हस्तस्पर्शें, जलधिस वेगें फाडी. ॥ गातां० ॥ २३२
विघ्नपरीक्षार्थ करी सुरसा[3] जी नागांची माता, ।
त्रिंशतियोजन मुख पसरी ती देवप्रहिता[4] घाता. ॥ गातां० ॥ २३३
ती 'विधिवरें गिळीन' म्हणे, तों होउनि गांवें तीस ।
मारुति म्हणे, 'सती[5] सांत्वूं दे, त्वांही गावें तीस.' ॥ गातां० ॥ २३४
सोडीनाचि म्हणे मुख पसरी ती गांवें चाळीस, ।
खेचर[6] म्हणती, 'कपि सांपडला असुर[7] जसा काळीस[8].' ॥ गातां० ॥ २३५

---

१. शक्राच्या (इंद्राच्या) भयानें पाठविलेला. पूर्वी पर्वत पक्षयुक्त होते, यास्तव ते गरुडासारखे सर्व दिशांस जात येत असत. पण या योगानें यांच्या पतनाची भीति असे व देव, ऋषी व इतर प्राणी यांस उपद्रव होई. तेव्हां इंद्रानें पर्वतांचे पक्ष छेदण्यास आरंभ केला. इंद्र मैनाकावर पक्ष कापण्यासाठीं वज्र घेऊन चालून आला. इतक्यांत वायूनें मैनाकास आकाशांत उडवून क्षारसमुद्रांत टाकिलें म्हणून त्याचा बचाव झाला. वायूचा हा उपकार स्मरून कृतज्ञताबुद्धीनें शेंकडों योजनें उडून आल्यामुळें श्रांत झालेल्या मारुतीस विश्रांति द्यावी या उद्देशानें क्षारसागराच्या उदकांत मग्न झालेला मैनाकपर्वत वर आला—अशी कथा आहे. [सर्ग १ श्लोक १११-१४९.] या साकींत 'शक्रप्रेरित' पदाच्या स्थानीं 'सिंधुप्रेरित' असें पद कथासंदर्भास अनुसरून पाहिजे होतें, कारण 'रामकार्यार्थी मारुतीला वाटेंत विश्रांति देण्यासाठीं तूं बाहेर ये' असें सागरानें मैनाकास सांगितल्याची कथा आहे. [सर्ग १ श्लोक ८९-९३.] पण 'इंद्रानें मैनाकास पाठविलें' असा 'शक्रप्रेरित' पदावरून जो अर्थ निघतो त्यास आधार रामायणांत दिसत नाहीं. २. आपण मैनाककृत पूजेचा स्वीकार केला नाहीं, म्हणून त्यास वाईट वाटूं नये या हेतूनें त्या पर्वताचें अनेक प्रकारें सांत्वन करून, सीताशोधार्थ जाण्याची त्वरा आहे असें सांगून मारुतीनें पुढें प्रयाण केलें. ३. मारुतीचें बळ आणि चातुर्य पाहण्यासाठीं देवांनीं धाडलेली राक्षसीरूपधारी स्त्री. सीतेचा शोध लावण्यासाठीं मारुती लंकेस जात असतां ही त्यास आड येऊन म्हणाली कीं, 'माझ्या मुखांत प्रवेश कर.' त्यानें उत्तर दिलें कीं, 'सीताशुद्धि करून आल्यावर मी तसें करीन.' हें तिला रुचलें नाहीं. तेव्हां तिनें आपलें मुख दहा योजनें पसरिलें हें पाहून तोही तिच्या दुप्पट मोठा झाला. याप्रमाणें चढाओढीनें तीं दोघेंही दहा दहा योजनें वाढत चाललीं. अखेरीस मारुति अंगुष्ठप्रमाण लहान होऊन, तिच्या मुखांत प्रवेश करून बाहेर आला. हें पाहून ती संतुष्ट झाली, व 'तुझा जय होईल, तूं रामकार्य साधसील,' अशा आशीर्वाद देऊन स्वर्गी निघून गेली. ४. देवांनीं पाठविलेली. ५. सतीला. (सीतेला.) ६. देव. ७. महिषासुर. ८. भवानीला.

जो धांवुनि संरक्षी समयीं द्विरदा[1] आपन्नास[2], ।
त्या प्रभुतें चिंतुनि कपि झाला गावें हा पन्नास. ॥ गातां० ॥ २३६
षष्टियोजनें **सुरसा** त्यातें भक्षाया मुख वासी[3], ।
**मारु**ति पसरी सप्तति[4] गावें वपु जैसी सुखवासी[5]. ॥ गातां० ॥ २३७
ती नागांची माता पसरी आनन[6] भावें ऐशीं, ।
नवति[7]योजनें कपिवपु हि, कथा[8] आन न गावें ऐशी. ॥ गातां० ॥ २३८
शतयोजन मुख पसरी वाटे गिळिल व्योमहि **सुरसा**, ।
लघु होउनि त्यांत पडोनि निघे विषयीं कवि महिसुरसा[9]. ॥गातां०॥ २३९
होय करुनि हें यश सर्व जसा **मारु**तसुत पाठ कवी, ।
तो **सुरसे**सि, तसा संसृतिला हाही सुतपा ठकवी. ॥ गातां० ॥ २४०
छाया धरुनि **सिं**हिका[10] ओढी, तद्देहीं शिरला[11] जो, ।
छेदी काळिज, कोण ठेवितां तच्चरणीं शिर लाजो ? ॥ गातां० ॥ २४१
पावे तैसाचि नवें पारीं तो कवि लंबागातें[12] ।
चरिता लावुनि हें जड लक्ष्मीतोक[13] विलंबा गातें[14]. ॥ गातां० ॥ २४२

---

१. गजेंद्रा. हाहा आणि हूहू असे दोन गंधर्व होते. देवल ऋषीच्या शापानें त्यांतील एक गज होऊन त्रिकुटपर्वतावर भटकूं लागला व दुसरा तेथेंच सरोवरांत नक्र झाला. गज पाणी पिण्यास सरोवरांत उतरला तेव्हां नक्रानें त्याला पकडलें. नंतर गजानें श्रीकृष्णाचा धांवा केला, तेव्हां त्यानें नक्रास मारून मुक्त केलें. पुढें ते दोघेही शापमुक्त होऊन गंधर्वपद पावले. २. विपत्तियुक्तास. ३. पसरी. ४. सत्तर. ५. चटई, हांतरी, अंथरी. ६. मुख. ७. नव्वद. ८. गाण्याला योग्य अशी आन (दुसरी) कथाच नाहीं. 'आन' (अन्य, इतर, दुसरी) हा कुणबाऊ शब्द अद्याप प्रचलित आहे. ९. विप्रसा. १०. सिंहिका ही हिरण्यकशिपूची भगिनी आणि विप्रचित्ती नामक राक्षसाची स्त्री. मारुति सीताशुद्धीसाठीं लंकेस जात असतां समुद्राच्या पाण्यावर पडलेली त्याची छाया धरून हिनें त्याची गति कुंठित केली. तेव्हां तो हिच्या मुखांत पडला, परंतु त्यानें स्वबलानें तिला मारून पुढें गमन केलें. ११. तद्देहीं जो शिरला [व जो तिचें] काळिज छेदी तच्चरणीं (अशा मारुतीच्या पायीं) शिर ठेवितां कोण लाजो ? कोणीही लाजूं नये, कारण त्याची कृति सर्वमान्य आहे, तेव्हां सर्वांस वंदनीय होय. १२. लंब+अगातें=लंब-नामक+पर्वतातें. मारुति समुद्र उतरून गेल्यावर लंब नामक पर्वताच्या शिखरावर उतरला—असें वर्णन आहे. [सर्ग १ श्लोक २००-२०१.] या साकींत 'तो कवि लंबागातें' हें संदष्टक यमकाचें उदाहरण आहे. याचें लक्षण मागें १९१ व्या साकीवरील टीपेंत दिलें आहे तें पहा. अशीं यमकें **पं**तांच्या काव्यांत अनेक आहेत. यांपैकीं कांहीं 'मराठी शालापत्रकां'त आढळतील. [मराठी शालापत्रक—पुस्तक ३ अंक ४ पृष्ठ १२१-१२४, सन १८९२ एप्रिल.] १३. लक्ष्मीतोक=लक्ष्मीचें मूल. [**पं**ताच्या जननीचें नांव **लक्ष्मी**. **पं**तांनीं आपल्या मातापितरांविषयीं आपल्या काव्यांत कोठें कोठें उल्लेख केला आहे:—'धन्य श्री**रा**म पिता, धन्या **लक्ष्मी** प्रसू जगीं झाली। आली सत्यवतीची कीं भारतकीर्ति सुतमुखें आली॥' [स्वर्गारोहणपर्व—अध्याय २ गीति ४२ पहा.] १४. या साकीचा

अधिदेवीतें[1] भंगुनि संध्यासमयीं[2] पुरींत शिरला, ।
फिरला बहुत, श्रीस[3] पहातां शोकें हृदयीं चिरला. ॥ गातां० ॥ २४३
सुकृती[4] कृती[5] अशोकवनीं त्या साध्वीतें पाहून, ।
राहून नगीं[6] गुप्त निवे तो, हर्षातें वाहून. ॥ गातां० ॥ २४४
तों चंद्रोदय होय, निशीथीं[7] रावण ये विनवाया, ।
कीं कामांधा विषयाख्य सदा उत्सव सेवि नवा या. ॥ गातां० ॥ २४५
तो विधिमातेसि म्हणे, 'सुभ्रु! श्रमविसि कां हें गात्र[8]? ।
पात्र प्रियसुखभोगातें हो, सुंदरि! म्हण 'हूं' मात्र. ॥ गातां० ॥ २४६
मदधिक काय पदच्युत[9] वल्की वनवासी प्रिय नर तो? ।
मानस[10] सोडुनि मन हंसीचें पळहि पल्वलीं[11] न रंतो[12]. ॥ गातां० ॥ २४७
आज्ञेंत तुझ्या मत्प्राणस्त्री[13], जनपद[14], लंका राहो, ।
त्यज हठ, सुदंति[15]! मुदतिशय[16] घे, दे पद सदलंकारा हो. ॥गातां०॥२४८

---

अन्वय असा:—तो कवि (सुज्ञ मारुति) तैसाचि जवें (लागलाच अत्यंत वेगानें) पारीं (सागराच्या दुसऱ्या तीरास—लंकेकडच्या बाजूला) लंबागातें (लंब नामक पर्वताला) पावे (पोंचे-जाई.) मारुति किती वेळांत पोंचला असेल याची कल्पना करतां यावी म्हणून पंत म्हणतात, 'हें जड लक्ष्मीतोक विलंबा लावुनि चरिता गातें'=हें बुद्धिहीन मठ्ठ लक्ष्मीचें पोर (स्वत: कवि मोरोपंत) या रामचरित्राला फारच वेळ लावून गातें. एक साकीचें अर्ध करण्यास जितका कवीला वेळ लागला त्यापेक्षां कमी वेळांत मारुति लंबाख्य पर्वतास गेला. या पद्यांत अतिशयोक्ति अलंकार आहे. यावरून पंतांची शालीनता किती तरी व्यक्त होते.

१. लंकेची लंका नामक अधिदेवता राक्षसी ही अधिष्ठातृदेवतारूपानें लंकेचें रक्षण करीत असे. [सर्ग ३ श्लोक २०-२५ पहा.] २. संध्यासमयीं=सायंकाळीं. ['संध्या' हा शब्द 'सम् (एकत्र)' ा उपसर्ग 'धा (ठेवणें)' या धातूला लागून झाला आहे. याचा अर्थ 'सांधणारी (एकत्र ठेवणारी) वेळ' असा आहे. रात्र आणि दिवस या दोन कालभागांस सांज जोडणारी (एकत्र करणारी) वेळ आहे म्हणून तिला 'संध्या' असें म्हणतात.] ३. सीतेला. ४. पुण्यवान्. ५. कृतकार्य. ६. वृक्षावर. ७. मध्यरात्रीचे वेळीं. (सर्ग १८ पहा.) ८. शरीर. (सर्ग २० श्लोक २-३६ पहा.) ९. राज्यपदभ्रष्ट. १०. प्रख्यात मानस नामक सरोवर. ११. अल्पसरोवरीं. १२. आसक्त होतो. १३. मंदोदरी. १४. देश. १५. जिचे दांत चांगले आहेत ती सुदती. हें विशेषणपूर्वपदसमानाधिकरण बहुव्रीहि समासाचें उदाहरण आहे. [येथें 'वयसि दंतस्य दतृ' (५।४।१४१) हा सूत्रानें वयोरूप अर्थ गम्य आहे, यास्तव 'दंत' शब्दास 'दत्' असा आदेश झाला आहे—सुदन् (ज्याचे दांत चांगले तो तरुण), सुदती (तरुणी). वयोरूप अर्थ नसेल तर 'दत्' आदेश होत नाहीं, जसें—द्विदंत (हस्ती), ंत (पुरुष).] १६. मोठा आनंद. (मुद्+अतिशय=आनंद+आधिक्य.)

एकें दिवसें निष्कंटक[1] भू देतों साधुनि जनका, ।
म्हणतिल होतां अभ्युदय बरा ते तों साधु निज न का?[2] ॥ गातां० ॥ २४९
पावेल तुला नर तो न, रतो मन धृतलोभ स्मरणीं, ।
ऐसा नाहीं अमरहि माझ्या होय न जो भस्म रणीं.' ॥ गातां० ॥ २५०
साध्वी तृण आड करुनि बोले,[3] 'रे! मत्ता हरिणा! मी, ।
नरसिंहस्त्री समजेल तुला कामांधा! परिणामीं. ॥ गातां० ॥ २५१
उटजांतुनि कपटें त्वां प्रभुवर सानुज दवडुनि दूर, ।
पळविलिं चौर्यें वीरवधू,[4] घे स्वमुखेंचि म्हणुनि 'शूर.' ॥ गातां० ॥ २५२
पाताळीं जासिल तरिहि तुला प्रभुशर करितिल चूर, ।
प्रभु विखरिति[5] खरतर शर समयीं करदशशतमित[6] सूर.[7] ॥ गातां० ॥ २५३
प्रभुफणिपतिच्या[8] पचविसिल कसा तूं उंदीर मणीतें?।
विघ्नोपहता होऊं देइल तो तुंदी[9] रमणीतें? ॥ गातां० ॥ २५४
मज करुनि उपायन[10] जासील प्रभुला जरि तूं शरण, ।
तरण घडेल व्यसनीं, नाहीं तरि तुज आलें मरण.' ॥ गातां० ॥ २५५
इत्यादि वदे देवी, कोपें दशकंठ म्हणे, 'उडसी ।
गर्वें मुग्धे! बेट भेटतां दुःखसमुद्रीं बुडसी.' ॥ गातां० ॥ २५६
दासींस म्हणे, 'मन सीतेचें हित सांगुनि वळवावें, ।
मासद्वय[11] भरतां भक्षिन हें स्पष्ट इला कळवावें.' ॥ गातां० ॥ २५७
त्यां[12] समजावुनि त्याची दयिता घेउनि गेली मागें, ।
करिति राक्षसी[13] जाच क्रूरा, विषकटु वदती रागें. ॥ गातां० ॥ २५८

---

१. शत्रुरहित. २. कां? येथें साकी २४९ उत्तरार्ध आणि २५० प्रथम पाद यांचा एकान्वय करून अर्थ करावा. रावण म्हणतो कीं, 'एका दिवसांत जनकाला सगळी पृथ्वी देतो मग ते तों साधु (जनक सज्जन जनकर्षि) निज बरा अभ्युदय होतां तुला (सीतेला) तो नर (राम) कां न पावेल (मिळेल) [असें] म्हणतील.' जनकाला निर्वीर राज्य मिळालें म्हणजे तो सहज म्हणेल कीं, सीतेच्या बद्दल जर मला राज्य मिळतें तर तिला तिचा नवरा कां न मिळाला असावा? ३. सर्ग २१ श्लोक ४-३२ पहा. ४. वीरपत्नी. ५. टाकिती, सोडिती. ६. एकसहस्रहस्तयुक्त. ७. सूर्य. ८. प्रभुरूप शेषाच्या. हा रूपकालंकार जाणावा. ९. विघ्नेश्वर. १०. नजराणा. ११. दिलेल्या मुदतीपैकीं दोन महिने शिल्लक आहेत असें कळवावें. (सर्ग २२ श्लोक ८-९.) रावणानें सीतेला विचार करण्यास एक वर्षाची मुदत दिली होती, त्यापैकीं आतां दोन मास शेष होते. (सर्ग ३७ श्लोक ७-८ पहा.) १२. रावणा. १३. एकजटादिक राक्षसी 'रावण स्वपति समज' असा उपदेश करून सीतेला त्रास देत असत. (सर्ग २३ श्लोक ५-१९ पहा.)

त्रिजटा त्यांसि दटावूनि म्हणे, 'साध्वी छळितां कां गे ! ? ।
'दुःस्वप्न[1] दशास्यक्षयसूचक[2] अनुभविला,' [3]ती सांगे. ॥ गातां० ॥ २५९
उद्बंधनार्थ[4] काढुनि घे ती वेणीचा आगवळ[5], ।
स्वमतिस म्हणे[6], 'विपदुदधिपारा[7] दृढ होउनि लाग वळ.' ॥ गातां० ॥ २६०
तों कवि गाय तया घटजन्मा जो सुरभीतिसमुद्रा, ।
मग अर्पी प्रभुची, प्रणतांची जी सुरभी[9], तिस मुद्रा. ॥ गातां० ॥ २६१
नमुनि कुशळ कळवी सुगळाचें सख्य, वाळिवध सांगे, ।
स्तवुनि म्हणे, 'चाल तुला [11]नेतों, माते! श्रमसी कां गे! ?'॥ गातां० २६२
स्मित करुनि श्री वदली, 'वत्सा! त्वां न मला पळवावें, ।
मळवावें न यश, वधुनि रिपुला, तेज जगीं कळवावें.' ॥ गातां० ॥ २६३
मारुति म्हणे, 'असेंचि घडेल, प्रभुचे अक्षय तूंण[12], ।
जातों, प्रभुतें घेउनि येतों, द्यावी कांहीं खूण[13].' ॥ गातां० ॥ २६४
[14]काककथा कथि, चूडामणि[15] दे, माराया [16]मंदेशा, ।
'मज कीर्तिस संरक्षा' ऐशा सांगे श्री [17]संदेशा. ॥ गातां० ॥ २६५
आज्ञा आशी घेउनि हर्षे मारुति, उपवन मोडी, ।
झोडी वनपाळांतें, उग्रें राक्षसकटकें तोडी. ॥ गातां० ॥ २६६

---

१. 'स्वप्न' शब्द मराठींत नपुंसकलिंगी आहे, पण संस्कृतांत पुंलिंगी आहे; म्हणून पंतानीं त्याच ंगीं येथें योजिला आहे. पंताच्या काव्यांत हा शब्द पुंल्गिीच आढळतो—जसें 'कोणी म्हणती, ाहा! हा **स्वप्न** स्पष्ट कां खरा गमला' (मोरोपंत.) २. रावणमरणद्योतक. ३. ती त्रिजटा राक्ष-ींला रावणनाशहेतुक पडलेलें स्वप्न सांगे. [सर्ग २७.] ४. गळफांसार्थ. ५. वेणीच्या अग्रांची गांठ ढ़ यावी म्हणून गंगावन इत्यादिकांचा जो दोर लावितात तो. ६. सीता मनाला म्हणे. ७. विप-त्तिरूप समुद्राच्या पारास. ८. सीतेनें गळफांस घेण्याकरितां आगवळ काढिला व आपल्या मनाला ृढ होण्यास जों सांगत आहे 'तों (तितक्यांत—त्याचवेळीं) सुरभीतिसमुद्रा (सुरांना—देवांना जी ीति हाच कोणी महासागर त्याला) जो घटजन्मा (शोषून टाकणारा अगस्त्यरूप राम), त्याला कवि (मारुति) गाय (स्तवी) व मुद्रा (राममुद्रा सीतेला) अर्पी.' ९. कामधेनु. १०. सर्ग ३५ पहा. ११. सर्ग ३७ श्लोक २२ पहा. १२. भाते. १३. सर्ग ३८ श्लोक १० पहा. १४. इंद्रकाकाची कथा. ाम सीतेसह अरण्यांत वास करीत असतां, इंद्रकाकानें (हा इंद्राचा पुत्र म्हणून याला 'वासवि' 'ऐंद्रि' असेंही म्हणतात ) सीतेच्या स्तनावर नखक्षत केलें. तेव्हां रामानें त्याजवर इषीकास्त्र सोडून त्यास ासन केलें. हा काक अस्त्राघात सोसण्यास असमर्थ होत्साता रामास शरण आला, तेव्हां रामानें याचा एक डोळा काढून घेऊन त्यास मुक्त केलें, अशी काककथा आहे, ही गोष्ट गुप्त होती, राम आणि सीता यांसीच विदित होती म्हणून खुण पटण्याकरितां सीतेनें सांगितली. १५. सीता खुणे-ाठीं चूडामणि देते. (सर्ग ३८ श्लोक ६६.) हा चूडामणि तिला बापानें लग्नांत दिला होता. [सर्ग ६६ श्लोक ४ पहा.] १६. मूर्खाधीशा (रावणा.) १७. निरोपा. (सर्ग ३८ श्लोक ६४ पहा.)

लीलेनें मारी रणदक्षा शत्रुकुमारा [1]अक्षा, ।
भस्म करी [2]घनरवभटलक्षा, जेंवि [3]दवदहन [4]कक्षा. ॥ गातां० ॥ २६७
घननाद ब्रह्मास्त्रासि बळें सांपडतां त्या बांधी, ।
ने तातसभेसि, महाकपि न भ्रमविल अरिची कां धी? ॥ गातां० ॥ २६८
दशकंठ पुसे, '[5]कोणाचा तूं? ऐसा मत्त नयातें ।
लंघुनि, वधिता झालासि रणीं कैसा [6]मत्तनयातें?' ॥ गातां० ॥ २६९
कपि सांगे, 'श्रीरामप्रभुचा दूत, सती शोधाया ।
आलों रण तव दर्शन व्हाया हित तुजला बोधाया. ॥ गातां० ॥ २७०
साध्वी जनकसुता प्रभुदयिता नोहे कोंडायाची, ।
[7]साम त्यजि [8]कलिरुचि [9]जड, [10]कीं कण टाकुनि कोंडा [11]योंची.॥गातां० २७१
वांच, शरण चाल, प्रभुला दे [12]प्रभुदार [13]उपायनसे, ।
यावांचुनि वांचाया दुसरा तुज [14]सार उपाय नसे. ॥ गातां० ॥ २७२
रोधावें ब्रह्मकुलोत्पन्नें त्वां काय अशा स्त्रीतें? ।
शास्त्री असोनि करिसि, न करिती जें कर्म [15]अशास्त्री तें.' ॥ गातां० ॥ २७३
नकटी होय बहिण, अन्यायें मेला भाउ खरचि तो. ।
सर्व स्वप्राणांतें काळग्रस्त व्यर्थ [16]खरचितो. ॥ गातां० ॥ २७४
न टिकति खळहृदयबिळीं [17]उजळी बोध दिवे कपि कवि तो, ।
घन सुक्षेत्रीं [18]शाळि, तसाचि प्राज्ञ विवेक पिकवितो. ॥ गातां० ॥ २७५
खळ खवळे, कपिकदन कराया कवळी [19]करवाळातें, ।
त्या [20]तदनुजनि बिभीषण यत्नें [21]वारी [22]अरवाळातें. ॥ गातां० ॥ २७६

---

१. सर्ग ४७ श्लोक ३८ पहा. २. इंद्रजिताच्या एकलक्ष वीरांस. ३. वणवा. ४. गवता. ५. सर्ग ४८ श्लोक ५५ पहा. ६. माझ्या तनयाला (पुत्रास, अक्षास). ७. सख्य. ८. कलहप्रिय. ९. मूर्ख. १०. किंवा. ११. मागे. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १२. रामपत्नी. येथें संस्कृताप्रमाणें 'दार' शब्द पुंलिंगी अनेकवचनीं आहे. पण ह्या शब्दांचा पंताच्या काव्यांत क्वचित् स्त्रीलिंगी ही प्रयोग आढळतो:–'मी रामाची **दारा** हरिली, तरि काय हे तुझी हानी?' [मंत्ररामायण–युद्धकांड १०६, काव्यसंग्रह पृष्ठ ९६.] १३. नजराणा. १४. श्रेष्ठ. १५. अशास्त्रज्ञ. हें अर्ध सुभाषितासारखें आहे. १६. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १७. उज्ज्वलित करी (बोधरूप दीप). १८. भात, साळ. १९. तलवारीतें. २०. त्या रावणाचा कनिष्ठ बंधु. २१. 'दूताचा वध करणें अनुचित. त्यानें अपराध केला असतां, त्याचें अंग विरूप करणें, कशाघातांनीं ताडणें, मुंडन करणें इत्यादि दंड करणें योग्य, पण दूतास वधदंड सर्वथैव अयोग्य' इत्यादि सांगून बिभीषणानें रावणाचें निवारण केलें. [सर्ग ५२ श्लोक १३-१५.] २२. हलक्यातें.

वेष्टविलें **वा**युजपुच्छ खळें बहु तैलार्द्र [1]पटांनीं; ।
पेटविलें, चालविला नगरी फिरवायासि [2]भटांनीं. ॥ गातां० ॥ २७७
तें ऐकुनि [3]देवी [4]दहनातें प्रार्थी, तो केशातें ।
[5]त्याच्या न स्पर्शे, सुखवि सख्या त्याही लोकेशातें. ॥ गातां० ॥ २७८
कपि वधि भुजपाशधरां, सर्वा त्या पाशां हिसकून, ।
[6]स्वामियशोर्थ **द**शमुखा न मथी, तन्नाशाहि [7]सकून. ॥ गातां० ॥ २७९
साधु**बि**भीषणगृह संरक्षी, **लं**केची करि होळी, ।
घोळी बहु कटकें [8]हरि, अरि तो 'हाय !' म्हणे, [9]कर चोळी. ॥ गातां० ॥ २८०
[10]सन्मणिकनकप्रासादांचे काळ धडकले वर ते, ।
[11]खचरांचेंहि न राहों देती ज्वाळ [12]धड [13]कलेवर [14]ते. ॥ गातां० ॥ २८१
त्या **लं**केच्या सेवुनि पावे सुख **वा**सव धूमातें, ।
म्हणे, 'न दे निववायास असा मुखवास [15]वधू [16]मातें.' ॥ गातां० ॥ २८२
ब्रह्मांड भरिति बहु [17]रक्षःस्त्रीशोकार्तस्वर [18]पुरतें, ।
जेव्हां करी प्रदीप्त [19]शिखावान् तो [20]कार्तस्वरपुर तें. ॥ गातां० ॥ २८३
विझवि [21]समुद्रीं पुच्छ, 'हा !' म्हणे **सी**[22]तालय मानून, ।
तीस पुन्हां [23]पाहुनि सुकवि निघे, तो न गमे [24]भानून. ॥ गातां० ॥ २८४
**अंगदजां**बवदादिकपींतें कुशळ वृत्त आयकवी, ।
[25]नायकवीरानंद अतुळ जो, त्या वर्णिल [26]काय कवी ? ॥ गातां० ॥ २८५

---

१ वस्त्रांनीं. २. वीरांनीं. ३. सीता. ४. अग्नीला. ५. मारुतीच्या. ६. रावणाला मारल्याचें यश स्वामीला (रामाला) मिळावें यास्तव. ७. समर्थ होऊन. ८. वानर. ९. कर चोळणें=चडफडणें, मनांत कढणें, धुसमुसणें, शाप देणें. १०. उत्तम रत्नें आणि सुवर्ण यांच्या मंदिरांचे काळ (नाशकर्ते अग्नि) वर पेटत गेले. ११. आकाशगामी जनाचें. १२. शाबूद. १३. शरीर. १४. या साकींत शेवटचा 'ते' पूर्वार्धांत आणि उत्तरार्धांत समानार्थक आहे. येथें अष्टाक्षरात्मक यमक आहे. १५. शची. १६. मला. १७. राक्षसांच्या स्त्रियांच्या शोकाचें आर्तस्वर. १८. परिपूर्ण. १९. अग्नि. [शिखा+वत्=ज्याला शिखा (ज्योत) आहे तो शिखावत्=अग्नि. ज्या नामांचा अंत्य अथवा उपांत्य म् अ आ असतो त्या नामांस वत् [वान् (पुं), वती (स्त्री) प्रत्यय लागून नामदर्शित वस्तु बाळगणारा, धरणारा अशा अर्थाचीं विशेषणें (क्वचित्) नामें होतात. जसें—ज्ञानवान्, विद्यावान्, लक्ष्मीवान् (श्रीमान्) भास्वान् (सूर्य) यशस्वान्.] २०. सुवर्णनगर, लंका. २१. मारुतीनें लांगूलाग्नि समुद्रांत विझविला. (सर्ग ५४ श्लोक ४९ पहा.) २२. लंकादहनांत सीतेचा नाश झाला असें समजून. २३. शिंशपा वृक्षाच्या तळीं सीता बसली होती तिचें दर्शन घेऊन नंतर मारुति निघाला अशी कथा आहे. (सर्ग ५६.) २४. सूर्यापेक्षां उणा. २५. मोठमोठ्या वीरांचा आनंद. २६. हें पंतांचें ठरींव आवडतें यमक आहे.

सु[1]गळप्रियमधुवन लढुनि बळें तें[2]दधिप द[3]धिमुख मथिला, ।
तेणें तो अपराध क्रोधें [4]कपिपतिपतिला कथिला. ॥ गातां० ॥ २८६
समजे केलें कार्य, मोडिली तरिच [5]मैंदाज्ञा त्यांहीं, ।
न जयोत्कर्षाविणें लंघिली, धरुनि मदा ज्ञात्यांहीं. ॥ गातां० ॥ २८७
प्रभुला कार्यसिद्धि [6]कळवी, त्या सांत्वी [7]मधुवनपाळा, ।
सांगे, 'जा म्हण [8]त्यांसि न लावा मज भेटाया [9]काळा. ॥ गातां० ॥ २८८
दधिमुख सोडुनि परिभवखेद, प्रेरी [10]हरिचक्रातें, ।
ते अतिहर्षें नमिति प्रभुतें, अमर जसे शक्रातें. ॥ गातां० ॥ २८९
श्रीराम पुसे त्यांसि, 'सखे हो! [11]भटमणि हो! बोला हो! ।
मद्दयिताशुभवृत्त अमृत या श्रवणयुगा लोला [12]हो.' ॥ गातां० ॥ २९०
मारुति [13]चूडामणि दे, सांगे जें वदली आर्या तें, ।
ताततसा आलिंगी प्रेमें प्रभु त्या [14]कृतकार्यातें. ॥ गातां० ॥ २९१
प्रभु बोले, 'अभिषेक न बहु बा! [15]केलों मणिकनकांहीं, ।
तुज आलिंगन सर्वस्व दिलें, समुचित अणिक न कांहीं. ॥गातां०॥ २९२
या एका उपकारासि दिले, म्यां तुज सर्व प्राण, ।
यावरि करिसिल जे त्यांचा मीं बंधुसह ऋणी जाण. ॥ गातां० ॥ २९३
[16]परपुर केलें भस्म, लंघिला [17]मकरालय शतगांवें, ।
हें [18]चिर म्हणावया गात्यां हा न कराल यश तगावें.' ॥ गातां० ॥ २९४
इत्यादि बहु स्तवुनि प्रभुनें शुद्धयशें साजविला, ।
माजविला उत्साह मनीं तो परि सन्मणि लाजविला. ॥ गातां० ॥ २९५

---

१. सुग्रीवाचें आवडतें 'मधुवन' नामक उद्यान. २. त्या मधुवनाचा पाळक. ३. हा वानर सुग्रीवाचा मामा आणि मधुवनाचा पालक. ४. सुग्रीवाला. ५. माझी (सुग्रीवाची) आज्ञा. ६. या क्रियापदाचा कर्ता 'सुग्रीव' अध्याहृत आहे. ७. दधिमुखाला. ८. त्या अंगदादिप्रमुख वानरांस. ९. उशीरा, वेळा. १०. वानरमंडळातें पाठवी. ११. वीरश्रेष्ठ. १२. होऊ. १३. सर्ग ६६ श्लोक ४ पहा. १४. ज्यानें कार्य केलें त्या (मारुतीतें). १५. रत्नें आणि सुवर्ण यांनीं केलेला अभिषेक तुझ्या कामगिरीच्या मानानें पाहतां फार आहे असें नाहीं. १६. शत्रूचें नगर. (लंका.) १७. सागर. (मकरांचें आलय-वसतिस्थान.) १८. हें तव यश गात्यांला हाय न कराल असें म्हणाया चिरकाळ रहावें.

## युद्धकांड.

(साकीवृत्त.)

वर्णुनि लंकारचनां, सेना कथुनि खळदुरभिमाना, ।
तो कवि म्हणे, 'प्रभुजि! [1]चापलता हे सत्य [2]सुरभि माना. ॥गातां०॥ २९६
तव शर पवन [3]जलद [4]तो, [5]कीं हा [6]पावक [7]तो कापूस, ।
बापा! चापा सोडुनि न मला वानरतोका पूस.' ॥ गातां० ॥ २९७
प्रभु सुगळासि म्हणे, 'चाल सख्या! विजयश्री तुज वरिती, ।
वत्सा! सौमित्रे! जी कीर्ति [8]प्रीतिमती तुजवरि ती.' ॥ गातां० ॥ २९८
[9]विजयमुहूर्तीं सुगळानुमतें घेउनि भाउ निघाला, ।
खळदशकंठावरि घालाया कोपें जाउनि घाला. ॥ गातां० ॥ २९९
[10]वायुवाळिसुत रामलक्ष्मणा उडति नभीं वाहून, ।
पाहूनि द्विजवर आशी दे तदुत्कर्ष साहून. ॥ गातां० ॥ ३००
अगणित कपिबळ घेउनि गर्जत सुगळ सागरा गेला, ।
उत्तर जलधि गमे [11]त्यांवरि, तें स्मरुनि [12]आग, [13]रागेला. ॥ गातां० ॥ ३०१
तें चार कथिति, दशमुख पुत्र भ्राते मंत्री [14]बाहे, ।
मत्त मतें रणपण करि, नाश स्पष्ट बिभीषण पाहे. ॥ गातां० ॥ ३०२
'सीता [15]रामा दे, अग्नि बळें लाविसि कां गेहातें?' ।
[16]अहित गमे पुत्रांसह मूढा, जें हित सांगे [17]हा तें. ॥ गातां० ॥ ३०३
[18]हितशत्रु असें समजुनि [19]खळ त्या [20]परमहिता अपमानी, ।
प्रभुच्या तेजाहूनि आपलें तो जड बहु तप मानी. ॥ गातां० ॥ ३०४
[21]वदला 'नरकपिभय दाखविसी भीउन, हा [22]फटकाळा! ।

---

१. धनुष्य. २. कामधेनु. ३. मेघ. ४. तो रावण जलद होय. ५. किंवा. ६. अग्नि. ७. तो रावण कापूस होय. ८. प्रेम करणारी. ९. रामाची रावणावर स्वारी अभिजिन्नामक विजयमुहूर्तीं उत्तरा फाल्गुनी नक्षत्रीं निघाली. [सर्ग ४ श्लोक ३-५.] १०. मारुति आणि अंगद. (सर्ग ४ श्लोक १८-१९ पहा.) ११. त्या सुगळावर. १२. अपराध. [आग (आगस्) शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे.] १३. रागें भरला. १४. बोलावी, पाचारी. १५. हा बिभीषणाचा रावणास बोध होय. [सर्ग ९ श्लोक १९-२२; सर्ग १४ श्लोक ३-४.] १६. अप्रिय, कडू. १७. हा बिभीषण. १८. आपल्या हिताचा शत्रु. १९. दुष्ट रावण. २०. अत्यंत हितकर्त्या. २१. रावण बिभीषणास वदला कीं, तूं स्वतः भिऊन मला नरकपिभय (राम आणि सुग्रीव मारुति इत्यादि वानर यांचें भय) दाखविसि; हा फटकाळा! (हा हलकटा!) मी काळा महाफट (ज्याची फणा मोठी असा) व्याळ (सर्प) काळरूप भेकाला (बेडूक याला) गट करून टाकणारा आहें.'

गट काळाभेका करिता मी व्याळ महाफट काळा.' ॥ गातां० ॥ ३०५
होतां धिक्कार सभेंत, निघे घेउनि मंत्री चवघे, ।
सुज्ञ बिभीषण पाहे, मोहें काळें गिळिले अवघे. ॥ गातां० ॥ ३०६
त्यजि राज्यातें, दावपरिवृता जेंवि जग अरण्यातें, ।
शरणागत तो बहुमत झाला त्या विश्वशरण्यातें. ॥ गातां० ॥ ३०७
प्रभु अनुजातें सांगुनि करवी अभिषेक पदनतातें, ।
देववि राज्य, जसें तनयातें द्यावें स्वसदन तातें. ॥ गातां० ॥ ३०८

---

१. बेडुक. २. महा (मोठी) फटा (फणा) ज्याची असा. (व्याळ=साप.) ३. कृष्णवर्ण. ४. बिभीषणाची सभेंत धिक्कृति झाल्यावर तो चार राक्षसांसह सभा टाकून अंतरिक्षांत गेला व तेथून त्यानें रावणाला बोध केला. [सर्ग १६ श्लोक १७-२६ पहा.] ५. वणव्यानें व्यापिलेल्या. ६. हा उपमालंकार जाणावा. ७. तो बिभीषण चार राक्षसांसह रामासमीप येऊन रामास शरण गेला. [सर्ग १७ श्लोक १६ पहा.] ८. सर्वलोकशरण्य रामातें. [हें परिकर नामक अलंकाराचें उदाहरण आहे. याचें लक्षणः—'विशेषणैर्यत्साकूतैरुक्तिः परिकरस्तु सः' [काव्यप्रदीप—उल्लास १० कारिका ३२.] जेथें विशेषणें साकूत (सहेतुक, साभिप्राय) असतात त्या उक्तींत परिकरालंकार होतो. या साकींत विश्वशरण्यातें (विश्वाला ही शरण जाण्यास योग्य अशातें) रामाला विशेषण लाविलें आहे तें साभिप्राय आहे म्हणून येथें परिकरालंकार झाला. 'तुमचा तापहर्ता **शशिशेखर** शंकर होय' या वाक्यांत शशिशेखर हें विशेषण साभिप्राय आहे. 'हे इंद्रा! तुझ्या प्रसादानें **पुष्पबाण** मदन वसंतासह माझा साहाय्यकर्ता झाला, तर मी **पिनाकी** शंकराचें धैर्य तेंव्हांच हरीन' या वाक्यांत पुष्पबाण आणि पिनाकी हीं पदें साभिप्राय आहेत. हे अंगराज! सेनापते! द्रोणापहासक! कर्ण! या दुःशासनाला भीमापासून राख.' या वाक्यांत उक्तविशेषणत्रय सहेतुक आहे. भीम दुःशासनाला मारीत असतां, कर्णाच्यानें त्याचें रक्षण करवेना; तेंव्हां अश्वत्थाम्यानें मोठमोठ्यांची निंदा करणाऱ्या कर्णाला हा टोमणा मारिला आहे. ९. लंका जिंकून घेण्यापूर्वींच रामानें तिचें राज्य शरणागत बिभीषणास दिलें ही गोष्ट रामाच्या लोकोत्तर विमल चरितास आणि गौरवास लघुत्वप्रद आहे. 'रामचंद्र समुद्रतीरीं असून सेतुरचना करण्याच्या विचारांत असतांच बिभीषण त्यास येऊन भेटला. तेंव्हां त्याला अभय देऊन राज्यही दिलें. त्या समयीं लंकेचा स्वामी रावण होता. त्यास जिंकल्यानंतर तें स्वामित्व रामाकडे येणार होतें. त्या पूर्वींच दुसऱ्याच्या स्वामित्वाचें वस्तु तिसऱ्यास देऊन टाकिलें हें वर्णन रामचंद्रासारख्याच्या चरित्रांत अगदीं अयुक्त. यास्तव अशा ठिकाणीं मूळ ग्रंथार्थांत फेरफार करून, लंकेचें राज्य देण्याचें वचन मात्र बिभीषणास दिलें असें मोरोपंतानें वर्णावयाचें होतें म्हणजे ग्रंथकारास व नायकासही तें फारच भूषणप्रद झालें असतें. (हंसकृत मोरोपंतावरील निबंध—पृष्ठ ९८ पहा.) १०. बापानें. हा उपमालंकार जाणावा.

नाथ[1] अहोरात्रत्रय विनवी परि न घणमणी सिंधू ।
शर चापगुणीं जोडूनि म्हणे, 'हा या शोषू विंधू.' ॥ गातां० ॥ ३०९
तापे[2] सागर कोपें[3], भेटे, अभय प्रभुला मागे, ।
शरणागता तया प्रभु रक्षी, हृदयीं करुणा जागे. ॥ गातां० ॥ ३१०
'सेतु नळ[4] करिल, मी धरिन शिरीं, सद्यश बा! पसरेल.' ।
सागर विनवि असें, गातां हें सर्वहि पाप सरेल. ॥ गातां० ॥ ३११
पांचा दिवसांत दहा गांवें लांब रुंद शत गांवें[5], ।
सेतु[6] समुद्रीं प्रभु करवी, हें यश सुरबहुमत[7] गावें[8]. ॥ गातां० ॥ ३१२
कृत्रिम[9] धनु[10] शिर दावुनि, 'वधिला तव पति' हें खळ[11] सांगे, ।
'हो मद्दयिता, मर्त्यबळानें होतीस उडत कां गे! ? ॥ गातां० ॥ ३१३
मद्बळपति[12] प्रहस्त करि असा सुविजय उत्तररोधीं[13], ।
लक्ष्मण सुगळ पळाले, न रडें, बहु हित मत्कृतबोधीं[14].' ॥ गातां० ॥ ३१४
ऐसें छळितां[15], सचिवांनीं तो खळ नेला बाहून, ।
सरमा[16] बोधी श्रीतें, माया लोपे क्षण राहून. ॥ गातां० ॥ ३१५

---

१. नाथ (राम) तीन रात्रंदिवस समुद्राचीं आर्जवें करीत होता, पण तो कांहीं वळला नाहीं. (घणमणी=घाबरे, वळे, वश होई. हा शब्द कृष्णविजय–अध्याय ५७ श्लोक ४ यांत आला आहे.) तेव्हां रामानें धनुष्याला बाण जोडून म्हटलें कीं 'हा बाण या समुद्राला शोषून टाको व विंधून टाको.' [राम दर्भास्तीर्ण आसन घालून तीन दिवसपर्यंत समुद्रतीरीं होता, पण सागर आला नाहीं तेव्हां त्याला बाणानें आटून टाकण्याचा त्यानें निश्चय केला.] २. सर्ग २१ श्लोक १०-११ पहा. ३. बाणाग्नीनें सागरांतील जलचरांस ताप झाला म्हणून सागर संतापला. ४. नळ हा विश्वकर्म्याचा पुत्र. याला सर्ववस्तुनिर्माणसामर्थ्यरूप वर पित्यानें दिला होता. तसेंच विश्वकर्म्यानें आपल्या बायकोस असा वर दिला होता कीं तुला माझ्या सारखा पुत्र होईल. या वराच्या योगें सेतु बांधण्यास नल सर्वतोपरी योग्य होता. [सर्ग २२ श्लोक ४१-४७ पहा.] 'नळकपी बाळपणीं । शाळिग्राम टाकी जळीं नेऊनी । मग ऋषी म्हणती जीवनीं । पाषाण तरोत तव हस्तें ॥' [रामविजय–अध्याय २३ ओवी १२१ पहा.] ५. योजनें. ६. हा सेतु दशयोजन विस्तीर्ण आणि शतयोजन आयत (लांब) होता. [सर्ग २२ श्लोक ७२ पहा.] ७. देवांस अत्यंत संमत. ८. गायन करावें. ९. विद्युज्जिव्हानें केलेलें रामाचें धनु आणि मुख. १०. रामाचें धनुष्य आणि शिर. ११. रावण. [सर्ग ३१ पहा.] १२. माझा सेनापति. १३. उत्तर तीरीं. १४. मीं केलेल्या उपदेशांत. १५. छळिलें तेव्हां. १६. 'रावणानें जें सांगितलें तें सर्व खोटें होय, कपटानें रावणानें तुला मोहित केलें' इत्यादि सांगून सरमेनें शोकाप्लुत सीतेचें सांत्वन करून तिच्या संशयाचें निरसन केलें. [सर्ग ३३ श्लोक १-१५ पहा.]

संपूर्ण अहोरात्रत्रय[1] तें उतराया बळ[2] लागे, ।
**स**रमाहि कथी **श्री**स, ‘अरि[3] सचिवबोधासि[4] न वळला गे !’ ॥गातां०॥ ३१६
चढुनि **सु**वेळीं[5] **लं**कादुर्ग प्रभुवर देखत राहे, ।
बैसुनि प्राकारशिरःशृंगीं[6] खळहि कपिकटक पाहे. ॥ गातां० ॥ ३१७
दूरुनि पाहुनि, **सु**गळ समजला छत्रें[7] कीं खळ आहे, ।
सर्पी **ग**रुड तसा उडुनि पडे दुष्टीं[8], **श्री**स न साहे. ॥ गातां० ॥ ३१८
उडवुनि मुकुट नियुद्ध[9] करि तया बहु धिक्कारुनि ताडी, ।
पाडी त्या प्राकाराखालें, नखदंतांहीं फाडी. ॥ गातां० ॥ ३१९
ये[10] फिरुनि **सु**वेळाग्रीं, त्यातें **रा**म म्हणे, ‘बापा! हें ।
साहस न बरें, तुझिया क्षेमें क्षेमें[11] जना या पाहें.’ ॥ गातां० ॥ ३२०
**लं**केला जेव्हां सैन्यें तो कपिवर वेढी गमला ।
कोट म्हणे तीन दिसति बरवे तरि बरवे ढीग मला. ॥ गातां० ॥ ३२१
पाठविला सामार्थ[12] प्रभुनें **अं**गद, भेटे अरितें, ।
प्रभुची आज्ञा कथि, अवतंस[13] त्रिभुवन जीतें करितें. ॥ गातां० ॥ ३२२

---

१. तीन दिवस आणि तीन रात्री. [अहन्+रात्र+त्रय=दिवस+रात्रि+तींहींचा समुदाय; येथें ‘रात्रि’ शब्दाचें ‘रात्र’ असें रूप झालें आहे. ‘रात्रि’ शब्द तत्पुरुषसमासांत उत्तरपद असून, त्याच्या पूर्वी (१) संख्यावाचक शब्द, (२) अव्यय, (३) एकदेशवाचक शब्द, (४) सर्व, (५) संख्यात आणि (६) पुण्य हे शब्द असतां, त्याचें रात्र असें रूप होतें. जसें (१) द्विरात्र, (२) अतिरात्र, (३) पूर्वरात्र, अपररात्र, (४) सर्वरात्र, (५) संख्यातरात्र, (६) पुण्यरात्र. ‘अहन्’ शब्दापुढें रात्र (रात्रि), रूप आणि रथंतर हे शब्द आले असतां, न् बद्दल उ होऊन सामान्यसंधिनियमानें अहो असें रूप होतें; जसें–अहन्+रात्र=अहोरात्र, अहन्+रूप=अहोरूप.] २. सैन्य. ३. रावण. ४. अविद्ध, प्रहस्त, माल्यवंत इत्यादि प्रधानांच्या उपदेशास. ५. पूर्णिमेचे सुमारास राम सुवेळाचळावर चढले. [सर्ग ३८ श्लोक ३-१३.] पौष शुक्ल चतुर्दशीस किंवा पूर्णिमेस सुवेळारोहण झालें असें टीकाकाराचें मत आहे. ६. तटाच्या शिखरावर. ७. विजयछत्रावरून, रावणाच्या श्वेतछत्रावरून, श्वेतछत्ररूप राजचिन्हानें. ८. रावणावर. [रावण गोपुरावस्थित आहे असें पाहून सुग्रीव सहसा उड्डाण करून त्याच्याजवळ येऊन व त्याची विटंबना करून, त्याचा मुकुट घेऊन, त्याचीं शिरें धरून, त्याला खालीं पाडून, चालता झाला–अशी कथा आहे. [सर्ग ४० पहा.] ९. बाहुयुद्ध.. १०. ‘ये’ याचा कर्ता ‘सुग्रीव.’ ११. कल्याण. १२. सामन् (साम)+अर्थ=सख्य+हेतु. १३. तुरा. [अवतंस=शिरोवतंस=पुष्पें रत्नें इत्यादिकांचें केलेलें शिरोभूषण. ज्या आज्ञेतें त्रिभुवनांतील लोक अवतंस (शिरोभूषण–माथां धरण्यास योग्य, सर्वथैव मान्य अशी) करतात.]

'दशकंठा! देवर्षि पीडिले त्वां बहु अन्यायशतें, ।
बहु भाग्येंहि न तुज [1]कुजना! जें स्वल्पें अन्या यश तें, ॥ गातां० ॥ ३२३
कामी कोपी लोभी प्राणी तो सेवुनि विषय मरे, ।
यांसम नसती, जरि गमती, हे उग्र [2]दहन विष यम रे !॥ गातां० ॥ ३२४
[3]माजें हरिलें स्त्रीरत्न, मला वंदुनि दे मत्ता! तें, ।
कथिलें [4]शरणागतरक्षण हें स्वव्रत मज [5]मत्तातें. ॥ गातां० ॥ ३२५
प्राणादि त्वत्सर्वस्व रणीं व्यर्थ न खरचो, राहो, ।
[6]अथवा हो, जात्यश्वसुधैर्य त्यजुनि, न खर, चोरा! हो.' ॥ गातां० ॥ ३२६
प्रभुची आज्ञा कथि [7]मारुतिचा अंगद वर वीर गडी ।
त्या प्रकटुनि शक्तिहि अरिचा तो भंगद बरवी रगडी. ॥ गातां० ॥ ३२७
दशकंठ म्हणे, 'कोण प्रभुला [8]कथिता पथ, वानर तूं, ।
आम्हीं रतूं नीतिधर्मपथीं [9]स्वरसें अथवा न रतूं. ॥ गातां० ॥ ३२८
[10]तातसखा निंदिसि मज, मूढा! [11]तातघातका गासी, ।
त्यजुनि [12]यशोहंसासि अपयशा देसि [13]हात कागासि. ॥ गातां० ॥ ३२९
मातें [14]जा, त्यातें भजसी कां? भाजन धिक्कारा हो. ।
[15]जडा! न करिसी [16]प्रतीकार कां? म्हणसी [17]हिक्का राहो. ॥ गातां० ॥ ३३०
तातसखा मज भज; मी धर्में तुज [18]तातपद नतातें, ।
देतों, [19]त्या म्यांही घालावें खालें न वदन तातें'. ॥ गातां० ॥ ३३१
[20]तारेय म्हणे, '[21]काळाजगर ग्रासितसे कीं अंधा! ।
[22]संधा काय तुझी? तूं नेणसि नयधर्माच्या [23]गंधा. ॥ गातां० ॥ ३३२

---

१. जें यश अन्या स्वल्पें (भाग्यें), तें (यश) हे कुजना! (दुष्टा रावणा!) तुज बहु भाग्येंहि न–असा अन्वय. २. दहन (अग्नि), विष [व] यम हे जरी उग्र (भयंकर) गमती [तरी] (काम, कोप, व लोभ यांनीं ग्रस्त पुरुषांप्रमाणें) नसती. कामी कोपी वगैरे पुरुष दहनादिकांहून उग्रतर असा भाव. ३. माझें. ४. जो शरण आला त्याचें रक्षण करावें हें स्वव्रत. ५. माझ्या पित्यानें. (दशरथानें.) ६. अथवा हो (थांब), जातिवंत घोड्याचें सुधैर्य टाकून देऊन हे चोरा! (रावणा!) खर (गाढव) न हो (होऊं नकोस). ७. मारुतीचा गडी वर वीर अंगद प्रभुची आज्ञा कथी–असा अन्वय. ८. सांगणारा. ९. स्वेच्छानुसारें. १०. वालिमित्रा. ११. बापाचा (वाळीचा) घात करणारा राम त्याला. १२. यशोरूप हंसास. १३. हात देणें=आश्रय देणें, साहाय्य करणें. १४. मातें (मला रावणाला) जा (शरण ये), असा अर्थ दिसतो. १५. मूर्खा. १६. निवारणाचा उपाय, इलाज. १७. उचकी, हुंदका. १८. तुज नतातें (शरणागतातें) मी तातपद (वालिराज्य) देतों. १९. त्या तातें. (वालीनें.) २०. अंगद. (तारेचा पुत्र.) २१. काळसर्प. २२. प्रतिज्ञा. २३. लवाला.

श्रीरामप्रभुच्या बहु गाती मुनि कविवर कृत्यातें, ।
मूढतमा! तुज काय ठावुकें [1]विषयनरकभृत्या! तें? ॥ गातां० ॥ ३३३
'देतों देवी, पद नमुनि' असें कीं मत्ता! वद, 'नाहीं ।
साधु,' म्हणुनि घेसिल तूं देतां साधूंच्या वदनाहीं. ॥ गातां० ॥ ३३४
लंके नाथ बिभीषण केला सुज्ञप्रभुनें बरवा, ।
भरवायास यशोमृत न धरीं या पापाची परवा.' ॥ गातां० ॥ ३३५
कोपे दुष्ट धराया सांगे, धरिति भुजद्वय [2]चवघे, ।
अवघेहि उडुनि झाडुनि मारी, [3]प्रासादहि परिभव घे. ॥ गातां० ॥ ३३६
प्रभुला वंदुनि अंगद अरिचें [4]दुर्मत सांगे सारें, ।
आज्ञा प्रभुनें करितां, कांपे [5]क्षोणी कपिबळभारें. ॥ गातां० ॥ ३३७
अगणित कपिबळ सहसा [6]लंकाप्राकारावर [7]वेघे, ।
वांटे त्या [9]गुडराशीचे [10]तें [11]नाकाराव [12]रवे घे. ॥ गातां० ॥ ३३८
मारिति राक्षस, कपिंनीं वधितां, [13]हांका, यम हा मारी, ।
कपिरूप धरुनि म्हणवील असी 'हा!' काय महामारी? ॥ गातां० ॥ ३३९
चतुरंग कटक आणुनि भारी दशमुख तो युद्ध करी, ।
केवळ मदांध होउनि जैसा सिंहासीं क्रुद्ध [14]करी. ॥ गातां० ॥ ३४०
कपि राक्षस बहु मेले, नटले बहु [15]कबंध रणरंगीं, ।
अंगीं [16]क्षतशत गणिति सुख, जसें कामुकजन रतिसंगीं. ॥ गातां० ॥ ३४१
वरिला सिंधु तदितरस्थानीं न टिकुनि रक्तनदीनीं, ।
कीं लोकीं प्रायशः स्त्रियांचें [17]मानस सक्त न दीनीं. ॥ गातां० ॥ ३४२

---

१. विषयादि सुखांच्या आणि नरकाच्या सेवका. २. चार राक्षस. [धरा, मारा, अशी रावणाची आज्ञा होतांच चार घोर राक्षसांनीं अंगदास धरिलें. त्यासमयीं अंगदानें त्या राक्षसांसह राजमंदिरावर मोठ्या वेगानें उड्डान केलें, त्यामुळें ते राक्षस कांपत कांपत भूमीवर पडले आणि प्रासादाचा शिरोभाग शतशः चूर्ण झाला–अशी कथा आहे. सर्ग ४१ श्लोक ८३-८९ पहा.] ३. राजवाडा, राजमंदिरांच्या शिरोभागाचा पराभव (भंग) झाला. ४. दुष्ट विचार. ५. पृथ्वी. ६. लंकेच्या तटावर. ७. चढे. ८. हा उत्प्रेक्षालंकार जाणावा. ९. गुळाच्या राशीचे. १०. बळ. ११. स्वर्गी शब्द ज्याचा असें. (सैन्याचें विशेषण.) १२. तुकडे, लहान गोळे. १३. राक्षस हांका मारिती–राक्षससैन्यांत मोठा कोलाहल माजला. १४. हत्ती. १५. धडें, मस्तकहीन शरीरें. १६. शेंकडों जखमा. (क्षतें.) १७. चित्त. हें अर्ध सुभाषितरूप आहे.

सेनापति प्रहस्त[1] निवटिला[2], रावण केला भग्न, ।
प्रथम रणीं झालें चिंतेंत क्षणदाचर[3]बळ मग्न. ॥ गातां० ॥ ३४३
मग त्या घननादें केले ते दाशरथी बद्ध रणीं, ।
'नर किति' म्हणे[4] 'मजपुढें? क्षम मीं जो वज्री तद्धरणीं.' ॥ गातां० ॥ ३४४
खेचरी[5] नेती श्रीस पुष्पकीं[6] पतिवचनें वाहून, ।
'हाय!' म्हणे[7] कपि पाशबद्ध ते पति देवर[8] पाहून. ॥ गातां० ॥ ३४५
अतिमूर्छाव्याकुळ मानुनि ते मृत, शोकीं श्री पडली, ।
रडली, तेव्हां त्रिजटा चिंता[9] हरि, हृदयीं जी जडली. ॥ गातां[10]० ॥ ३४६
नेली पुन्हा अशोकवनीं श्री, आला पक्षीश[11] तदा, ।
तत्त्रासें[12] तें अहिकुळ[13] पळतां मागें लक्षी शतदा. ॥ गातां० ॥ ३४७
पक्षिवरकरस्पर्शें झाले व्रणहि फणीसे[14] नाहीं, ।
केले जयजयकार[15] पहातां स्वस्थ[16] धणी सेनाहीं. ॥ गातां० ॥ ३४८
पुनरपि राक्षस कदन करिति, ते सुगळ दाशरथि भारी ।
मारी, घटकर्ण रणीं सारी[17] सेना मागें सारी[18]. ॥ गातां० ॥ ३४९
मूर्छित करुनि सुकंठासि धरी[19], विजयी होउनि परते, ।
परतेजस्वी तद्घ्राण[20] हरी, 'हा! हा!' वदले पर[21] ते. ॥ गातां० ॥ ३५०
मुरडे कुंभकर्ण तो, क्रोधें प्लवंगभट[22] गिळी सगळे, ।
तन्नादें खचलीं नगशिखरें, मग कपिबळ कां न गळे? ॥ गातां० ॥ ३५१

---

१. या प्रहस्ताला नीलवानरानें मोठी शिळा डोक्यावर फेंकून मारिलें. [सर्ग ५८ श्लोक ५३-५५.] . मारिला. ३. राक्षससैन्य. ४. घननाद म्हणे–'मजपुढें नर किति? (माझ्यापुढें रामादिक ुष्यांची काय प्रतिष्ठा आहे?) जो वज्री (वज्रधारी इंद्र) तद्धरणीं (त्याला पराजित करण्यामध्यें.) म (समर्थ) मीं आहे, त्या मजपुढें रामाचें काय चालणार? ५. राक्षसी. ६. रावणाच्या आज्ञेनें ीतेला पुष्पक विमानांत बसवून राक्षसींनीं शरतल्पगत रामलक्ष्मण दाखविले–अशी कथा 'आहे. ःर्ग ४७]. ७. सीता हाय म्हणे. ८. बाणविद्ध असें असतें तरी चाललें असतें, कारण हे नाग रभूत होते. ९. लक्ष्मण. १०. रामलक्ष्मण त्रिसंज्ञ आहेत, मृत नाहींत, असें सांगून त्रिजटेनें चिंता र करून सीतेचें सांत्वन केलें. [सर्ग ४८.] ११. गरुड. १२. त्या गरुडाच्या भयानें. १३. तें रभूत (शर झालेल्या) अहींचें (सापांचें) कुळ (समुदाय). १४. सापासारखे. वैनतेयानें काकुत्स्थांस रस्पर्श करतांच नाग पळूं लागले आणि रामलक्ष्मण पूर्वस्थितीवर आले. (सर्ग ५०.) १५. आ-दघोष. १६. चिंतारहित, नागपाशमुक्त. १७. सगळी. १८. लोटी, ढकली. १९. सर्ग ६७ श्लोक २ पहा. २०. त्या कुंभकर्णाचें नाक (घ्राण). सुग्रीवानें कुंभकर्णाला कर्णनासाविहीन केलें–अशी था आहे. (सर्ग ६७ श्लोक ८७ ८९ पहा.) २१. शत्रु. २२. वानरवीर.

खंडुनि भुज चरण शिर[1] प्रभुनें रणरंगीं लोळविला[2], ।
बोळविला[3] परलोका, दशमुख तच्छोकें[4] पोळविला[5]. ॥ गातां० ॥ ३९२
देउनि धैर्य पित्यातें[6] मेघध्वान महामायावी[7], ।
प्रभुसह सर्व खिळी[8] कीं विजयश्री निजधामा[9] यावी. ॥ गातां० ॥ ३९३
मारुति दशमुखबंधु निराळे करुनि कश्मळें[10] गिळिले[11] ।
वर्षुनि खरतर शर गगनस्थें गुप्तें सर्वहि खिळिले. ॥ गातां० ॥ ३९४
जांबवदुक्तें मारुति गेला श्रीकैलासाजवळ ।
आणी ओषधिशृंग [12]गमे तें तत्पाणि[13]स्थितकवळ. ॥ गातां० ॥ ३९५
त्या दिव्यौषधिगंधवहानें[14] उठले विशल्य[15] सर्व, ।
पावुनि शिखर[16] पुन्हा ये, न धरी अद्भुत कर्मं गर्व. ॥ गातां० ॥ ३९६
त्यावरि करिती श्रीदाशरथी राक्षसबळकदनातें, ।
आठवलें विधि[17] [18]नंदिकेश जें वदले दशवदना तें. ॥ गातां० ॥ ३९७

---

१. रामानें कुंभकर्णाचें शिर कापलें. [सर्ग ६७ श्लोक १६७.] २. पाडिला. ३. पाठविला. ४. त्या कुंभकर्णनिमित्त शोकानें. कुंभकर्णमृत्यु ऐकून रावणानें भारी शोक केला, त्याला बिभीषणाच्या उपदेशाची आठवण होऊन पश्चात्ताप झाला. [सर्ग ६८ पहा.] ५. भाजून टाकिला. ६. पुत्रभ्रातृवधखिन्न अशा पित्याला (रावणाला). देवांतक, नरांतक, महोदर, महापार्श्व, इत्यादि राक्षस, त्रिशिरा, अतिकाय, कुंभकर्ण, या सर्वांचा वध झाल्यामुळें रावणाचें धैर्य खचून गेलें होतें, अशा समयीं इंद्रजितानें त्याचें स्वपराक्रमप्रशंसापरभाषणानें सांत्वन करून धैर्य दिलें. (सर्ग ७३.) ७. मोठा कपटी. ८. ब्राह्मास्त्राचा प्रयोग करून रामलक्ष्मणांसह सर्व वानरसैन्यास मोहून टाकी. (सर्ग ७३ श्लोक ७० पहा.) ९. आपल्या घराला. १०. मूर्छेनें. ११. इंद्रजिताच्या मोहनास्त्रानें (मूर्च्छेनें) मारुति व बिभीषण यांस वगळून (निराळे करून) बाकी सर्वांस घेरून टाकिलें. तसेंच आकाशांत दडून बसलेल्या इंद्रजितानें प्रखर बाणांची वृष्टि करून सर्वांस खिळून टाकिलें. इंद्रजित् आकाशांत गुप्तरूपें राहून शरवृष्टि करी, असें वर्णन आहे. [सर्ग ७३ श्लोक ६५ पहा.] १२. हा उत्प्रेक्षालंकार जाणावा. १३. त्याच्या हातामधें असणारा ग्रास. १४. वायूनें. १५. शल्यपीडारहित. १६. ओषधिशिखर मारुतीनें पुन: परत स्वस्थानीं नेलें. [सर्ग ७४ पहा.] १७. रावणाच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्याला वर दिला होता त्याचा येथें उल्लेख आहे. 'मनुष्यादिक प्राणी मला तृणासारखे तुच्छ आहेत, तेव्हां मला देव, गरुड, नाग, यक्ष, दैत्य, राक्षस यांपासून मरणभय नसावें' असा रावणानें वर मागितला. तेव्हां 'तुझें वचन खरें होईल' असें विधीनें सांगितलें. [उत्तरकांड—सर्ग १० श्लोक १८-२२ पहा. मंत्ररामायण—उत्तरकांड—गीति ३३-३५ पहा.] १८. नंदीच्या रूपाला पाहून रावण हंसला, तेव्हां त्यानें रागानें दशाननास शाप दिला कीं, 'ज्यांचें रूप व तेज मजसारखें आहे असे वानरच तुझा संहार करतील.' या गोष्टीचा येथें उल्लेख आहे. [उत्तरकांड—सर्ग १६ श्लोक १६-१९ पहा. मंत्ररामायण—उत्तरकांड—गीति ६८ पहा.]

मायासीता आणी दावी **घन**नाद रणीं पापी, ।
दापी सर्वांसि, तिचें खड्गें प्रभुसमक्ष शिर कापी. ॥ गातां० ॥ ३५८
मोहुनि रडवी सुगळ**मरु**त्सुतलक्ष्मणसह निर्माया, ।
जाय रणीं अमरत्वप्रद रथ होम करुनि निर्माया. ॥ गातां० ॥ ३५९
कळवि **बि**भीषण कपट, सलक्ष्मण शीघ्र विघ्न करि होमीं, ।
जो **घन**नाद क्षोभोनि म्हणे, 'वधिन तुम्हां अरि हो! मी.'॥ गातां० ॥ ३६०
दारुण रण **रा**वणि करि, परि तो प्रभुच्या अनुजें वधिला. ।
**श**क्र म्हणे, 'उद्धरिला कांटा माझ्या हृदयामधिला.' ॥ गातां० ॥ ३६१
सुतशोकाकुळ **रा**वण गेला **सी**तेला माराया, ।
सचिव **सु**पार्श्व म्हणे, 'न वधावी स्त्री बरवी बा! राया!' ॥ गातां० ॥ ३६२
मग चतुरंग कटक बहुकोटि प्रेपी प्रभुवरि अरि तो ।
त्यातें प्रभु करि भस्म, तृणातें जेंवि दवानळ करितो. ॥ गातां० ॥ ३६३
राक्षसदारविलापलक्ष जें तया परिसवेना तें, ।
समरार्थ निघे, मुनि म्हणति भला जयापरिस वेनातें. ॥ गातां० ॥ ३६४

---

१. सीतेची कृत्रिम प्रतिमा. मायेची सीता इंद्रजितानें रणांत आणून सर्वांसमक्ष मारिली, तेव्हां वार्ता हनूमंतानें रामास कळविली. राम शोकाकुल होऊन मूर्च्छित पडला, तेव्हां लक्ष्मणानें बोध रून त्याचें सांत्वन केलें आणि त्यास शुद्धीवर आणिलें. [सर्ग ८३ श्लोक १३-१४ पहा.] २. मारहिता रामा. ३. निकुंभिलेला जाऊन यज्ञ करून ब्रह्मदेवापासून अलौकिक रथ, व ब्रह्मशिरोस्त्र ळवावयाचें होतें, म्हणून इंद्रजिताची तयारी चालली होती. हा रथ मिळाला असता तर इंद्रजित् वध्य झाला असता. ४. बिभीषणानें मेघनादाचें कपट रामास कळविलें व इंद्रजिताचा यज्ञ समाप्त ला तर तो सर्वांस अवध्य होईल असेंही कळविलें. [सर्ग ८५ पहा.] ५. तीन अहोरात्र युद्ध रून लक्ष्मणानें इंद्रजिताला मारिलें. दशमीच्या चतुर्थ प्रहरीं युद्धास आरंभ झाला व त्रयोशीच्या चतुर्थ प्रहरीं मेघनादाचा वध झाला. [सर्ग ९१ श्लोक १६ पहा.] ६. उपटून काढला. . सीतेला मारण्याचा निश्चय करून तरवार घेऊन रावण सीतेकडे गेला त्याचें निवारण सुपार्श्वानें लें. [सर्ग ९२ श्लोक ५९-६३ पहा.] या दिवशीं कृष्णपक्ष चतुर्दशी होती. ८. वणवा. ९. राक्षसांच्या स्त्रियांचे लाखों विलाप. १०. जें राक्षसांच्या बायकांच्या आक्रोशांचें लक्ष (अमित विलाप) तें तया (रावणाला) परिसवेना (ऐकवेना) तेव्हां जयापरिस (ज्या रावणापेक्षां) वेनातें (वेनराजातें—पृथुपित्यातें) नि भला म्हणती (असा दुष्टतर रावण) समरार्थ निघे (युद्धाला निघता झाला.) राक्षसीविलापवणानें संतप्त होऊन रावण रामहननार्थ निघाला—अशी कथा आहे. [सर्ग ९५ पहा.] ११. वेन—अंगराजास सुनीथेपासून झालेला पुत्र. हा राजा फार दुष्ट होता, म्हणून ब्राह्मणांनीं यास शापदग्ध रून मारिलें. नंतर त्याच्या मृतदेहाचें मथन करून त्यापासून पृथुनामक पुत्र आणि अर्चिनामक न्या उत्पन्न करून त्यांचा विवाह करून दिला. या राजाची अत्यंत दुष्टत्वाविषयीं ख्याति आहे.

निश्चय करि नरकपि मारावे कीं आपणचि मरावें, ।
तद्दैव म्हणे, 'जें शेवटिलें चिंतित तेंचि करावें.' ॥ गातां० ॥ ३६५
उत्पातांतें[1] न गणी, गांठी तो प्रभुसीं अरि घाली[2], ।
त्याच्या तेजें भीति प्रभुच्या मात्र मनीं न रिघाली[3]. ॥ गातां० ॥ ३६६
रावण होय प्रभुबंधूरीं[4] उग्र शक्ति शिरकविता, ।
ती त्याचें कांपवि, जसि मुनिची[5] रसिकाचें शिर कविता. ॥गातां०॥ ३६७
तेव्हांहि उठवि मारुति आणुनि ओषधिगिरिशिखरातें[6]. ।
वर्णुनि सांगे सर्व कवींस प्रभु कीं 'यश विखरा[7] तें.' ॥ गातां० ॥ ३६८
दशमुख रथीं, क्षितिवरि प्रभु, तें शक्रास पहावेना, ।
स्वरथ[8] पाठवी तो कीं अरिचा उत्कर्ष सहावेना. ॥ गातां० ॥ ३६९
मातलि सारथि वंदी प्रार्थी, प्रभु शक्ररथीं चढला, ।
पढला गुरुपाशीं तें प्रकटी, शत्रुक्रोधें कढला. ॥ गातां० ॥ ३७०
प्रभुहि न आटे, अरिहि न आटे, शस्त्रांहीं नभ दाटे, ।
वाटे दुर्जय दशमुख समरीं, सुरहृदय भयें फाटे. ॥ गातां० ॥ ३७१
सप्त अहोरात्र[10] महायुद्ध क्रुद्ध द्वेष्टा करि तो, ।
परितोष न होय सुरर्षींतें, वाटे प्रभुयश हरितो. ॥ गातां० ॥ ३७२
अरिचें शिर एकैक दहादां खंडी प्रभु शत पाडी, ।
फुटलीं जेंवि न तुटलीं उटलीं दशहि न मग विभु ताडी. ॥गातां० ॥ ३७३
प्रभु निजशस्त्रास्त्रांची शक्ति क्षीणा ऐसें मानी, ।
वचके नच केली वाटे त्या शत्रुशरांची हानी. ॥ गातां० ॥ ३७४
प्रकटे घटज प्रभुला सांगे 'रविहृदय' महामनुतें[11], ।
धनुतें ईषुतें[12] विजयश्री दे भेद धरुनियां हनुतें. ॥ गातां० ॥ ३७५

---

१. अशुभ निमित्तांतें. [सूर्यप्रभानाश, दिशांधकारमयत्व, पक्षिघोरशब्द, मेदिनीकंप, रुधिरवृष्टि, तुरंगमस्खलन, ध्वजाग्रगृध्रपतन आणि शिवारुत असे उत्पात रावण युद्धास निघाला तेव्हां झाले. सर्ग ९५ श्लोक ४३-४५ पहा.] २. गांठ घालणें=भिडणें, झुजणें. ३. शिरली. ४. प्रभु+बंधु+उरीं=रामाच्या भावाच्या वक्षस्थळीं. ५. वाल्मीकिमुनीची. ६. रावणप्रेरित शक्तीनें लक्ष्मणाला मूर्च्छा आली तेव्हां हनूमंतानें औषधिपर्वतशिखर आणून त्याला शुद्धीवर आणलें. [सर्ग १०१.] ७. विश्वांत पसरा. ८. सरथ रावणाबरोबर अरथ रामाचें युद्ध उचित नव्हे असें मनांत आणून इंद्रानें आपला मातलिसारथियुक्त रथ पाठविला. [सर्ग १०२.] ९. यांत अनुप्रास अलंकार आहे. १०. रामरावणाचें युद्ध सात अहोरात्र झालें. सातवी रात्र उलटल्यावर (नवव्या दिवशीं) रावणवध आश्विन शुद्ध नवमीस झाला. [सर्ग १०७ श्लोक ६५.] ११. महामंत्रातें. १२. बाणातें.

रविदत्तवरें [1]ब्रह्मास्त्रधरें उर तीक्ष्ण शरें भेदी, ।
दे [2]दीर्घस्वाप तया प्रभु, कीं झाला चिर तो खेदी. ॥ गातां० ॥ ३७६
रावणतनु भूवरि, कुसुमांची वृष्टि प्रभुवरि पडली, ।
झडली चिंता, कार्यसिद्धि जी बहु अवघड ती घडली. ॥ गातां० ॥ ३७७
देवांनीं दुंदुभि वाजविले, मेघध्वनि लाजविले, ।
[4]आशान्त स्तुतिनीं गाजविले, लोक यशें [5]साजविले. ॥ गातां० ॥ ३७८
[6]अग्रजभार्या समजावी तो साधु बिभीषण यत्नें, ।
वाक्य '[7]ममाप्येष यथा तव' हें ऐकवितां रघुरत्नें. ॥ गातां० ॥ ३७९
जें उत्तरकार्य भ्रात्याचें करि साधु यथाविधि तें, ।
श्रुतिसी मान्या होय प्रभुची सत्कीर्तिकथा विधितें. ॥ गातां० ॥ ३८०
श्रीरामें बंधुकरें विधिनें करवुनि अभिषेक [8]महें, ।
शरणागत [9]सुपदीं बैसविला, सद्यश नुरवि श्रम हें. ॥ गातां० ॥ ३८१
[10]यावच्चंद्रदिवाकर धरणी स्वकथा [11]तावद्राज्य, ।
दिधलें बिभीषणासि प्रभुनें, स्वच्छ सुख यश [12]प्राज्य. ॥ गातां० ॥ ३८२
मग मारुति पाठविला प्रभुनें श्रीस विजय सांगाया, ।
ती तृषिता, आळस सुरसिक तो भक्त करिल कां गाया? ॥गातां०॥३८३

---

१. पैतामहास्त्र शराला जोडून रामानें त्या शरानें रावणाचा वध केला. [सर्ग १०८.] २. दीर्घनिद्रा मरण. ३. मंत्ररामायण—युद्धकांड—गीति ७०६ पहा. ४. दिशांत.(आशा+अंत.)५. यांत यमक यमक अलंकार आहे,कारण येथें 'जविले' या वर्णांची आवृत्ति प्रत्येक चरणाच्या शेवटीं झाली आहे. श्लोकाचे प्रथम चरणाचे अंतीं किंवा पूर्वार्धाचे अंतीं जीं अक्षरें आलीं असतात, तींच (एक, दोन, तीन, चार, अशीं पाहिजेत तितकीं) अक्षरें द्वितीय चरणाचे अंतीं किंवा उत्तरार्धाचें अंतीं आलीं असतां जो शब्दालंकार होतो त्यास 'यमक' म्हणतात. या स्थळीं जें यमक आहे त्याला 'पुष्पयमक' असें म्हणतात. प्रत्येक पादाच्या अंतीं, डेंखावर जसें पुष्प असतें त्याप्रमाणें, जें यमक (भिन्नार्थक पण समवर्णात्मक अक्षरवृंद) असतें त्याला 'पुष्पयमक' म्हणावयाचें. [भट्टिकाव्य—सर्ग १० श्लोक १४.] यमकाचे पादांतयमक, चक्रवालयमक, समुद्गकयमक, कांचीयमक, मिथुनयमक, वृत्तयमक, पुष्पयमक, पुच्छयमक, सर्वयमक, महायमक, असे अनेक प्रकार आहेत. ६. मंदोदरी. ७. माझाही हा (रावण बंधु) जसा तुझा. [असाच उद्गार मंत्ररामायणांत आहे—'करणें क्रिया यथोक्त, त्वद्बंधु जसा तसाच हा माझा' इत्यादि पहा. गीति ७१३. तसेंच मूळ रामायणांतही 'ममाप्येष यथा तव' हेच शब्द आहेत. 'मरणांतानि वैराणि निवृत्तं न प्रयोजनम् । क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥'. सर्ग १०९ श्लोक २५.] ८. उत्सवानें. ९. लंकाराज्यपदावर बिभीषणाला बसविलें. [सर्ग ११२ पहा.] १०. जोंवर चंद्र सूर्य आहेत. ११. तोंवर राज्य. १२. पुष्कळ.

**श्री** बोले, 'वत्सा! तुज द्यावें, परि योग्य नसे कांहीं, ।
अमृतघनाचा सत्कार घडे [1]कोणाहि न [2]सेकोंहीं.' ॥ गातां० ॥ ३८४
**मारु**ति म्हणे, 'राक्षसी होत्या म्हणवित तुज वरदे! '[3]हा!' ।
[4]यांचा वध परम प्रिय माते! मज दासा वर दे हा.' ॥ गातां० ॥ ३८५
देवी म्हणे, 'न माराव्या बा! बळहीना या दासी, ।
[5]कासार सुके, [6]उग्रत्व नसे मग दीना [7]यांदासी.' ॥ गातां० ॥ ३८६
**मारु**ति वर्णी श्री**सी**तेच्या [8]पुण्याचारा [9]शीला, ।
वारंवार नमस्कारी त्या पुण्याच्या [10]राशीला. ॥ गातां० ॥ ३८७
प्रभुसि निरोप पुसे, **श्री** सांगे, '**श्री**चरण पहायाचा ।
सुचिर मनोरथ आहे, त्यांच्या छायेंत रहायाचा.' ॥ गातां० ॥ ३८८
**मारु**ति येउनि कळवि प्रभुतें कळवी [11]**लं**केशाला, ।
ज्याच्या कीर्तिस चिंतामणिची बहुतचि शंके शाला. ॥ गातां० ॥ ३८९
[12]न्हाणवुनि अळंकारवुनि [13]नतें देउनि शुचि [14]शिबिकेला. ।
**श्री** भेटविली प्रभुला, जेणें [15]स्वयशोरुचि [16]**शि**बि केला. ॥ गातां० ॥ ३९०

---

१. हें अर्ध सुभाषितरूप आहे. २. सेचनांनीं. ३. हाय. ४. या राक्षसींचा. ५. सरोवर. ६. क्रूरपण. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ७. जलजंतु. ८. पवित्र आचाराला. ९. सुस्वभावाला. १०. हा संदष्टक अथवा युक्पाद नामक यमकालंकार आहे. जेथें द्वितीय आणि चतुर्थ पाद सारखे असतात तेथें हा अलंकार होतो. ११. बिभीषणाला. १२. स्नान घालवून. (न्हाण=स्नान.) १३. शरणागतें. (बिभीषणें.) १४. पालखीला. १५. गोडी. [प्रख्यात शिबि राजालाही ज्याचें यश आवडलें—असा भावार्थ.] १६. शिबि—हा सोमवंशीय उशीनरराजाचा ज्येष्ठ पुत्र. या राजाविषयीं दोन कथा महाभारतांत आहेत, त्यांतून पहिलीचा येथें उल्लेख आहे ती अशी:—शिबिराजाची परीक्षा करण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेतलें व अग्नीनें कपोताचें रूप घेतलें. नंतर श्येन आपले पाठीस लागला आहे अशा मिषानें कपोत उशीनर राजाजवळ आश्रयार्थ आला. त्यास आश्रय मिळाला हें पाहून 'माझा भक्ष्य मला दे' असें श्येन म्हणूं लागला. तेव्हां कपोताचे भारंभार उशीनर राजानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देण्याचें कबूल केलें. परंतु शरीराचा बराच भाग तोडून तराजूंत घातला तरी कपोत जडच येऊं लागला, तेव्हां उशीनर स्वतःच पारड्यांत बसला. तें पाहून उभयतां संतुष्ट होऊन आपलीं रूपें प्रगट करून वर देऊन गेले. (महाभारत—वनपर्व—अध्याय १३०-१३१.) याप्रमाणें प्रथम कथा झाली. द्वितीय कथा आहे ती अशी:—या राजाचें सत्व पाहण्यासाठीं ब्रह्मदेव विप्ररूपानें आला आणि त्यानें राजाच्या पुत्राचें (बृहद्गर्भाचें) मांस खावयास मागितलें. राजानें मांस शिजवून तयार केलें, पण विप्र कोठें दिसेना, तेव्हां मांसपात्र मस्तकावर घेऊन राजा विप्राचा शोध करीत फिरूं लागला. तों तो विप्र राजमंदिरास आग लावीत आहे असें यानें पाहिलें. पण मनांत विकल्प न धरतां राजानें विप्राची प्रार्थना करून 'सिद्ध केलेलें

प्रभु तीस म्हणे, 'समरीं तपलों[1] निंदापरिहारा मी, ।
स्वीकार तुझा अयशस्कर या होइल परि हा रामीं. ॥ गातां० ॥ ३९१
स्त्रीरत्न म्हणुनि यत्नें आला घेउनि तुज अरि[2] कामी, ।
राहों देइल निद्रालु बरी सुखशय्या न रिकामी'. ॥ गातां० ॥ ३९२
[3]यीया [4]स्वशुचित्वप्रत्यय ती करि दि[5]व्य [6]अनादिसती, ।
झाली कनकमूर्तिसी [7]ज्वलनीं देवादिजना दिसती. ॥ गातां० ॥ ३९३
सुरमुनिगीता सीता [8]दहनें प्रभुच्या अंकावरि ती ।
बसविलि, घनीं अकंपा [9]शंपा असि किति शंका वरिती. ॥ गातां० ॥ ३९४
'शतमखसख दशरथ नृप भेटे तात,' असें शिव [10]कळवी, ।
पळवी श्रम पितृसुतसंगम तो [11][12]पतिमतिमतितें वळवी. ॥ गातां० ॥ ३९५
आलिंगी पुत्रांस सुनेस प्रेमें हुंगी शिर, ती ।
भेटि मुक्ति कीं नृपमति जैसी [13]क्षौद्रीं मुंगी शिरती. ॥ गातां० ॥ ३९६
सीतेचें [14]व्रत वर्णूनि [15]म्हणे, 'क्षिति बहुतचि रंजीव, ।
म्हणति प्रजा न तेजें करितां अरि न हुत चिरंजीव.' ॥ गातां० ॥ ३९७
शक्र म्हणे, 'वर माग.' प्रभुही, 'मृत उठिव' असें मागे, ।
अमृतवृष्टिनें [16]उठवी बळ तें, वाटे निजलें जागे. ॥ गातां० ॥ ३९८
प्रभुला [17]लंकानाथ कराया [18]पूजन सेवा विनवी, ।
'नयनांहीं शोभवुनि मूर्तिची शोभा सेवावि नवी.' ॥ गातां० ॥ ३९९

---

मांस स्वीकारावें' अशी विनंति केली. 'मी तें खात नाहीं, तूंच तें खा' असें प्रत्युत्तर विप्रानें केलें. त्याप्रमाणें राजा तें मांस खाणार तों ब्रह्मदेव प्रसन्न होउन, स्वरूप प्रकट करून, राजास आशीर्वाद देऊन, त्याचा पुत्र पूर्ववत् सजीव करून अंतर्धान पावला—अशी कथा आहे. (महाभारत—वनपर्व—अध्याय १९४-१९८.)

१. हे सीते! माझी लोक निंदा करतात तिचा परिहार (निरसन) करावा म्हणून मी, युद्ध करून मोठे श्रम घेतले. परंतु परगृहोषित स्त्रीचा स्वीकार अनुचित या न्यायानें तुझा हा स्वीकार या रामाला (मला) अयशस्कर (अकीर्तिपद) होईल. २. कामुक. ३. यावा म्हणून. ४. आपल्या शुद्धपणाचा विश्वास. ५. लक्ष्मणरचिताग्निप्रवेशरूप दिव्य. ६. सीता. ७. अग्नींत. ८. मूर्तिमान् अग्नीनें. [सर्ग ११८.] ९. वीज. १०. तुझा इंद्रलोकगत पिता दशरथ हा विमानस्थ येत आहे असें महादेवानें रामाला सुचविलें. [सर्ग ११९.] ११. पतियुक्त जी कैकेयी तिच्या बुद्धीतें. १२. तो पितृसुतसंगम (पितापुत्रांचा समागम) श्रम पळवी=त्या भेटीमुळें बापलेकाचे पांग फिटले व कैकेयीची बुद्धिही फिरली. १३. मधाचे ठायीं. १४. पातिव्रत्यरूप व्रत. १५. दशरथ म्हणे. १६. शक्राच्या वरप्रसादानें मृत वानरांना पुनर्जीवितप्राप्ति झाली. [सर्ग १२०.] १७. बिभीषण. १८. स्नानांगरागधारणादि पूजन घेण्याविषयीं रामाची प्रार्थना बिभीषणानें केली. [सर्ग १२१.]

प्रभु सांगे, '[1]सबळा सुगळाचें प्रेमें पूजन बा! जें ।
[2]माजें, भेटिव भरत शीघ्र, मी त्याच्या विरहें भाजें. ॥ गातां० ॥ ४००
त्वां जोडुनि दिधली विजयश्री, भेटविली हे [3]भूजा, ।
तिसरी सत्कीर्तिहि केली बा! रघुवंशाची पूजा.' ॥ गातां० ॥ ४०१
भक्त बिभीषण आज्ञा प्रभुची प्रेमें माथां वाहे, ।
सबळा सुग्रीवातें पूजी, परमसुखातें लाहे. ॥ गातां० ॥ ४०२
प्रभुला पुष्पकविमान [4]दे, जें रंजवि [5]नौका मग तें, ।
कां त्या [6]लोकेशस्तुतचरणा रंजविना [7]कामगतें ? ॥ गातां० ॥ ४०३
प्रभुसंकल्पें पुष्पक गगनीं शिरला खगवरसा जो, ।
कां न [8]गगनमणिसा तेजस्वी तो [9]कामगवर साजो ? ॥ गातां० ॥ ४०४
अत्यद्भुत [10]रणभूमि श्रीतें दाखवुनि श्रीरामें ।
नामें स्वपरभटांचीं कथिलीं, वर्णुनि कर्मे [11]धामें. ॥ गातां० ॥ ४०५
श्रीस प्रभुनें सेतु दाविला, जो रुंद दहा गावें, ।
शंभर गांवें लांब, जगें ज्या पावोनि [12]महा गावें. ॥ गातां० ॥ ४०६
कथिलें, 'नळ या झाला लाभा विजयघनाच्या रचिता, ।
या यमदंडावांचुनि वरिता तो न अनाचार चिता.' ॥ गातां० ॥ ४०७
देवी म्हणे, 'पसरला वाटे क्षुधित [13]महाभुजग मला, ।
खळसंहर्ता [14]मन्मातेचा उग्र महाभुज गमला.' ॥ गातां० ॥ ४०८
प्रभुच्या विजयश्रीलाभाचा हेतु सेतु देवीतें ।
[15]बहुमत झाला, तद्दर्शन जें अमृत तसें सेवी तें. ॥ गातां० ॥ ४०९
राम म्हणे, 'सुंदरि! इकडे हें [16]सिंधूत्तरतीर पहा, ।
या स्थानीं मज भाग्यें भेटे मूर्त [17]विजय [18]वीररूप हा. ॥ गातां० ॥ ४१०

---

१. सैन्यासहित. २. माझें. ३. सीता. ४. बिभीषण देता झाला. ५. स्वर्गी. ६. लोकपाळांनीं स्तविले चरण ज्याचे अशा (रामाला). ७. स्वेच्छ गमनानें. ८. गगनमणि=सूर्य. ९. यथेच्छ गमन करणाऱ्यांत श्रेष्ठ. १०. सीतेसहित विमानांत बसून परत अयोध्येस येतांना रामानें सीतेला युद्धभूमि व पूर्वपरिचित स्थळें दाखविलीं असें वर्णन आहे. [सर्ग १२३.] ११. तेजें. (सर्ग १२३ पहा.) १२. उत्सव. १३. मोठा साप. हा उत्प्रेक्षालंकार आहे. १४. माझ्या जननीचा. (पृथ्वीचा.) १५. अत्यंत मान्य. १६. समुद्राचें उत्तर तीर. १७. मंत्ररामायण—युद्धकांड—गीति ७७६ पहा. १८. वीरनायक. (बिभीषण.)

झालों स्थिर जो होतों जैसा चंचल पारा वारा,[1] ।
भेटवि मज याच्याचि युक्तिचा अंचळ[2] पारावारा.[3]' ॥ गातां० ॥ ४११
मग ऋष्यमूक दावुनि सांगे, 'सजले मदसु[4] गळाया, ।
तों मारुति मज भेटवि येथें सुयशःपद[5] सुगळा या. ॥ गातां० ॥ ४१२
रडविति मज दाखविले सुगळें[6] दयिते! जे तव नग[7] ते. ।
वदलों मजविण वांचसिल कसी जानकि! खळभवनगते[8]! ॥ गातां० ॥ ४१३
तुज चिंतित या प्रस्रवणनगीं होतों मी घनकाळीं, ।
दिग्वदनें भिवविति, बहु भाजे तव विरहीं मन, कोळीं.[9] ॥ गातां० ॥ ४१४
ती किष्किंधा[10] सुदति! पहावी, तीतें पहिला वाळी, ।
आतां माझा हा सुगळ सखा धर्में न्यायें पाळी'. ॥ गातां० ॥ ४१५
स्वविमानीं आणविली[11] प्रेमें प्रभुदयितेनें[12] तारा,[13] ।
दारा[14] कपियूथपतींच्याही[15] सुगुणा रम्याकारा.[16] ॥ गातां० ॥ ४१६
[17]पंपा सरसी दावी प्रभु, जें आपण विरहव्यथितें ।
तत्तीरीं अनुभविलें होतें श्रीस सविस्तर कथि[18] तें. ॥ गातां० ॥ ४१७
आश्रम[19] दावी, सांगे केला शबरीनें[20] स्वादर[21] तो, ।

---

१. मीं पाऱ्याप्रमाणें अथवा वाऱ्याप्रमाणें जो चंचल होतों तो (या बिभीषणाच्या भेटीमुळें) स्थिर (शांत) झालों. २. पदर. ३. सागरा. ४. माझे प्राण. ५. उत्तम यशाचें पद (स्थान—आधार) अशा. ६. साकी ११४ व १४६ पहा. ७. दागिने. ८. दुष्ट रावणाच्या भवनीं (गृहीं) गेलेल्ये! ९. याचें विशेष्य 'दिग्वदनें.' १०. सुग्रीवाची मुख्य नगरी. येथेंच रामानें वालीला मारिलें. या स्थानीं विद्यमानकाळीं अनागोंदी शहर आहे. (सर्ग १२३ श्लोक २३.) ११. सर्ग १२३ श्लोक २४-३७ पहा. १२. सीतेनें. १३. सुषेणाची कन्या, वालीची पत्नी. वालीच्या मरणानंतर ही सुग्रीवाची स्त्री झाली. सुग्रीवाच्या पहिल्या स्त्रीचें नांव रुमा. १४. स्त्रिया. १५. मोठमोठ्या वानरपुंगवांच्या स्त्रिया. १६. रमणीयरूपा. १७. पंपा हें सरोवर हंपीजवळ आहे. या सरोवराच्या जवळ पंपा नामक गांवीं प्रख्यात माधवाचार्य (ज्यांस सायण माधव किंवा विद्यारण्यस्वामी असें म्हणतात ते) राहत असत. हें बुक्कराजाचे विजयनगराच्या समीप आहे. १८. या प्रसंगाचें सविस्तर आणि हृदयद्रावक वर्णन मंत्ररामायणांत आहे. [युद्धकांड—गीति ७८४-७९२ पहा.] १९. मातंग मुनीचा आश्रम. हा उत्तर तैलंगणांत असावा असें दिसतें. २०. या बाईचें नांव श्रमणा. ही शबर (भिल्ल) जातीची होती म्हणून शबरी हें जातिवाचक नाम (सामान्यनाम) हल्लीं विशेषनाम झालें आहे. अलीकडे नामदेव (शिंपी) चोखामेळा (महार) इत्यादि विशेषनामें जातिवाचक म्हणजे सामान्यनामें झालीं आहेत. त्याचे उलट शबरीचें उदाहरण आहे, त्याचा उपयोग विशेषनामाप्रमाणें केला आहे. २१. सु+आदर=उत्तम आदरातिथ्य.

कीं निजभजनीं घेउनि [1]विश्वप्रेमसुधास्वाद रतो. ॥ गातां० ॥ ४१८
प्रभु उग्र**क**[4]बंधकथाकथनें **श्री**[2]तें आधीं भिववी, ।
मग [3]तन्मनोक्ष तदुक्त**सु**कंठप्राप्तिवर्णनें निववी. ॥ गातां० ॥ ४१९
पाहुनि नमुनि म्हणे प्रभु, 'देसी सद्गति **गो**[5]दावरि! ती ।
[6]जीतें श्रवण करुनि संसारी परमा मोदा वरिती.' ॥ गातां० ॥ ४२०
**सी**ता नमुनि म्हणे, 'भक्त तुझा मोदा वरि, [7]परमेला ।
तुज भजल्यें, त्या पुण्यें माते! **गो**दावरि! [8]पर मेला.' ॥ गातां० ॥ ४२१
**गो**देतें प्रेमें **दा**शरथी ते [9]तोकांपरि [10]पुसती, ।
म्हणती, '[11]त्वदभक्ता संसारीं देतो कांप रिपु [12]संती!' ॥ गातां० ॥ ४२२
**सी**ता [13]**पं**चवटीदलशाला मुरडुनि [14]बहुदा पाहे, ।
**शू**न्य निरखितां [15]वट, अश्रु तिच्या नयनांतुनि बहु वाहे. ॥ गातां० ॥ ४२३
**सु**गळ म्हणे, 'सति! केला तृप्त स्वपितृसम [16]निर्वापानें, ।
हें यश म्हणतें सुश्रोत्यांतें सकळ '[17]मम निवा पानें.' ॥ गातां० ॥ ४२४
श्री**रा**म म्हणे, 'या [18]ताताचा त्या ताताचा सम जो, ।
तो शतदा स्मरतो स्नेह मला तुज सत्य सख्या! समजो.' ॥ गातां० ॥ ४२५
[19]जाणे त्या **गृ**[20]ध्रेंद्रीं प्रभुचा प्रेमा [21]बाढ, विमान ।

---

१. जगताच्या प्रेमामृताची रुचि. २. लक्ष्मीतें.(सीततें.) ३. त्या सीतेचें मन आणि नेत्र. ४. कबंधोक्त. [साकी १३१ पहा.] ५. ही गोदावरी प्रसिद्ध नाशिकाजवळची नव्हे. राजमहेंद्रीच्या पश्चिमेस ७५।१०० कोसांचे सुमारास जी गोदावरी आहे ती येथें घेतली पाहिजे. हल्लींचें सिंहलद्वीप हें जर लंका बेट असेल तर येथें प्रसिद्ध नाशिकाजवळच्या गोदावरीचें ग्रहण करणें सयुक्तिक होणार नाहीं. याचप्रमाणें गोदावरीच्या मुखाजवळ जें जनस्थान आहे तेंच रामाचें वसतिस्थान समजलें पाहिजे. हल्लींच्या प्रसिद्ध नाशिकाला जनस्थान म्हणतात ही भ्रांति आहे. हल्लींच्या नाशिकाजवळ पंचवटी म्हणून जें स्थान आहे तें रामाचें पंचवटी स्थान नसून गोदावरीच्या मुखाशीं जें पंचवटी स्थान आहे तें रामाचें निवासस्थान असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे. ६. ज्या सद्गतीतें. ७. श्रेष्ठेला. ८. शत्रु. (रावण.) ९. मुलांप्रमाणें. १०. निरोप घेती. ११. तुझे जे भक्त नाहींत त्यांला. १२. हे गोदावरि! १३. पंचवटी नामक पर्णशाला (दलशाला.) पर्णशाला या नांवांचा गांव गोदावरीच्या मुखाजवळ उत्तरतीरीं अद्याप उत्तर तैलंगणांत आहे, त्या गांवाला पंचवटी हें नांव असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे. १४. पुष्कळदां, वारंवार. १५. वडाचें झाड. हा वृक्ष जटायूचें वसतिस्थान असून पंपेच्या उत्तरदेशीं होता. १६. पितृतर्पणानें. १७. माझ्या (यशाच्या) पानें (सादर सेवनानें—श्रवणानें) निवा (तृप्त व्हा—शांत व्हा). १८. या जटायूचा. १९. उत्प्रेक्षालंकाराचें हें उदाहरण होय. २०. जटायूच्या ठायीं. २१. गाढ, दृढ, मोठा.

तें[1]न्यग्रोधा उजवें घाली, जातां[2] वाढवि मान. ॥ गातां० ॥ ४२६

घटजादि[3]महर्षींचे जे ते आश्रम दावुनि नमवी, ।
शमवी विरहश्रम सुकथांहीं सीतेचें मन रमवी. ॥ गातां० ॥ ४२७

अ[4]त्र्याश्रम वंदुनि सीतेला प्रभु सांगे 'नमन करीं.' ।
हें यश गाती साधु पडाया गर्वाच्या न मन कै[5]रीं. ॥ गातां० ॥ ४२८

प्र[6]भु कथि, 'म्हणे श्रिता जो मोहा मित्र! कूट, न गजा ये ।
भक्षूं हरि, अहिस नकुळ, तो हा चि[7]त्रकूट नग, जाये! ॥ गातां० ॥ ४२९

या श्रीगं[9]गायमुना यांचा वि[8]श्वस्तुत संगम हा. ।
[10]भंग महापापांचा करि, दे य[11]न्मारुत [12]भंग महा. ॥ गातां० ॥ ४३०

ती श्रीमती अ[13]योध्या दिसती, सीते! न[14]मुनि पहावी, ।
म[15]त्पूर्वजदयिता सु[16]रगीता तीस सुदृष्टि वहावी.' ॥ गातां० ॥ ४३१

---

१. त्या जटायूच्या न्यग्रोधा (वटवृक्षाला.) २. विमान जातां (जात असतां) तन्न्यग्रोधा उजवें घाली (आणि त्याचा) मान वाढवी—असा अन्वय. तें विमान जात असतां त्या प्रसिद्ध अश्वत्थाला उजवें घालून गेलें यामुळें त्या वृक्षाची प्रतिष्ठा वाढविली. ३. सर्ग १२३ श्लोक ४६-४७ पहा. अगस्त्य ऋषीचा आश्रम हा हल्लीं ज्याला **बस्तर** संस्थान म्हणून म्हणतात त्यांतील दक्षिण भागांत होता, व इतर ऋषींचे आश्रम **बस्तर** संस्थान, **बि**लासपुर जिल्हा व **रे**वा संस्थान यांत होते असें दिसतें. ४. चित्रकूटाजवळ एक टेंकडी आहे तेथें अत्र्याश्रम होता. या टेंकडीला अद्यापि 'अनुसूया' पहाड म्हणतात, व तेथें एक लहानसें खेडें आहे त्यालाही अनुसूयाच म्हणतात. यात्रेकरी लोक या पहाडाचें दर्शन घेतल्याशिवाय रहात नाहींत. ५. हातीं. ६. प्रभु (राम) कथि:—हे जाये! (सीते!) तो हा चित्रकूट नग (पर्वत) [कीं जेथें] नकुळ अहिस (सापाला) [व] हरि (सिंह) गजा भक्षूं न ये (येत नाहीं) [व] जो (पर्वत) श्रिता (त्याचा आश्रय करणारास, आश्रितास) म्हणे:—[हे] मित्र! (हें आश्रिताचें संबोधन.) मोहा (संसारभ्रमाला, दुःखाला) कूट (चुराडा करून टाक.) या पर्वताच्या आश्रितांस दुःख होत नाहीं—असा भाव. ७. प्रयागास आगगाडीनें जातांना वाटेंत माणिकपुर नांवाचें रेलवेस्टेशन लागतें. तेथून माणिकपुर—झांशी रेलवेनें गेलें असतां चित्रकूट लागतो. चित्रकूट हें विंध्याचें शिखर आहे. येथें मंदाकिनी नांवाची नदी आहे. प्रयागापासून पायरस्त्यानें चित्रकूट तीस कोस आहे. येथें अलीकडे अमृतराव साहेब व त्यांचे चिरंजीव विनायकराव साहेब रहात असल्यामुळें चित्रकूट महाराष्ट्रांत पुष्कळ माहित झाला आहे, व त्यामुळेंच येथें महाराष्ट्रीयांची वस्ती झाली होती. ८. सकल जगानें स्तविलेला असा. ९. प्रयाग. [मंत्ररामायण—युद्धकांड—गीति ७९५-७९८ फारच उत्कृष्ट आहेत.] १०. नाश. ११. ज्याचा (ज्या संगमाचा) वारा. १२. तरंग: १३. प्रयागाहूनच रामानें सीतेला अयोध्या दाखविली. विमानारूढ असल्यामुळें दिसली असावी; नाहीं तर प्रयाग व अयोध्या यांत ५०।६० कोसांचें अंतर आहे. १४. सर्ग १२३ श्लोक ५२-५३ पहा. १५. माझ्या वडिलांची आवडती. १६. देवांनीं स्तविलेली.

सुगळ बिभीषण कपियूथप ते देखति नभीं उडूनी, ।
द्वि[1]जराजपुरी अवलोकावी सादर जेंवि उडूनीं. ॥ गातां० ॥ ४३२

राहे प्रभु प्रयागीं, प्रेमें नमुनि भ[3]रद्वाजातें, ।
सांगुनि वृ[4]त्त प्रमुदित करि त्या जेंवि पित्या आज्यातें. ॥ गातां० ॥ ४३३

तेथें भरत गुहहि निज भक्त श्रीरामें आठविला, ।
'आलों' ऐसें कळवायाला पवनतनुज पाठविला. ॥ गातां० ॥ ४३४

कपि शृंगवेरपाळ गुहातें भेटे, मग भरतातें, ।
तो सुख पावे जें प्राणांतीं [6]अमृतसरीं भरता तें. ॥ गातां० ॥ ४३५

प्रभु वनवासव्रत प्रयागीं सांग संपवी, ऋषितें ।
नमुनि, निघे गुहभरतलोचनें तृप्त कराया तृषितें. ॥ गातां० ॥ ४३६

गुह चातकसा, पुष्पक घनसा, भेटि प्रभुची वृष्टि, ।
[7]सृष्टि सुखानें दाटे, वाटे वत्सचि तो प्रभु [8]गृष्टि. ॥ गातां० ॥ ४३७

भारी प्रभुपददर्शननमनप्रेमाचा भ[10]र, भरतें ।
गणिलें मंदगति विमान मनीं, जरि धांवे भ[11]रभर तें. ॥ गातां० ॥ ४३८

प्रेमळ गु[12]रु ज[13]ननीजन सचिव द्विज पौर सखे दास ।
भ[14]रत अधिक विरहीं बहु पावे शिशु औरस खेदास. ॥ गातां० ॥ ४३९

[15]कविस गमे, करि लोकवृंद तें चातककुळ आ सारें, ।
प्रभुघन तृप्त करी निववी जें दर्शन त्या [16]आसारें. ॥ गातां० ॥ ४४०

---

१. चंद्रनगरी. २. नक्षत्रांनीं. ३. वनवासाचीं चवदा वर्षें पूर्ण झाल्यावर आश्विन वद्य पंचमीस राम भरद्वाजाश्रमांत परत आला. हा भरद्वाजाश्रम गंगातीरीं आहे. भरद्वाजाश्रम, शृंगवेरपुर व नंदिग्राम हीं तीनही स्थळें प्रयागाच्या जवळ आहेत असें समजतें. [सर्ग १२४ श्लोक १ पहा.] ४. सर्ग १२८ श्लोक ३-१७ पहा. ५. मारुतीनें गुहाला आणि भरताला रामप्रत्यागमादिवृत्त सांगितलें, तेणेंकरून त्यांस आनंद झाला. [सर्ग १२५ श्लोक २३-३९ पहा.] ६.. अमृताच्या सरोवरानें. ७. जगती. ८. तो गुह वत्स वाटे व प्रभु (राम) गृष्टि वाटे. ९. एक वेळ व्यालेली गाय. १०. अतिशय. ११. असेंच वर्णन मंत्ररामायणांत आहे. [युद्धकांड—गीति ८२२ पहा.] १२. वसिष्ठ. १३. कौसल्याप्रमुख दशरथाच्या स्त्रिया. १४. पूर्वोक्त सर्व लोक तर रामविरहानें दुःख पावले होतेच, पण भरत हा अधिक खेदास पावे. जसा औरस शिशु विरहीं अधिक खेदास पावे= अगदीं लहान औरस (थानपी=तान्हें) मूल (अर्धें मुर्धें बोलायास येऊं लागलेलें) मातृविरहानें जसें अधिक खेदास पावतें तद्वत् भरताची अवस्था झाली. येथें औरस व शिशु या शब्दांचे रूढ अर्थ न घेतां यौगिक अर्थ घ्यावे, हें बरें दिसतें. १५. सुज्ञाला वाटे. हा रूपकगर्भोत्प्रेक्षालंकार होय. १६. धारासंपातें.

पुष्पक महिवरि उतरे, भेटे प्रभु सानुज भरतातें, ।
प्रथम पादुकांसह उतरुनि घे जो दिधला [1]भर तातें. ॥ गातां० ॥ ४४१

[2]नमुनि वसिष्ठप्रमुख गुरुजन प्रभुनें बहु हर्षविला, ।
आलिंगुनि आत्मशिरीं प्राज्य प्रेमजळें वर्षविला. ॥ गातां० ॥ ४४२

वंदुनि माता तात सचिवही पौर वृद्ध गौरवि तो, ।
भेटुनि पाहुनि सर्वजन, असें प्रभुयश [3]शशिगौर [4]वितो. ॥ गातां० ॥ ४४३

सुगळ बिभीषण हे भेटविले [5]शत्रुघ्ना भरतातें, ।
ते त्या बहु मानिति, ज्या न रुचे दिधला भूभर तातें. ॥ गातां० ॥ ४४४

---

१. राज्यभार. २. वसिष्ठप्रमुख गुरुजन, प्रभुनें नमुनि, बहु हर्षविला [व] आत्मशिरीं आलिंगुनि (प्रयोजक अर्थी समजावें.) [तो गुरुजन प्रभुनें] आत्मशिरीं प्राज्य प्रेमजळें वर्षविला, असा अन्वय. आत्मशिरीं या शब्दाचा देहलीदीपन्यायानें प्रयोग या ठिकाणीं करावा. रामानें वडिलांकरवीं शिरोवघ्राण करवून त्यांना आपल्या मस्तकावर प्रेमाश्रु पाडायाला लावलें—असा भावार्थ. ३. चंद्रासारखें शुभ्र. [यशाचा वर्ण गौर (शुभ्र) असा कविसंकेत आहे. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं अनेक संकेत मानिले आहेत त्यांस **कविसमय** अथवा **कविसंप्रदाय** असे म्हणतात. ते येथें देतों:—आकाश आणि पाप यांचें मालिन्य, कीर्ति व हास्य यांचें शुभ्रत्व, क्रोध व प्रीति यांचा रक्तिमा (तांबडेपणा), नदींत आणि सागरांत यथाक्रम पंकज आणि इंदीवर यांची उत्पत्ति, मरालादिक पक्ष्यांचा जलाशयांत संचार, चकोरांचें चंद्रकिरणपान, जलदागमकाळीं हंसांचें मानससरोवराप्रत आगमन, स्त्रीलत्ताप्रहारें अशोकवृक्षाचें फुलणें, तरुण स्त्रियांच्या मद्यगंडूषांनीं बकुलवृक्षाचें फुलणें, विरहसंतापानें तरुणांच्या हृदयावरील हारांचें व हृदयांचें फुटणें, कामाचें चाप आणि बाण कौसुम (पुष्पमय) आणि त्याच्या धनुष्याची दोरी भ्रमरमाला असणें, कामाच्या बाणांनीं आणि स्त्रीकटाक्षांनीं तरुणजनहृदयांचा भेद, दिवसा (सूर्याच्या योगानें) अंभोजांचा आणि रात्री (चंद्राच्या योगानें) कुमुदांचा विकास, शुक्लपक्षांत चंद्राचा प्रकाश, मेघगर्जनेनें मोरांचें नृत्य, अशोकाला फळें न येणें, वसंतांत जाईला फुलें न येणें, गंधसारवृक्षांच्या (चंदनवृक्षांच्या) फलपुष्पांचा अभाव; स्त्रियांच्या पादाघातानें अशोकाचा, कटाक्षप्रेरणानें तिलकवृक्षाचा (तिळव्याचा) आलिंगनानें कुरबकाचा (कोरांटीचा), करस्पर्शानें प्रियंगूचा (वाघांटीचा), मद्यगंडूषसेकानें बकुलाचा, नर्मभाषणानें मंदाराचा, मृदुहसितानें चंपकाचा, मुखमारुतानें (तोंडाचा फुंकर घालण्यानें) आम्रवृक्षाचा, सुस्वर गायनानें नमेरुवृक्षाचा (सुरंगीच्या झाडाचा), नृत्यानें कर्णिकाराचा (पांगाऱ्याच्या झाडाचा) पुष्पविकास होणें; हत्तीचें गंडस्थळ, सापाचें मस्तक, शंख, मत्स्य, वराह आणि वेणु यांत मोतीं असणें; चक्रवाकमिथुनांचा सूर्यास्ताबरोबर वियोग आणि सूर्योदयाबरोबर समागम, इत्यादि अनेक कविसमय प्राचीन ग्रंथांत आढळतात. यांचा प्राकृत कविवर्यांनीं ही आपापल्या काव्यांत प्रसंगानुरूप संनिवेश केला आहे.] ४. प्रसवतो. ५. सर्ग १२७ पद्य.

पुष्पवृष्टि देवांहीं केली, वाजविलीं बहु वाद्यें, ।
आद्यें विधिच्या जग हर्षविलें वेदांतप्रतिपाद्यें. ॥ गातां० ॥ ४४५
[३]नंदिग्रामीं उकलवुनि जटा अनुज सचिव न्हाणविले, ।
जाणविले प्राण बहिश्चरसे सुगळादिहि आणविले. ॥ गातां० ॥ ४४६
स्नानें करवुनि धरवुनि [४]भूषा [५]पूषान्वयवररत्नें, ।
मज्जन करुनि भूषणें वरिलीं, तातें दिधलीं [६]प्रत्नें. ॥ गातां० ॥ ४४७
कौसल्येनें जैसी सीता तसि [७]गौरविली तारा, ।
[८]थारा केल्या [९]यूथपदारा [१०]स्वंबरभूषणभारा. ॥ गातां० ॥ ४४८
प्रभुसि सहाय मिळविले होते देवांपरि समरा जे ।
ते तेजस्वी सुंदर दिसले, न प्रभुहरिसम राजे. ॥ गातां० ॥ ४४९
[११]करिवरि हरिसे गमले कपि जे बसणार नगांवरि ते, ।
सौम्य न होतां त्रासें होते तरि काय न गांव रिते ? ॥ गातां० ॥ ४५०
प्रभुचा [१२]प्रवेश साकेतीं जो तो [१३]प्राणाचा देहीं, ।
पौरगृहींच न केवळ सुख तें विधिच्याहि भरे गेहीं. ॥ गातां० ॥ ४५१
सुगळा बिभीषणाला देती [१४]रति बरवि [१५]प्रासाद, ।
सुखसिद्धि पुरीं स्वर्गीं जसि दे गति वरविप्रा साद. ॥ गातां० ॥ ४५२
भरताज्ञेनें कपिवर सुगळें पाठविले जे [१६]तूर्ण, ।
ते [१७]कनककलश घेउनि आले चतुरंबुधिजलपूर्ण. ॥ गातां० ॥ ४५३
पंचशतनदीसत्तीर्थजळें कनकघट भरुनि भरता, ।
कपिंनीं [१८]निवेदिले अभिषेका अंगीकारुनि [१९]नरता. ॥ गातां० ॥ ४५४

---

१. मंत्ररामायण–युद्धकांड–गीति ८२५-८२६ पहा. २. वेदांतांत (उपनिषदादि ग्रंथांत) जो प्रतिपादण्यास योग्य त्यानें. ३. प्रयागाच्या समीपवर्ती गांवीं. ४. अलंकार. ५. सूर्यवंशश्रेष्ठें. ६. नवीनें. ७. भूषणें देऊन गौरविली. ८. थारा=आश्रय. ९. वानरपुंगवांच्या स्त्रिया. १०. उत्तम वसनांच्या आणि अलंकारांच्या भाराला आश्रय केल्या. थोर थोर वानरांच्या स्त्रियांला वस्त्रालंकार देऊन कौसल्येनें गौरविलें. ११. जे कपि (वानर) नगांवर (पर्वतांवर) बसणार (रानटी, जंगली) ते करिवरि (हत्तीवर) हरिसे (सिंहासारखे) गमले (भासले); [जर ते कपि] सौम्य (शांतवृत्ति) न होतां (झाले नसते) तरि [त्यांचे] त्रासें गांव रिते न होते काय? झाले असते–हें उत्तर. १२. आश्विन वद्य षष्ठीस रामाचा प्रवेश अयोध्येंत झाला. (सर्ग १२६ श्लोक ५४.) १३. असाच उद्गार मंत्ररामायणांत आहे. [युद्धकांड–गीति ८३४ पहा.] १४. सुख. १५. राजवाडे. १६. त्वरित. १७. सुवर्णघट. १८. अर्पण केले. [या प्रसंगाचें वर्णन मंत्ररामायणांत सविस्तर आहे तें पहावें. युद्धकांड–गीति ८३६-८३८ पहा.] १९. मनुष्यता.

त्रिजगदभ्युदयकर सुमुहूर्तीं विश्वहितपर महर्षी ।
वसिष्ठादि करिति श्रीरामीं अभिषेक परम हर्षी. ॥ गातां० ॥ ४५५
साकेतीं दिव्यकुसुमवृष्टि त्रिदशवरांनीं केली. ।
दिव्यें वाद्यें नृत्यें गानें, बहु वाढे श्रीकेली. ॥ गातां० ॥ ४५६
सिंहासनीं निरखिला ज्यांहीं श्रीराम श्रीयुक्त, ।
मुक्त प्राणी ते झाले हें तत्वज्ञांचें उक्त. ॥ गातां० ॥ ४५७
शक्र अनर्घ्य किरीट सुमुक्ताहार पाठवी त्यातें, ।
स्वीकारी प्रभु, निज पद देता सहज आठवील्या तें. ॥ गातां० ॥ ४५८
तो देतां हार प्रभुनें, श्री त्यातें हस्तीं वाहे, ।
मारुतिकडे मायसी प्रेमें स्वामीदेखत पाहे. ॥ गातां० ॥ ४५९
श्रीराम म्हणे, 'द्यावा वाटे ज्यासि तया दे हातें'. ।
तेणें मारुतिच्या शोभवि ती मूर्तदया देहातें. ॥ गातां० ॥ ४६०
हार न तो त्या दासासि मिळे मूर्त प्रसाद धवळ, ।
जवळ प्रेमें वाहूनि दिला कीं मातेनें कवळ. ॥ गातां० ॥ ४६१
सुगळ बिभीषण यांसि मिळाली पूजा जी वितता ते. ।
तेंवि प्रेम अपत्यार्थ जसें धरिजे जीवित तातें. ॥ गातां० ॥ ४६२
तात तसा जनक श्रीरामें केला प्रमुदित, रमला, ।
न समाधिसुखांत, म्हणे, 'सगुण श्रेष्ठ; नको इतर मला.' ॥ गातां० ॥ ४६३

---

१. त्रैलोक्याची वृद्धि करणाऱ्या उत्तम मुहूर्तीं. २. सकल जगताच्या कल्याणाविषयीं तत्पर. ३. वसिष्ठ, वामदेव, गौतम, जाबालि, विजय इत्यादि ऋषी. ४. सर्ग १२८ श्लोक ५०-७० पहा. ५. देवश्रेष्ठांनीं. ६. लक्ष्मीची क्रीडा. ७. भक्तिरहस्य जाणणारांचें. ८. वचन, म्हणणें, भाषण. ९. अमोल. १०. उत्तम मोत्यांचा हार. (सर्ग १२८ श्लोक ७१.) ११. दिला तेव्हां. १२. त्या हारातें. १३. त्या हारानें. (सर्ग १२८ श्लोक ७९.) १४. मूर्तिमती दया. १५. ह्या अपन्हुति अलंकार जाणावा. १६. शुभ्र. १७. घांस. १८. विस्तार पावलेली. १९. आनंदित. २०. श्रीरामें जनक तात तसा (बापाप्रमाणें) प्रमुदित केला. [तो जनक] समाधिसुखांत [तसा म्हणजे रामप्रमा-नसमयीं जसा रमला तसा] न रमे. [तो जनक] म्हणे—'सगुण श्रेष्ठ [आहे] [व] इतर (निर्गुण ब्रह्म) मला नको.' जनक राजा प्रख्यात महायोगी आणि ब्रह्मवादी होता, पण या रामदर्शनानें त्याच्या मनाची अशी स्थिति झाली कीं समाधि (योगाची अखेर सीमा) मध्यें सुख वाटेनासें झालें व निर्गुण ब्रह्म नकोसें होऊन सगुण रूपच श्रेष्ठ असें वाटून आवडलें.

आधिव्याधिजरादारिद्र्यव्यसनपंचताक्लेश ।
लेश प्रभुच्या राज्यांत नसे, संपन्न सुखी देश. ॥ गातां० ॥ ४६४
व्याळ व्याघ्र चोर दुर्भिक्ष प्रभुच्या राज्यांत नसे, ।
जन सेविति शिशुसेचि प्रेमें प्रभुचे सुगुण स्तनसे. ॥ गातां० ॥ ४६५

## उत्तरकांड.

(साकीवृत्त.)

घटज कथि, 'पुलस्त्यसुत विश्रवा, तत्सुत दशमुखनामा, ।
तदनुज घटकर्ण बिभीषण हे कैकस्यात्मज, रामा! ॥ गातां० ॥ ४६६
दुश्चर तप दशवदन करी, तो करुनि नवशिरच्छेद, ।
'दे दर्शनवर' विधिस म्हणे; 'हा न धरीं कांहीं खेद.' ॥ गातां० ॥ ४६७
ब्रह्मा भेटे अयुताब्दांतीं दशमशिराच्या होमीं, ।
म्हणे, 'इष्ट वर माग, पुरवितों काम, महाबाहो! मी.' ॥ गातां० ॥ ४६८
नर वानर तुच्छ असें मानी, देवाहितकाम धरी, ।
मागे सर्वावध्यत्ववर, द्रुहिणहि तें मान्य करी. ॥ गातां० ॥ ४६९
देवांनीं घटकर्ण भुलविला, यास्तव निद्रा मागे, ।
साधु बिभीषण धर्मवर वरी, विधिच्या पायां लागे. ॥ गातां० ॥ ४७०

---

१. मनोव्यथा. २. देहव्यथा. ३. अगस्ति मुनि. ४. त्याचा धाकटा बंधु. ५. कैकसीचे पुत्र. ६. दशवदन दुश्चर तप करी, नवशिरच्छेद करुनि तो (दशवदन) विधिस म्हणे:—'दर्शनवर दे.' हा (विधि, ब्रह्मदेव) [म्हणे]:—'न कांहीं खेद धरीं'—असा अन्वय. 'मनांत कांहीं खंती बाळगूं नको' असें रावणास ब्रह्मदेव म्हणे. ७. नऊ मस्तकांचा छेद. ८. दहा हजार वर्षांच्या शेवटीं. ९. दहाव्या मस्तकाच्या. १०. इच्छा. ११. देवांच्या अकल्याणाची इच्छा. १२. सर्वांपासून अवध्यत्व असावें असा वर. १३. ब्रह्मदेव. १४. कुंभकर्णानें गोकर्णक्षेत्रीं उग्र तप केलें म्हणून पितामह त्यास वर देण्यास सिद्ध झाला. तेव्हां यास 'वर माग' असें म्हणावयाचें तें याला आधीं मोहित करून नंतर म्हणावें, अशी देवांनीं प्रार्थना केली, मग पितामहानें देवांच्या विनंतीप्रमाणें याच्या जिव्हाग्रीं सरस्वतीची स्थापना करून यास वर मागण्याची आज्ञा केली. तेव्हां यानें 'निद्रा दे' असा वर मागितला. नंतर सरस्वती निघून गेल्यावर हा शुद्धीवर आला, आणि माझ्या मुखांतून असें वचन कसें निघालें, असें म्हणून खिन्न झाला. हा कांहीं भलतेंच मागावयास चुकावयाचा नाहीं, अशा भीतीनें देवांनीं हें कपट केलें. (रामायण-उत्तरकांड-सर्ग १० श्लोक ३५-४९.)

अग्रज[1] वैश्रवण[2] तयाची घे वरमत्त[3] बळें[4] लंका, ।
पीडी जग, मोडी मर्यादा, तिळही न धरी शंका. ॥ गातां० ॥ ४७१
हित कथितां बहु खवळे, जैसा दंडस्पर्शें साप, ।
भंगुनि धनदा[5], तत्पुष्पक घे, तो दे दुष्टा शाप[6]. ॥ गातां० ॥ ४७२
मर्कटमुख अवलोकुनि, आज्ञा मोडी, हांसे पापी, ।
'वानर बुडवितिल तुला,' ऐसें नंदिकेशही[7] शापी[8]. ॥ गातां० ॥ ४७३
स्तंभित पुष्पक होतां, उपटूं लागे श्रीकैलास[9], ।
प्रभु तद्भुज[10] चिरडी स्वांगुष्टें दडपुनि त्या शैलास[11]. ॥ गातां० ॥ ४७४
दशशत वर्षें गाजवि रडतां दशकंठ समस्त वनें, ।
भक्तकरीं प्रभु जो सर्वत्र प्राज्यदय[12] सम स्तवनें. ॥ गातां० ॥ ४७५
धर्षण[13] करितां वेदवतीही[14] मत्ता दे शापाला[15], ।
होय दवानळ वाल्या करि तो सर्वा देशा पाला. ॥ गातां० ॥ ४७६
अनयें भंगी अनरण्या, ज्या दिव्यहि विषय न मोही, ।
'मत्कुलज[16] राम वधिल तुज' असें शापी मत्ता तोही[17]. ॥ गातां० ॥ ४७७
किति[18] राजे भंगातें वरिती, किति सामातें करिती, ।
कार्तवीर्य अर्जुन[19] वाळी हे दोघे तन्मद[20] हरिती. ॥ गातां० ॥ ४७८
यमलोकीं रावण युद्ध[21] करी, काळ धरी दंडातें, ।
'मद्वर अनृत नसो' या वचनें विधि वारी चंडातें[22]. ॥ गातां० ॥ ४७९

---

१. वडील बंधु. २. कुबेर. ३. वरानें माजलेला. ४. जबरीनें. ५. कुबेरा. ६. सर्ग १५ श्लोक ३५-३९ पहा. ७. नंदी. ८. सर्ग १६ श्लोक १६-२० पहा. ९. हा कामधेनूचा पुत्र आणि शिवाच्या गणांतील एक. याची आकृति मनुष्यासारखी आणि मुख वानरासारखें होतें. १०. त्याच्या बाहूला. ११. पर्वतास. १२. विपुलदयान्वित. १३. बलात्कार. १४. कुशध्वजनामक मुनीची कन्या. (सर्ग १७ श्लोक ७-८.) १५. मी तुला जन्मांतरीं वधीन—असा हिचा शाप रावणाला होता. वेदवती हीच जनकनंदिनी होय. [युद्धकांड—सर्ग ६० श्लोक १०; उत्तरकांड—सर्ग १७ श्लोक ३०.] १६. सर्ग १९ श्लोक ३० पहा. १७. तो अनरण्य राजा. १८. अनेक राजे—मरुत्त, दुष्कंत, सुरथ, गाधि, गय इत्यादि राजे. (सर्ग १९ श्लोक ५.) १९. सहस्रार्जुन. २०. त्या रावणाचा गर्व. कार्तवीर्यानें रावणाला बांधून कारागृहांत टाकिलें व पुलस्त्य ऋषीच्या आज्ञेवरून मुक्त केलें असें वर्णन आहे. (सर्ग ३२-३३ पहा.) तसेंच वालीनें रावणास खाकेंत धरून चतुःसागरांतीं संध्यादि कर्में करून किष्किंधेला येऊन तत्रस्थ उपवनांत सोडून दिलें असें वर्णन आहे. (सर्ग ३४.) २१. हें युद्ध सप्तरात्र झालें. २२. भयंकर यमातें. विधीच्या आज्ञेवरून यमानें आपला उचललेला दंड खालीं ठेविला, यामुळें रावणाचा जय झाला. (सर्ग २२.)

जे प्रबळ [1]असुरवर सामर्थ्यें त्यांसीं करितां युद्ध, ।
**वि**धि 'सख्य करा' ऐसें सांगे करि शांत अतिक्रुद्ध. ॥ गातां० ॥ ४८०
[2]**व**रुणसुतांतें **रा**वण भंगी समरीं कृतयत्नांतें, ।
दिग्विजय **क**रुनि **लं**का पावे, हरुनि [3]**स्त्री**रत्नांतें. ॥ गातां० ॥ ४८१
धर्में स्नुषा परंतु न चित्तीं कांहीं आणी पाप, ।
**रं**भेसि बळात्कारें भोगी, [4]**न**ळकूबर दे शाप. ॥ गातां० ॥ ४८२
स्वर्गी **द**शवदन त्रिदशांसीं युद्ध करी बहु भारी, ।
त्या समरीं **घ**ननादें धरिला **वृत्रन**मुचि[5]**जं**भारी. ॥ गातां० ॥ ४८३
सोडविला **विधि**नें [6]तो; **रामा**! बा! हें मागें झालें; ।
**घ**टज म्हणे, 'सद्यश तुज समरीं [8]त्यासहि मारुनि आलें.' ॥ गातां० ॥ ४८४
घोर [9]अनुज, **द**शवदन घोरतर, [10]**घ**नरव घोरतम रणीं, ।
जेणें भासविले अमर जसे निजले घोरत मरणीं. ॥ गातां० ॥ ४८५
सानुज तूं **वि**ष्णुचि न [11]गजाचें करिता **वि**ष्णुसम हित, ।
**वि**धिस **शि**वासहि झालासि, न बा! केवळ [12]**जि**ष्णुस, महित.'॥गातां० ४८६
[13]**पू**जुनि **सु**गळ **बि**भीषण [14]सबळ स्वस्थाना पाठविले, ।
[15]तत्समरश्रम उपकार बहु श्री**रा**में आठविले. ॥ गातां० ॥ ४८७
प्राकृतजननिंदाश्रवणें ती साध्वी [16]अंतर्वत्नी ।
**वा**ल्मीकीच्या आश्रमिं त्यजिली, यश रक्षाया पत्नी. ॥ गातां० ॥ ४८८

---

१. पातालस्थ निवातकवचादि दैत्यांबरोबर रावणाचें युद्ध एक वर्षाहून अधिक झालें, नंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें हें युद्ध रहित होऊन रावणाचें त्या दैत्यांशीं अग्निसाक्षिक सख्य झालें. [सर्ग २३ श्लोक ९-१६.] २. सर्ग २३ पहा. ३. नागगंधर्वकन्या, देवदानवकन्या आणि महर्षितनया अशा अनेक कन्या रावणानें जबरीनें आणिल्या असें वर्णन आहे. (सर्ग २४ श्लोक ४-६.) ४. हा कुबेराचा पुत्र म्हणून याची भार्या रंभा ही रावणाची सून. 'जेव्हां तूं अकाम स्त्रीवर बलात्कार करशील तेव्हां तुझ्या मस्तकाचीं सात शकलें होतील' असा नलकूबराचा रावणास शाप होता. (सर्ग २६ श्लोक ५५-५६.) ५. इंद्र. ६. तो=इंद्र (वृत्रनमुचिजंभारि). ७. बा रामा! हें (इतका वेळ सांगितलेलें) मागें (पूर्वी) झालें=इतकी ही मागें झालेली गोष्ट. ८. रावणालाहि. ९. कुंभकर्ण. १०. इंद्रजित. ११. गजेंद्राचें. [कदाचित् येथें 'जगाचें' असा पाठ असेल तर कोण जाणें]. १२. इंद्राला. १३. रामास अभिषेक झाल्यावर रामानें सुग्रीव, अंगद, बिभीषण इत्यादिकांस यथोचित दानमानादि सत्कारपूर्वक गौरवून परत जाण्याची आज्ञा दिली. [सर्ग ४०.] १४. ससैन्य. १५. त्यांनीं युद्धप्रसंगीं केलेले श्रम. १६. गर्भिणी.

प्रभुचे कुश लव पुत्र[1], हर्षवी सत्सुतजन्म[2] तिघांस[3]. ।
भरवी गुणामृताचे सर्वां जीवां सन्मति घांस. ॥ गातां० ॥ ४८९
यमुनातटवासिद्विजवृंदें[4] परम उपद्रव कथिला, ।
शत्रुघ्नें लवणासुर समरीं प्रभुच्या तेजें मथिला. ॥ गातां० ॥ ४९०
कोटित्रय गंधर्वेहि[5] भरतें न उठायासि निजविले, ।
ज्या मत्तांहीं गल्ल[6] जनांचे, रीति त्यजुनि, भिजविले. ॥ गातां० ॥ ४९१
प्रकृतिकथा[7] किति? धर्मन्यायें बहु निववि श्वानातें, ।
प्रभुचें तोका जेंवि पित्याचें दे शिव विश्वा नातें. ॥ गातां० ॥ ४९२
प्रभु हयमेध करी त्यांत रची जांबूनदकनकाची[8] ।
जनकाची कन्या, देखति जे न म्हणति ते जन कोंची[9]. ॥ गातां० ॥ ४९३
श्रीरामचरित त्या हयमेधीं गाती कुश लव दोघे, ।
प्रभुहि म्हणे, 'कर्णयुगा ! सर्व ज्ञाता[10] कुशल वदो घे.' ॥ गातां० ॥ ४९४

---

१. ज्या दिवशीं शत्रुघ्न वाल्मीकपर्णशाळेंत आला त्याच दिवशीं श्रावणमासांत अर्धरात्रीं सीता प्रसूत झाली. [सर्ग ६६ श्लोक १-१३.] २. चांगल्या पुत्रांचा जन्म. हा अर्थांतरन्यासालंकार होय. ३. माता, पिता आणि पितर (मृत) यांस सत्सुतजन्म हर्षवी. ४. यमुना नदीच्या तीरीं राहणाऱ्या भार्गवादि मुनिजनांनीं 'लवणासुरापासून आमचें रक्षण कर' अशी रामास विनंति केली, तेव्हां त्यानें 'लवणासुराचा नाश मीं करीन' असें सांगून त्यांस अभय दिलें. नंतर शत्रुघ्नाला लवणराज्याभिषेक करून लवणाला कसें मारावें हें सांगून आणि अमोघ शर देऊन त्याची सैन्यासह रवानगी केली. वाटेंत शत्रुघ्न वाल्मीकिच्या आश्रमांत एक वसति करून सकाळीं निघून गेला. तो वाटेनें सात मुक्काम करून यमुनातीरावर पोंचला. [सर्ग ६६ श्लोक १५.] नंतर भार्गवादि मुनिजनांच्या समागमांत कांहीं काळ घालवून शत्रुघ्नानें लवणाशीं युद्ध केलें. त्यांत लवणाचा पराभव झाला. [सर्ग ६९.] ५. गंधर्व=हे शैलूषगंधर्वराजाचे पुत्र. [सर्ग १०० श्लोक १२.] सिंधुनदाच्या दोन्ही बाजूंस यांचा गंधर्वदेश केकयदेशाच्या समीप होता. भरताचा मातुल युधाजित् यानें आपला गुरु गार्ग्य याजबरोबर 'गंधर्वदेश जिंकून त्यांत दोन उत्तम नगरें स्थापावीं' असा निरोप रामास पाठविला, तेव्हां त्यानें सुपुत्रसैन्य भरतास धाडून गंधर्वांचा पराभव केला. गंधर्व देशांत तक्षशिला नामक नगरींत भरतानें आपल्या तक्ष नामक पुत्राची स्थापना केली व गांधार देशांत पुष्कलावत नामक नगरांत आपल्या पुष्कल नामक पुत्राची स्थापना केली. [सर्ग १०१ श्लोक ११.] गंधर्व या शब्दानें कंदाहारी, बलूची, दुराणी लोक तर समजावयाचे नाहींत ना? ६. गाल. लोकांस ज्यांनीं त्रास देऊन रडावयास लाविलें—असा भाव. ७. प्रजाजनांची कथा किती? लोकांची गोष्ट तर सोडून द्या. ८. उत्कृष्ट सोन्याची. ९. कोंची, खरोखर मूर्तिमती जानकी आहे असें लोक म्हणति. १०. प्रभु (राम) म्हणे:— "ज्ञाता वदो [कीं], 'हे कर्णयुगा ! सर्व कुशल घे'."

वाल्मीकि[1]च्छात्र स्वसुत असें निजसारूप्यें[2] कळलें, ।
वळलें प्रभुचें मन अपवादें जें वरि होतें मळलें. ॥ गातां० ॥ ४९५
आदिकवि श्रीवाल्मीकि म्हणे, 'त्यजिली कां हे शुद्धा? ।
कैसें होतें? साध्वी होती जरि या त्यागें क्रुद्धा.' ॥ गातां० ॥ ४९६
राम म्हणे, 'स्वामी! हें जाणें त्यजिली अपवादानें, ।
करवा दिव्य, पुन्हा इष्टाच्या सुरतरु लपवा दानें.' ॥ गातां० ॥ ४९७
श्री[3] वदली, 'जें व्रत निवटविलें जरि माते! महि! म्यां तें ।
घे पोटीं, गाउत, जाणति जे गरिमा, ते महिम्यातें.' ॥ गातां० ॥ ४९८
ऐसें सांजलि[4] सीता वदली, तोंचि वसुमती[5] चिरली, ।
चिर लीला गाया विश्वें ती तीमाजि सती शिरली. ॥ गातां० ॥ ४९९
कोपे प्रभु धरणीवरि, तत्वस्मरण[6] करुनि दे धाता, ।
'ताता! तूं विष्णु, श्री सीता त्रैलोक्याची माता.' ॥ गातां० ॥ ५००
अभिषेचुनि आठां[7] पुत्रांतें दिधलीं राज्यें आठ, ।
पाठ पुरविते[8] सर्वांरींची ज्यां श्रुतिशास्त्रें[9] पाठ. ॥ गातां० ॥ ५०१
द्विजशिशु[10][11] उठवी, नुरवी कोठें वार्ता अन्यायाची, ।

---

१. शिष्य. २. आपल्या रूपासारख्या रूपानें. ३. श्री (सीता) वदली:—'हे माते! महि! (पृथ्वि! धरणी माते!) जें व्रत म्यां निवटविलें (पार पाडिलें) तें जरि (जर खरें पार पाडिलें असेल तर) पोटीं घे; जे गरिमा जाणति ते महिम्यातें गाउत'—असा अन्वय. पुन: दिव्य करण्याचें सीतेनें कबूल न करतां धरणीप्रवेश केला. मी जें व्रताचरण केलें आहे त्याची थोरवी (गरिमा) ज्यांस कळत असेल ते माझी स्तुति पाहिजे तर करतील—असा भावार्थ. ४. हात जोडून. ५. पृथ्वी. ६. खऱ्या गोष्टीचें स्मरण. याचा निर्देश उत्तरार्धांत आहे. ७. रामाचे पुत्र कुश व लव; लक्ष्मणाचे अंगद व चंद्रकेतु; भरताचे तक्ष व पुष्कल; शत्रुघ्नाचे सुबाहु व शत्रुघाती. कुशाची नगरी कुशावती, लवाची श्रावस्ती [सर्ग १०८ श्लोक ४-५], अंगदाची कारुष देशांत अंगदीया पुरी, चंद्रकेतूची मल्ल देशांत चंद्रकांता नगरी [सर्ग १०२ श्लोक ५-१२], तक्षाचि तक्षशिला व पुष्कलाची पुष्कलावत नगरी, [सर्ग १०१ श्लोक ११], सुबाहूची मथुरा व शत्रुघातीची वैदिश नगरी [सर्ग १०८ श्लोक १०-११]. ८. पाठ पुरविणें=पाठीस लागणें, पिच्छा पुरविणें. ९. चार वेद (श्रुति) आणि सहा शास्त्रें. १०. मुखोद्गत. ११. एकदां राम राज्य करीत असतां एका विप्राचा मुलगा मरण पावला. तेव्हां बापानें शोकविव्हळ होऊन त्या मुलाला राजद्वारीं ठेवून विलाप करण्यास आरंभ केला. रामानें त्याची समजूत घालून त्याचे डोळे पुसून त्यास स्वस्थ केलें. नंतर रामानें विप्रसुतमरणकारण नारदमुनीला विचारलें. तो म्हणाला, 'जातिधर्माचें उल्लंघन झाल्यामुळें विप्रसुत मेला. कोणी शूद्र तप करीत असावा असें वाटतें, त्याचें निवारण केलें पाहिजे'. नारदाच्या म्हणण्याप्रमाणें रामानें शोध केला. तों दक्षिणदिशेस एका कमलभूषित उत्तम सरोवरासमीप वृक्षाच्या खांदीस लोंबणारा जटाधारी तपोनिरत शंबूक नामक शूद्र दृष्टीस पडला. त्याचवेळीं रामानें त्याचा

धन्या याची रीति, न कोणी याचक अन्या याची. ॥ गातां० ॥ ५०२
सर्व प्रजा विमानकोटिंनीं संतानकलोकातें ।
शोकातें वारुनि, ने, सुखवी तात जसा तोकातें. ॥ गातां० ॥ ५०३
स्वजनत्राण कराया ठेवी भक्त सुचिरजीविवर, ।
कीर्तिहि, कळिस न दे, देउनियां सौख्य रुचिर, जी विवर. ॥गातां० ५०४

**उपसंहार.**

(गीतिवृत्त.)

रामात्मजें मयूरें श्रीरामपदासि हात जोडून, ।
**'रामायणपंचशती'** वाहिलि सप्रेम वंचक सोडून. ॥

---

## ३५. दोहारामायण. (प्रथम.)

(दोहावृत्त.)

विधि विज्ञप्तिस्तुति करी, दशमुख मारायास, ।
झाला दशरथसुत हरी त्रिभुवन तारायास. ॥ १

---

खड्गानें शिरच्छेद केला. तेव्हां सर्व देव प्रसन्न झाले. आणि 'वर माग' असें रामास म्हणूं लागले. रामानें मृतविप्रबालक मागून घेतला—अशी कथा आहे.

१. मार्था. २. मुक्तिदायक संतानक नामक लोकाला. ३. [राम] सुचिरजीविवर भक्त स्वजनत्राण कराया ठेवी=रामानें सात जे चिरजीवी (अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप व परशुराम) त्यांतील वर (श्रेष्ठ) जो मारुति त्याला स्वभक्तांच्या रक्षणासाठीं ठेविलें. [व लोकांस] रुचिर सौख्य देउनियां, जी कळिस विवर (छिद्र, वाव, रिघाव) न दे (अशी) कीर्तिहि [ठेवी]= रामानें ठेविली. ४. ग्रंथ अथवा त्यांतील एकादें प्रकरण समाप्त झालें असतां, त्याचा चरमभाग म्हणजे शेवटचीं कांहीं पद्यें भिन्न वृत्तानें रचण्याचा संस्कृत कवींचा संप्रदाय आहे; या प्राचीन काव्यरूढीस अनुसरून आमच्या कवीनें हें शेवटचें पद्य निराळ्या वृत्तांत लिहिलें आहे. या अंतिम पद्याचें वृत्त गीति आहे, तेव्हां 'पंचशतीरामायण' येथें संपलें असें झालें. हाच प्रकार 'आर्यारामायणा'च्या अखेरीस शेवटचा श्लोक स्रग्धरा वृत्तांत लिहून पंतांनीं केला आहे. ५. भीति. ६. या प्रकरणास **'दोहारामायण'** हें नांव 'दोहा' नामक वृत्तावरून दिलें आहे. ७. या वृत्ताच्या प्रत्येक अर्धांत २४ मात्रा असतात; प्रथम व तृतीय चरणांत तेरा आणि द्वितीय व चतुर्थ चरणांत अकरा मात्रा असल्या पाहिजेत असा नियम आहे. या वृत्ताचें लक्षण चिंतामणिकविकृत 'छंदोविचार' ग्रंथांतून पुढें देतों:—'तेरह कल पहिले चरन दूजे ग्यारह जानि । याही विधि उत्तर अरध यों दोहा पहिचानि ॥' याचा भावार्थ:—दोहावृत्ताच्या पहिल्या पादांत तेरा कला म्हणजे मात्रा असतात व दुसऱ्यांत अकरा असतात. हाच प्रकार उत्तरार्धांत असतो. पंतांनीं प्रथम तृतीय व द्वितीय चतुर्थ पादांतीं यमक साधले आहेत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

रामाख्य श्रीचा धणी[1], कौसल्येचा बाळ; ।
कैकेयीचा सन्मणी भरत साधुजनपाळ. ॥ २
सुगुण सुमित्रासुत कवी[2] लक्ष्मण रघुकुळहीर, ।
आश्रितजननीरजरवी[3] शत्रुघ्न दुजा वीर. ॥ ३
राम सलक्ष्मण गाधिजा[4] सुखवी, रक्षुन यज्ञ, ।
गुरु कथि राज्या आधि ज्या, तो प्रिय लक्षु नयज्ञ. ॥ ४
रामें उद्धरिली शिला गौतमभार्या तूर्ण[5], ।
आनंद त्रिजगा दिला, करुनि मनोरथ पूर्ण. ॥ ५
जनकपुरीं शिवसुधनुतें भंगी तो श्रीराम, ।
निजभुजतेजें बुधनुतें[6] पुरवी सीताकाम. ॥ ६
तापे[7] भृगुपति, परि हरी, योजुनि चापीं रोपं[8], ।
लीलालेशें परिहरी[9] त्यांचा[10] दारुण कोप. ॥ ७
जनकसुता प्रभुतें वरी, जीचें सीता नाम, ।
जी ऊर्मिला ती धरी वरीं लक्ष्मणीं काम. ॥ ८
जनकानुजकन्या[11] वरी, मांडविही भरतास; ।
भर्ता श्रुतकीर्तिहि करी, शत्रुघ्ना स्वरतास. ॥ ९
जिंकी राम प्रभु तया, देशिकें[12] ज्याचा[13] शर्व[14], ।
अत्युग्रींही करि दया, धन्य म्हणति कवि सर्व. ॥ १०
साकेतीं उत्सव महा, नाकींहि[15] नवा होय; ।
दे सर्वा प्रभुयश महा[16], जैसें गंगातोय. ॥ ११
भरता आपुलिया पुरा मातुळ[17] घेउनि जाय; ।
ज्वाळा कांता[18] कापुरा[19] लावी त्याची माय. ॥ १२
'राजा! मनुवत्सर[20] वनीं वसो मुनिव्रत राम, ।
युवराज भरत हो, मनीं माझ्या ऐसा काम.' ॥ १३
मागे ऐसे दोन वर कैकेयी विषरूप, ।

---

१. स्वामी. २. पंडित, बुध. ३. आश्रितलोकरूप नीरजाचा (कमळाचा) [आनंददायी] सूर्य. ४. विश्वामित्रा. ५. त्वरित. ६. देवस्तुतें (तेजें). ७. जामदग्न्य संताप पावे. ८. बाण. ९. दूर करी. १०. भार्गवरामाचा. ११. सीरध्वज जनकाचा कनिष्ठ भ्राता कुशध्वज त्याची कन्या. १२. गुरु. १३. ज्या रावणाचा. १४. महादेव. १५. स्वर्गीं. १६. आनंदा. १७. युधाजित. १८. पतीला. (दशरथाला.) १९. कापरासारखा निर्मल. रूपकालंकार. २०. चवदा वर्षें.

समजुनि तिचा लोभभर[1],भी सत्यव्रत[2] भूप. ॥ १४
**सी**तालक्ष्मणसह निघे सत्यरक्षणा[3] **राम**, ।
तापससा हर्षें रिघे[4] गहनीं जगदभिराम[5]. ॥ १५
जातां **राम** प्रभु वना, म्हणे **अ**योध्या 'हाय!' ।
जेव्हां त्या निजजनधना[6] आज्ञा देती माय. ॥ १६
सचिवें[7] सुरथीं वाहिला, भेटे सख्या **गु**हास; ।
वल्कलधरही पाहिला तेणें **राम** सुहास[8]. ॥ १७
फिरवुनि **सु**मंत्र, उतरला श्री**गं**गेतें **राम**, ।
निश्चळ चित्ता सुतरला[9] करिता जगदभिराम. ॥ १८
करी **भ**रद्वाजर्षितें वंदन जेंवि छात्र[10], ।
तोही हृदयें हर्षितें[11] प्रभुला आशीपात्र[12]. ॥ १९
करी **चि**त्रकूटीं[13] नगीं, जगन्निवास निवास[14], ।
पूजिति मुनि पाहुनि जगीं साक्षात् जेंवि **शि**वास. ॥ २०
**द**शरथ सुतशोकीं पडे, मरे, खरा करि शाप[15] ।
**भ**रत आणिला तो रडे, स्मरुनि भ्राता[16] बाप[17]. ॥ २१
ताताची करुनि क्रिया, जाय शरण **रा**मास, ।
अनादरुनि जननी प्रिया, त्यजुनि धरा[18] धामास[19]. ॥ २२
फिरवि पादुका देउनी, सत्यसंध[20] **र**घुवीर, ।
राहे त्यांतें सेवुनी, [21]**नं**दिग्रामीं धीर. ॥ २३
**रा**में सुतपःसदन[22] मुनि, **अ**त्रि सुखविला फार; ।
**सी**तेनेंही पद नमुनि विनयें त्यांचे[23] दार[24]. ॥ २४

---

१. लोभातिशय. २. सत्यसंध. (दशरथ.) ३. पित्याची सत्यप्रतिज्ञा राखण्यासाठीं. ४. शिरे, प्रवेश करी. ५ जगन्मनोहर. ६. आपल्या आश्रितांचें धन असा जो राम त्याला. ७. सुमंत्रें. ८. हास्यमुख. विरोध व स्वभावोक्ति या अलंकारांचा संकर या पद्यांत आहे. ९. अत्यंत चंचला (चित्ता). १०. शिष्य. ११. आनंदितें (हृदयें). १२. आशीर्वादाचें स्थान. १३. पंचशतीरामायण—साकी ४२९ टीपा पहा. १४. रहाणें. १५. करणजातीय श्रावणाख्य मुनीच्या बापाचा शाप. (रघुवंश—सर्ग ९ श्लोक ७९, रामायण—अयोध्याकांड—सर्ग ६४ श्लोक ५४-५५.) १६. बंधु.(राम.) १७. हा देशी शब्द आहे. १८. पृथ्वी. १९. गृहास. २०. सत्यप्रतिज्ञ. २१. रामायण—अयोध्याकांड—सर्ग ११५ पहा. २२. उत्तम तपाचें गृह असा. २३. अत्रीचे. २४. स्त्री अनुसूया ती.

'हाय !' म्हणों दे मुनिजना राम [1]निराधारा न, ।
सेव्य करी सुतपोधना, वधुनि [2]विराधा, रान. ॥ २५
हृदयें प्रेमळजनवशें [3]गति दे [4]शरभंगास ।
लाजवि रघुवर निजयशें, [5]दुग्धधिवरभंगास. ॥ २६
विभुला [6]वैष्णवशस्त्रगण दे [7]कुंभज [8]हरिदत्त, ।
संहाराया करुनि [9]पण, खळ [10]खेचर [11]वैरमत्त. ॥ २७
जो [12]खग बहुमत [13]शतमखा, ज्याचें जटायु नाम, ।
[14]भेटे तातप्रियसखा त्या ब्रह्म घनश्याम. ॥ २८
गोदातीरीं मग वसे [15]पंचवटींत [16]सदार, ।
जो योग्यासहि न गवसे, तो होय सुलभ फार. ॥ २९
दुर्मति दशकंठस्वसा, शूर्पणखा धरि काम, ।
जीस [17]अनयसर्वस्वसा, तीतें दंडी राम. ॥ ३०
[18]खरमुख [19]पातकशेवधी, जे कंपद [20]अमरांस ।
लीलेनें प्रभु ते वधी, खळ येतां समरास. ॥ ३१
ज्याच्या स्त्रीचा [21]जनक [22]मय, कपट जयाचें वित्त, ।
करुनि [23]खेचर मृग कनकमय, धाडी, भ्रमवी चित्त; ॥ ३२
पतिला मागे हरिण ती, लागे मागें राम; ।
लोभाची हे परिणती, पावे राक्षसधाम. ॥ ३३
[24]हरिण, वेधितां उर शरें, प्रभुसा मारी हाक, ।
प्राणव्यसन गमे खरें, शिरे [25]श्रीमनीं धाक. ॥ ३४
तो न धावतां, [26]भाविला, स्वाभिलाषरत दीर, ।
गांजुनि बाहिर लाविला, [27]सर्वसाधुमत धीर. ॥ ३५

---

१. निराश्रित. २. विराध नामक राक्षसाला. ३. मुक्ति. ४. अरण्यकांड—सर्ग ५-६ पहा. ५. दुग्ध समुद्राच्या श्रेष्ठ तरंगास. ६. अरण्यकांड—सर्ग १२ पहा. ७. अगस्त्य. ८. महेंद्रानें दिलेला (गण). ९. प्रतिज्ञा. १०. राक्षस. (रावण.) ११. वरामुळें माजलेला. १२. पक्षी. १३. इंद्राला. १४. अरण्यकांड—सर्ग १४ पहा. १५. पंचशतीरामायण—साकी ४२३, टीपा पहा. १६. स्त्रीसहित. १७. वाईट चालीची खाण. 'जीस' याचें विशेषण. १८. खरप्रमुख (राक्षस). १९. पातक+शेवधि=पाप+निधि=पापभांडारगृह. २०. देवांस. २१. बाप. २२. मयासुर; याची कन्या मंदोदरी ही रावणाची स्त्री. २३. राक्षस. (मारीच.) २४. उर शरें वेधितां हरिण प्रभुसा हाक मारी—असा अन्वय. २५. श्रीसीतेच्या मनांत. २६. मानिला. २७. सकल सज्जनांस मान्य असा.

जातां लक्ष्मण, ये [1]अरी, उटजीं यतिसा पाप, ।
भिववी सीतेतें हरी, व्हाया [2]कुललयताप. ॥ ३६
मोडी रथ [3]गृध्राधिपति, सोडी श्रीतें [4]रक्ष, ।
जोडी [5]अघ अतिपापमति, तोडी खड्गें पक्ष. ॥ ३७
मूर्छित पाडुनि खगवरा, श्रीला म्हणवी 'हाय!' ।
भिववि [6]धरा [7]सवनाकरा, तीतें घेउनि जाय. ॥ ३८
उत्तरीयवस्त्रांत ती बांधी [8]स्वालंकार, ।
गगनांतुनि सोडी सती, पाहुनि [9]वानरव्रार. ॥ ३९
श्रीस अशोकवनीं बळें तो ठेवी लंकेंत, ।
साध्वीतें हरिता छळें खळ न शिरे शंकेंत. ॥ ४०
साश्रु सुमित्रासुत पथीं भेटे, वंदी पाय, ।
त्यातें राम म्हणे, 'कथीं, वत्सा! झालें काय?' ॥ ४१
[10]कथितां, शोकीं प्रभु शिरे, धांवुनि उटजा जाय, ।
[11]तें शून्य विलोकुनि [12]विरे, वदे [13]स्त्रैणसा 'हाय!' ॥ ४२
न निवे अनुजें बोधितां, भासे विरही [14]कोक, ।
दे बहु [15]गहनीं शोधितां, [16]खजनकसख ही शोक. ॥ ४३
सांगे, 'नाहीं पावली रक्षण यापासून, ।
दशकंठें जसि [17]बाँवली नेली, बापा! सून.' ॥ ४४
होउनि खिन्न पराजयें, [18]अंकीं सोडी प्राण, ।
सुतसा क्रिया करि स्वयें तो [19]कृतकरिपत्राण. ॥ ४५

---

१. रावण. २. कुळक्षय. ३. जटायु. ४. राक्षस. (रावण.) ५. पाप. ६. पृथ्वी. ७. स+वन+आकर=सहित+अरण्य+समुदाय=अरण्यराजीसह पृथ्वीला भिववी. ८. आपले दागिने. ९. वानरांचा समुदाय. १०. कथिलें तेव्हां. ११. तें (उटज). १२. विरघळून जाई. १३. स्त्रीलंपटसा. १४. कोक—या नांवाचा एक पक्षी आहे. यासच 'चक्रवाक' असेंही म्हणतात. हे पक्षी नदी, तळीं इत्यादि जलाशयांच्या संनिध राहतात. त्यांत पुरुष (नर) आणि स्त्री (मादी) असून यांचा रात्रीं ऋषिशापामुळें नित्य वियोग होतो. त्यांचा परस्परांवर अनुराग फार असल्यामुळें त्यांना वियोगाचें दु:ख अत्यंत असह्य होतें. पण रात्र सरून सूर्योदय झाला म्हणजे त्यांची पुन: परस्पर भेट होते व तीं सारा दिवस एक ठिकाणीं जोड्यानें राहून घालवितात—अशी कविप्रसिद्धि आहे. 'त्यज चक्रवाकि शोकं विधान धैर्यं सहस्व समयममुम् । अयमेव वासरमणिर्हरिष्यते शापमूर्छां ते ॥' इत्यादि सुभाषितांवरून चक्रवाकपक्ष्याची स्थिति सुव्यक्त होते. १५. अरण्यांत. १६. दशरथमित्र. (जटायु.) १७. बाहुली. १८. रामाचे मांडीवर. १९. केलें गजेंद्राचें (करिपाचें) रक्षण (त्राण) ज्यानें असा राम (विष्णु) तो.

गहनीं [1]योजनभुज धरी, इच्छी घात कबंध, ।
तात्काळ प्रभुवर [2]हरी, [3]त्याचा पातकबंध. ॥ ४६
विसरे पळही न [4]शबरी, प्रभुला चिंती फार, ।
होय तिला गति वश बरी, सेवी यशही [5]सार. ॥ ४७
सेवुनि पंपातीर '[6]हा!' वदला विरही शूर, ।
देउनि कंपा ती 'रहा' म्हणे 'विरागा! दूर.' ॥ ४८
[7]घन पवनतनयचातका, होय सुगळशाळीस ।
वज्रपात कृतपातका शक्रसुता वाळीस. ॥ ४९
कपिपति होउनि आठवी, प्रभुनें केलें [8]कार्य; ।
श्री शोधाया पाठवी भेट [9][10]रविनंदन आर्य. ॥ ५०
पवनतनय शतयोजनें, लंघी [11]पारावार; ।
लंघूंचि नये जो जनें, [12]भवसा दुस्तर फार. ॥ ५१
लंकादेवीचा करी तो लीलेनें भंग; ।
कीर्ति [13]किंकरा दे बरी श्रीराम श्रीरंग. ॥ ५२
पुरी शोधितां भागला पटु पवनात्मज योध, ।
मग अशोकवनीं लागला, श्रीसीतेचा शोध. ॥ ५३
तों तो [14]कामी ये वदे, अश्राव्य असे बोल, ।
धैर्य सतीला [15]देव दे, होय न ज्याचें मोल. ॥ ५४
बहु धिक्कारी उद्धता देवी करि अपमान, ।
[16]म्हणे तिची ती शुद्धता, त्या 'तृण निज तप मान.' ॥ ५५
[17]खळ जातां, ठेवी [18]हरी चरणीं [19]मुद्रा [20]शीस, ।

---

१. योजनपर्यंत लांब भुज ज्याचे तो. २. हरण करी. ३. त्या कबंधाचा. ४. पंचशतीरामायण-साकी ४१८, टीपा पहा. ५. उत्कृष्ट. ६. हाय. ७. राम एकच, पण मारुतिचातकास व सुग्रीवशाळीस (साळ- धान्य.) पर्जन्य[वत्] झाला. तसाच वाळीस वज्रपात झाला. रूपक व अपन्हुति हे अलंकार या पद्यांत आहेत. ८. वाळिवधरूप कार्य. ९. वीर. १०. सुगळ. ११. सागर. १२. संसारासारखा. १३. सेवका. (मारुतीला.) १४. कामुक. (रावण.) १५. इंद्र. १६. तिची (सीतेची) शुद्धता (नैसर्गिक पवित्रता) त्या (रावणाला) म्हणे:-निज तप तृण (तृणासारखें) मान (समज). १७. दुष्ट. (रावण.) १८. वानर. (मारुती.) १९. रामनाममुद्रा. [मुद्रा=आंगठी; आंगठ्यांचा प्रचार फार प्राचीनकाळापासून या देशांत होतो असें दिसतें. मारुतीनें रामाची मुद्रिका सीतेला नेऊन दिली याचा उल्लेख येथें आहेच. दुष्यंत राजाची आंगठी माशानें गिळिली आणि द्रोणाचार्यांनीं आपल्या हातांतील आंगठी पाण्यांत टाकून स्वविद्याबळानें काढून घेतली या गोष्टी सुप्रसिद्ध आहेत. २०. शीर्ष, डोकें.

पतिच्या जेव्हां ती धरी स्मरणीं [1]मुद्राशीस. ॥ ५६
कथुनि निरोप, **श्री** तया दे [2]चूडामणि खूण, ।
म्हणे, ‘करुत मजवरि दया, [3]प्रभुभुजकार्मुकतूण.’ ॥ ५७
[4]वन भंगी, करि युद्ध तें, निववि बहु [5]हरिस्वांत, ।
जरि पुर जाळी, [6]उद्धतें गणिला न तरी [7]स्वांत. ॥ ५८
सागर बहु योजन कपी पुनरपि लंघी धीर, ।
विश्वाचा तो जनक [8]पी वृत्तसुधा **र**घुवीर. ॥ ५९
आलिंगी अत्यादरें **राम प**वनतनयास, ।
जैसा स्तव करिता भरें **मे**रु [9]अवनत न यास. ॥ ६०
घे [10]कटक मिळित [11]आयतें जें करि [12]अगे [13]नग चूर्ण, ।
जाय विचारें [14]आयतें, प्रभु जलधितटा तूर्ण. ॥ ६१
[15]गुरुतम निज तप [16]मानिलें, मत्तें प्रभुचें [17]ऊन, ।
[18]बंधुरत्न अपमानिलें, [19]कुमतमद्य सेवून. ॥ ६२
**लं**काराज्य **बि**भीषणा प्रभु दे, नमितां पाय, ।
[20]**क**नकाचळचि करी कणा, कृपा वदावी काय? ॥ ६३
शर [21]कोदंडें प्रभु धरी, सजे म्हणाया ‘[22]संप.’ ।
भेटे सिंधु स्तुति करी, नमी चरण [23]धृतकंप. ॥ ६४
सागरवचनें **न**ळ रची शतयोजन दृढ सेतु, ।
त्या पाहोनि म्हणे [24]**श**ची, ‘[25]हो देवविजयहेतु.’ ॥ ६५
कपटी **द**शमुख [26]पोहवी प्रभुचें मस्तक चाप, ।
**सी**ताधृतितें वाहवी, देउनि दुःसह ताप. ॥ ६६
**बि**भीषणस्त्री बहु बरी, **स**रमा जीचें नाम, ।
ती [27]**श्री**शोकभ्रम हरी, वर्णुनि विजयी **रा**म. ॥ ६७

---

१. आनंदाच्या राशीस. २. हा दागिना चूडामंडन अथवा चूडिका यांसारखा सुवर्णाचा असावा. ३. रामाचे बाहु, धनुष्य, भाता (तूण), हे. ४. अशोकवन. ५. इंद्राचें मन. ६. उद्दाम रावणानें. ७. आपला नाश. ८. आदरपूर्वक ऐके. ९. नम्र. १०. सैन्य. ११. यत्न केल्यावांचून. १२. वृक्ष. १३. पर्वत. १४. विस्तृतें. (‘विचारें’ या शब्दाचें विशेषण.) १५. अत्यंत मोठें (गुरु). [विशेषणास ‘तम’प्रत्यय लाविल्यानें ‘सर्वांत मोठा’ असा अर्थ होतो.] १६. याचा कर्ता ‘रावण’ अध्याहृत समजावा. १७. उणें. १८. बिभीषण. १९. दुष्ट विचाररूप मदिरा. २०. मेरुपर्वत. २१. धनुष्य. २२. मर, मरण पाव. २३. कंपित (सिंधु). २४. इंद्राणी. २५. होवो. २६. दाखवी. (सीतेला.) २७. सीतेचा शोकोत्पन्न चित्तभ्रम.

उतरुनि नळकपिकृतपथें स्वबळसहित[1] जळधीस, ।
अजितें[2] अतुळामळकथें[3], भय दिधलें खळधीस. ॥ ६८
सुगळें प्रथमचि तुडविला, गरुडें[4] जैसा साप, ।
मुकुट[5] शिरींचा उडविला, दिधला भंगुनि ताप. ॥ ६९
साम कराया धाडिला प्रभुनें अंगद दूत, ।
न वळे रावण ताडिला वचनें जैसा भूत. ॥ ७०
राम म्हणे, 'उतरील रण, हरि[6] हो! याचा रेंचँ[7], ।
सकुळ भस्म वरमत्त[8] पँण[9], अरि हो[10] याँ चारेंच[11].' ॥ ७१
होतां संगर[12], राहिले व्यसु[13] होउनि बहु शूर, ।
दुस्तर खळखळ[14] वाहिले, शतशः शोणितपूर[15]. ॥ ७२
तेज नुरे रक्षोगणीं[16], रणीं होय जरि भंग, ।
तार[17] खळांचा तो धणी, गणी हित कुमतिसंग. ॥ ७३
मायावी घनरव अरी जो कपटमदें अंध, ।
तो सानुजविभुला करी अहिपाशांनीं[18] बंध. ॥ ७४
पाहुनि ते समरांगणीं मानी झाला अंत, ।
दोष गणुनि लक्षणगणीं, सीता बोले 'हंत[19]!' ॥ ७५
उडवि गरुड पक्षजरवें[20] दारुण परमहि पाश, ।
प्रभुला दे सुख बळ नवें, नाशितपरमहिपाश[21]. ॥ ७६
घटकर्णा मारवि बळें, करवी स्वापत्याग[22], ।
पितृमतिसहि म्हणतें चळें, कुमतिस्वापत्याग[23]. ॥ ७७

---

१. आपल्या सैन्यासहवर्तमान. २. रामें. ३. निरुपम आणि विमल कथा ज्याची त्या (रामानें). ४. येथें सुगळाला गरुडाची आणि रावणाला सापाची उपमा दिली आहे. ५. मुकुट सुवर्णमय आणि रत्नजडित असून त्याजवर मयूरादि पक्ष्यांच्या पिसाचा तुरा लावीत असत असें वर्णन आहे. ६. वानर हो. ७. गर्व. ८. शंकरादिक देवांच्या वरानें माजलेला. ९. परंतु. पण या चारेंच वरमत्त अरि सकुळ भस्म हो—असा अन्वय. १०. होवो. ११. या चेष्टेनेंच. १२. युद्ध. १३. गतप्राण. १४. उदकप्रवाहाचा आवाज या शब्दानें सूचित होतो म्हणून हा शब्द अनुकरणवाचक आहे. १५. रक्ताचे पूर. १६. राक्षसांच्या समूहांत. १७. अतिउच्च. १८. नागपाशांनीं. १९. हाय हाय! २०. पंखांपासून उत्पन्न झालेल्या ध्वनीनें. २१. नाशिली आहे शत्रुराजांची (परमहिपांची) इच्छा (आशा) जेणें. (हें 'गरुडा'चें किंवा 'बळा'चें विशेषण.) २२. निद्रेचा त्याग. २३. कुमति+स्व+अपत्य+आग= दुर्बुद्धि जो आपला पुत्र त्याचा अपराध.

घननादानें ताडिलें, सप्रभु सर्वहि सैन्य, ।
मृतसें मूर्छित पाडिलें, देवांसि दिलें दैन्य. ॥ ७८
जांबवदुक्तें[1] पवनसुत रामपदांबुजभृंग[2], ।
आणी शक्राद्यमरनुत[3] दिव्यौषधिनगशृंग. ॥ ७९
सौषधिगंधें मारुतें[4] उठले विशल्य सर्व[5]. ।
पावी स्थानीं चारु[6] तें महावेग गतगर्व. ॥ ८०
मायासीताशिर हरी घननाद महामाय[7], ।
'हा! हा!' वदले चिर हरी[8], म्हणे रामही 'हाय!' ॥ ८१
कळवि बिभीषण कपट, मग मारवि अरिपुत्रास[9], ।
लक्ष्मण करि यश, निववि जग, उरवी न रिपुत्रास. ॥ ८२
दशमुख सुतशोकें[10] जळे[11], श्रीस वधाया जाय; ।
न वळावा, परि तो वळे सचिवोक्तें खळराय[12]. ॥ ८३
'नर वानर मारा' असें खळ सांगे कटकास, ।
भ्रमले वीर सुरारसें[13], घालिति बहु भट कास[14]. ॥ ८४
शलभपटल तें बळ गमे, दीप्त दवानल[15] राम, ।
बहुकोटि समग्रहि शमे, अर्ध भरे जों याम[16]. ॥ ८५
नाचुनि कांपविती रसा[17] बहु शत लक्ष कबंध[18], ।
[19]करिल डसुनि गरुडा कसा भोगें[20] तक्षक[21] बंध? ॥ ८६
आपण दारुण रण करी भेदी लक्ष्मणवक्ष, ।
शस्त्रास्त्रें वर्षुनि अरी कपि खपवी बहुलक्ष. ॥ ८७
अनुज शक्तिनें पाडिला पाहुनि कश्मलमग्न[22], ।
रामें दशमुख ताडिला केला हतबळ भग्न. ॥ ८८
आणी शृंग पुन्हा हरी[23], लक्ष्मण सावध होय, ।
दिव्यौषधिरस बळ भरी, सस्यांत[24] जसें तोय[25]. ॥ ८९

---

१. जांबवंताच्या आज्ञेनें. २. रामचरणकमलभ्रमर. ३. इंद्रप्रमुख देवस्तुत. ४. वायूनें. ५. सकल (सैन्य). ६. सुंदर. (पर्वतशृंग.) ७. मोठा कपटी. ८. वानर. ९. इंद्रजितास. १०. मेघनादमरणशोकानें. ११. संतापे. १२. खळांचा राजा. (रावण.) १३. मद्यरसानें. १४. कास घालिती=तयार होतात. १५. वणवा, अरण्यांतील प्रचंड अग्नि. १६. प्रहर. १७. पृथ्वी. १८. धडें. [मस्तकहीन व क्रियायुक्त शरीर=कबंध.] १९. हें अर्ध सुभाषितरूप आहे. २०. भोग=सर्पाची फणा. ['भोगः सुखे स्त्र्यादिभृतावहेश्च फणकाययोः' इत्यमरः.] २१. साप (सर्पेंद्र विशेष.) २२. मूर्च्छेमध्यें निमग्न. २३. वानर. (मारुति.) २४. धान्यांत. २५. उदक. येथें दिव्यौषधिरस आणि तोय यांचें सादृश्य कल्पून लक्ष्मणाला सस्याची उपमा दिली आहे.

शक्रप्रेषितरथवरीं समरीं बैसे राम, ।
अरिस म्हणे, 'यमपथ वरीं पुरवाया [1]सुरकाम'. ॥ ९०
करिति कराया भस्म रण ते सप्त अहोरात्र, ।
ज्यांला कांहीं न स्मरण जरिहि [2]क्षतचितगात्र. ॥ ९१
[3]हरि [4]हरि [5]दशदा दश शिरें, तरि अरि वरिना अंत, ।
म्हणे, 'प्रभुसि मोहीं शिरें;' 'हंत!' वदति सुर संत. ॥ ९२
घटजकथित'[6]रविहृदय'जप करिता झाला राम, ।
करवि न रवि बहु कठिण तप, पुरवी [7]परवधकाम. ॥ ९३
[8]विध्यस्त्रें शर भारिला श्रीरामें तत्काळ, ।
वक्ष विदारुनि मारिला दशग्रीव [9]सत्काळ. ॥ ९४
[10]सानुग सुरमुनि हर्षले 'जय जय' वदले सर्व, ।
दिव्यें पुष्पें वर्षले करुनि स्तव विधि [11]शर्व. ॥ ९५
सुरवाद्यें बहु वाजलीं, झालें गायन नृत्य, ।
भुवनें सुयशें साजलीं, प्रभुचें गाती [12]कृत्य. ॥ ९६
[13]अरिदारांचें हरविलें दुःख, प्रेरुनि आर्य, ।
[14]करुणानिधिनें करविलें दशकंठोत्तर कार्य. ॥ ९७
लक्ष्मणहस्तें बसविला [15]पदीं बिभीषण दास, ।
[16]भाव तन्मनीं [17]वसविला, तच्छत्रुगणीं त्रास. ॥ ९८
[18]दिव्य श्रीसीता करी, वारी जनापवाद, ।
[19]सानुज [20]सांगन तो हरी ताताचे धरि पाद. ॥ ९९
अमृत [21]मुदिरसा वर्षला पावुनि पद [22]नाकीश, ।
नमि सर्व उठुनि हर्षला त्या सुखसदना [23]कीश. ॥ १००
झाली रावणभू जिता, जेणें गेलें दैन्य, ।
त्याच्या तोषा पूजिता होय बिभीषण सैन्य. ॥ १०१

---

१. येथें 'मर' असें न म्हणतां पर्यायानें तोच अर्थ दर्शविला आहे. २. क्षतांनीं व्यापलें (चित) अंग (गात्र) ज्यांचें असे. ३. राम. ४. हरण करी. ५. दहावेळा. ६. 'आदित्यहृदय' नामक मंत्राचा जप. ७. शत्रुहननेच्छा. ८. ब्रह्मास्त्रें. ९. सुजनांचा काळ. १०. सेवकांसह. ११. शंकर. १२. रावणवधरूप कृत्य. १३. शत्रुयोषितांचें. १४. दयासागरें. (रामानें.) १५. सिंहासनीं. १६. भक्ति. १७. 'बसविला' या क्रियापदाची योजना काकाक्षिगोलकन्यायानें केली पाहिजे. १८. अग्नींतून चालत जाणें इत्यादि क्रिया. १९. धाकट्या भावासह. २०. अंगनासहित. २१. मुदिर=मेघ. २२. इंद्र. (नाकी+ईश=स्वर्गांत राहणारे देव+स्वामी.) २३. वानर.

सुगळबिभीषणसह वरी पुष्पकनाम विमान, ।
भरत पौर निर्वेवुनि करी सुरतरु रामचि मान. ॥ १०२
अभिषेक स्वीकारिला झाला राजा राम, ।
संसारी जन तारिला स्वयशें पुरवुनि काम. ॥ १०३
सबळ सुगळ बहु मानिला, दिधला निरवधि हर्ष; ।
भक्त बिभीषण वानिला, तें स्तवन अमृतवर्ष. ॥ १०४
मारुति रामें पूजिला, आठविले उपकार, ।
प्रसवे देवी भू जिला ती दे वर मणिहार. ॥ १०५
वधिला विप्राहित लवण शत्रुघ्नें बहु दुष्ट, ।
या विजयानें जन कवण झाला नाहीं तुष्ट? ॥ १०६
तीनकोटि गंधर्व खळ भरतें केले चूर, ।
जैसें प्रभुचें, बाहुबळ याचें गाती शूर. ॥ १०७
रामप्रमुखांचे तनय कुशप्रमुख जे आठ, ।
राजे केले ते सनय वेद जयांला पाठ. ॥ १०८
उघडुनि अनुकंपा दिली श्रीरामानें मुक्ति, ।
पुण्य कीर्ति संपादिली, देउनि अंतीं मुक्ति. ॥ १०९

## उपसंहार.

(अनुष्टुभ्वृत्त.)

**'दोहारामायण'** प्रेमें श्रीरामाच्या पदावरी. ।
**मयूरें** वाहिलें, ज्याचा गाता हर्ष सदा वरी. ॥

---

१. पुष्पक विमान हें कुबेराचें होतें. रावणानें तें त्याजपासून जिंकून लंकेंत आणिलें. तें बिभीषणानें रावणमरणोत्तर रामास दिलें. राम यांतच बसून परत अयोध्येस आला. नंतर त्यानें तें कुबेराकडे परत पाठविलें. २. सांत्वून. ३. कल्पवृक्ष. ४. मनोरथ, इच्छा. ५. असीम, अमर्याद, फार. ६. वाखाणिला, स्तविला. ७. सीता. ८. श्रेष्ठ. ९. 'पंचशतीरामायण' साकी ४९० पहा. १०. विप्र+अहित=द्विज+शत्रु. ११. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. बोलणारा प्रश्न विचारतो, पण झाला त्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून त्याजविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो अशा स्थळीं हा अलंकार होतो. याला इंग्रजींत Erotesis असें म्हणतात. १२. रामाचें. १३. मुलगे. १४. 'पंचशतीरामायण'—साकी ५०१ टीपा पहा. १५. नीतिमान्. १६. दया, कृपा.

## ३६. दोहारामायण. (द्वितीय.)

(दोहावृत्त.)

श्रीरामाचें चिंतितां प्रेमें पद[1]राजीव ।
'बा!' वेद म्हणे, 'सर्वथा पावे न [2]दरा [3]जीव.' ॥ १
श्रीरामाचें वारितें पातक सारें नाम, ।
[4]सकृदुच्चारें तारितें सर्व पुरवितें [5]काम. ॥ २
निववीतें जें पावतें बहु [6]मानस खेदास, ।
पावति या प्रभुचे जसे बहु मान सखे दास. ॥ ३
[7]पीयूषाहुनि शतगुणें रामाचें यश गोड, ।
याचें उदारपण म्हणे [8]मंदारा 'कर जोडें.[9]' ॥ ४
[10]गाधितनुजमख रक्षिला, उद्धरिले [11]मुनिदार, ।
[12]ईश्वरधनु भंगुनि दिलें सुख सीतेला फार. ॥ ५
[13]भृगुरामाचा शमविला [14]प्रळयानळसम कोप, ।
लोक स्वयशीं रमविला, करुनि [15]असत्पथलोप. ॥ ६
[16]गुरुसत्यव्रतरक्षणाकरितां तत्क्षण राम ।
प्राप्त हि राजपद त्यजी, [17]गतसार जसें [18]दाम. ॥ ७
सीतालक्ष्मणसह निघे त्यजुनि अयोध्या[19]धाम, ।
वनवासा बहु आदरी [20]तनवासा श्रीराम. ॥ ८
देता झाला पादुका [21]सेवोलाभरतास ।
देउनि [22]तिळंजळ दशरथा देवाला, भरतास. ॥ ९
भरत परतला, मुनिजनीं पीडा मग पाहून, ।
निघे [23]चित्रकूटाख्य जो प्रभु त्या [24]नगपाहून. ॥ १०

---

१. कमल. २. भीति. ३. प्राणी. ४. एकवार. ५. इच्छा. ६. चित्त. ७. अमृत. ८. कल्पवृक्ष. ९. कर जोडणें हें शरणागतत्वाचें ज्ञापक आहे. १०. विश्वामित्राचा यज्ञ. ११. स्त्री. (अहल्या.) येथें 'दार'शब्द पुंलिंगीं बहुवचनीं आहे. १२. शिव. १३. परशुराम. १४. प्रळयकाळचे अग्नीसारखा तीव्र. १५. अन्यायमार्गाचा नाश. १६. बापाचें वचन खरें करण्याकरितां. १७. वाळलेली. १८. माळ. १९. गृह. २०. वल्कलें धारण करणारा. २१. सेवेची प्राप्ति इच्छिणारा. २२. तिलांजलि. २३. चित्रकूट—यमुनेचे दक्षिणेस प्रयागापासून दहा कोसांवर हा पर्वत आहे. 'दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन्निवत्स्यसि । महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभदर्शनः ॥ चित्रकूट इति ख्यातो गंधमादनसंनिभः ॥' (वाल्मीकिरामायण—अयोध्याकांड—सर्ग ५४ श्लोक २८-२९.) २४. पर्वतश्रेष्ठ.

निववी घटज[1]प्रमुख जे सुव्रत नव नव संत, ।
मुनिवृंद[2] प्रभु शोभवी, तैसें न वन वसंत[3]. ॥ ११
वधुनि विराधा राक्षसा जो गृध्रांचा[4] राय ।
पितृसख सुखवुनि तन्मतें पंचवटीला[5] जाय. ॥ १२
तो दाशरथि प्रभु करी गोदातीरीं धाम[6], ।
नासाकर्ण छेदवी शूर्पणखेचे राम. ॥ १३
त्रिशिरा खरदूषण असे आले राक्षस शूर, ।
ते केले रघुनंदनें चवदा हजार चूर[7]. ॥ १४
प्रेषी मारीचा खळा शिकवुनि राक्षसभूप, ।
भ्रमवी सीतानयनमन तो कांचनमृग[8]रूप. ॥ १५
सीता प्रभुसि म्हणे, 'पहा, कनकमृग धरा जा च, ।
किंवा याचा सांपडुनि परम खळ करा जाच.' ॥ १६
होय समजुनि हि ती एणता[9] तसा मान्य[10], ।
स्त्रैणें[11] हिताहित हें जसें नेणतात सामान्य. ॥ १७
'हा सीते! हा लक्ष्मणा!' गर्जुनि ऐसें प्राण ।
सोडी तो मृग, लागतां हृदयीं प्रभुचा बाण. ॥ १८
वदली सीता, 'लक्ष्मणा! धांव, न उटजीं[12] ठाक, ।
हा! कठिना स्वस्थत्व हे' ऐशी ऐकुनि हांक. ॥ १९
लक्ष्मण वदला, 'देवि! हे राक्षसमाया[13] जाण, ।
स्वस्थ रहा, प्रभुच्या करीं आहे कार्मुक[14]बाण.' ॥ २०
ती बहु कोपें त्या म्हणे, 'खळा! मरावा राम, ।
ऐसें चिंतिसि तूं मनीं माझा धरूनि काम.' ॥ २१

---

१. अत्रि, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्यभ्राता व अगस्त्य. २. समूह. ३. येथें प्रभूला वसंताची आणि मुनिवृंदाला वनाची उपमा दिली आहे. ४. जटायु. ५. दहा वर्षे वनवासाचीं संपल्यावर राम पंचवटीस गेले. 'तत्र संवसतस्तस्य मुनीनामाश्रमेषु वै । रमतश्चानुकूल्येन ययुः संवत्सरा दश ॥' (वा०रा०—अरण्यकांड—सर्ग ११ श्लोक २६-२७), 'तमाश्रमं पंचवटीं जग्मतुः सह सीतया' (वा० रा०—अरण्यकांड—सर्ग १३ श्लोक २४ पहा.) ६. घर. ७. चूर करणें=चुरडून टाकणें, मारणें. दोहारामायण (प्रथम)—दोहा १०७ पहा. ८. सोन्याचा हरिण. ९. हरिणपणा. १०. वश होई. ११. स्त्रीवश. १२. पर्णशाळा. १३. कपट. १४. धनुष्य.

लक्ष्मण तीतें करि नमन, गमन हि तेथुनि दूर, ।
पूर अश्रुंचा आंवरूं न शके तो जरि शूर. ॥ २२
तों उटजीं यतिरूप दशवदन शिरे तत्काळ, ।
त्या स्त्रीरत्नातें[1] हरी तो तस्कर[2] सत्काळ[3]. ॥ २३
केला विरथ जटायुनें ती क्षतविग्रह[4] चोर, ।
तत्पक्ष च्छेदुनि निघे, न गणी अधर्म थोर. ॥ २४
फिरतां मागें भेटला लक्ष्मण शोकें दीन, ।
त्यासि प्रभु म्हणे, 'बोल, कां दिससी तेजें[5] हीन? ॥ २५
संचरती या राक्षसश्वापद[6]संघ वनांत, ।
त्यजिली कशि ती एकटी जी मृदु भीरु[7] मनांत? ॥ २६
कसें मदाज्ञाभंग हें आलें आग[8] मनास[9]? ।
वत्सा! कारण कोणतें झालें आगमनास?' ॥ २७
सांगे जें वदली सती तें होउनि पदलीन[10], ।
राम म्हणे कदलीस ती गुणें समा 'वदली न.' ॥ २८
'हाय!' म्हणत उटजाकडे[11] जाय रघूंचा राय[12], ।
वाय[13] विरहदुःसह उरीं, काय करील उपाय? ॥ २९
राम म्हणे, 'न दिसे, नसे या उटजाबाहेर, ।
वात पुरे आंत, प्रिया! तूं उठ जा बा! हेर[14].' ॥ ३०
आंत हि नसतां प्रियतमा, 'हाय!' म्हणे रघुवीर, ।
सानुज साश्रु पुनःपुन्हा शोधी गोदातीर. ॥ ३१
करितां शोध, वनीं दिसे क्षतविग्रह[15] तो तात[16], ।
झाले शोकाकुळ तसे जसे पुत्र होतात. ॥ ३२
'केली हे गति[17], रावणें[18] नेली सीता जाण.' ।

---

१. सीतेतें. २. चोर. ३. सज्जनांचा शत्रु. ४. भग्न झालेलें शरीर असा. ५. निस्तेज. ६. सावजें. ७. भित्री. ८. अपराध. ९. रुचलें. १०. चरणनत. ११. पर्णकुटीकडे. १२. राजा. (राम). १३. यांत 'य'ची आवृत्ति पुनः पुनः झाली आहे म्हणून 'अनुप्रास' अलंकार झाला आहे. १४. पहा. १५. जखमी झालेला विग्रह (देह) ज्याचा असा. १६. जटायु. १७. क्षतविग्रह-स्थिति. १८. 'रावणें' या शब्दाची योजना देहलीदीपन्यायानें केली पाहिजे.

विकळ[1] जटायु[2] असें कथी तत्क्षण सोडी प्राण. ॥ ३३
तातसखाचें करुनियां दाहाद्युत्तरकार्य,[3] ।
सद्गति देता जाहला, व्हाया प्रमुदित आर्य. ॥ ३४
पुनरपि फिरति वनांत, तों योजनबाहु कबंध ।
धरि, असिनीं[4] तद्भुज मथिति, ते हरिते[5] भवबंध.[6] ॥ ३५
शबरीस[7] बरी भेट दे सद्गति कीर्ति हि राम, ।
बदरें[8] पदरें घे तिचीं ज्याचें अमृतचि नाम. ॥ ३६
पंपातीरीं मग वसे शंपा[9]शत[10]रुचि[11]चाप, ।
संपाया धृति विरह दे कंपा उठवुनि ताप. ॥ ३७
भेटे मारुति मग करी सुग्रीवाची भेट, ।
झाले चिंतासागरीं अन्योन्या ते बेट. ॥ ३८
वाळी[12] भ्राता दुष्ट जो वाळी, त्याचे प्राण ।
श्रीराम प्रभु घे पळें, एकचि हाणुनि बाण. ॥ ३९
दुर्लभ तैल हि ज्यास, तो जैसा आज्यप,[13] दास ।
सुगळ योग्य केला तसा प्रभुनें राजपदास.[14] ॥ ४०

---

१. व्याकुळ, व्यथित. २. या गृध्राचे पूर्वज पुढील वंशावळींत दिले आहेत:—

दक्ष
|
ताम्रा
|
शुकी
|
नता
|
विनता
|
गरुड — अरुण × श्येनी
(अरुण × श्येनी):
संपाति — जटायु (दशरथाचा सखा)
(संपाति):
सुपार्श्व

३. दहनादि उत्तरक्रिया. ४. तरवार. ५. हरणारे. ६. संसारपाश. ७. हिचें नांव श्रमणा. पंचशतोरामायण–सांकी ४१८ टीप पहा. ८. बोरें. ९. वीज. १०. कांति. ११. धनुष्य. [शंभर वीजांच्या कांतिसारखें तेजस्वी चाप ज्याचें तो राम.] १२. टाकी. १३. तूप पिणारा. १४. वानरप्रभुपदास.

हटकि सुगळ, बहु भेटती [1]कीश [2]आसविल यास, ।
जे पटु अरिची न्यावया रणीं [3]आस [4]विलयास. ॥ ४१
धाडी सुगळ करावया जनकसुतेचा शोध, ।
पूर्वोत्तर पश्चिम दिशा [5]हुडकुनि आले [6]योध. ॥ ४२
जांबवदंगदमारुतिप्रमुख ऋक्षकपिवीर ।
दक्षिणदिशेसि धाडिले, बहु तेजस्वी धीर. ॥ ४३
सांगे बंधु जटायुचा संपाती तो शोध, ।
'लंकेंत [7]तिचा दशमुखें केला आहे [8]रोध.' ॥ ४४
मारुति शतयोजन जलधि लंघुनि गेला पार, ।
फार तयासि न वाटला दुर्घट हा व्यापार. ॥ ४५
मनीं म्हणे कपि देखतां सती अशोकवनांत ।
'[9]ग्रंथिलि [10]उपनिषत्प्राकृता कशी पशो! कवनांत.' ॥ ४६
रात्रौ परिसे [11]शिंशपागत कवि कपि सारें च, ।
घे उतरूनि सतीमुखें हतभ विकपिसा रेंच ॥ ४७
[12]क्षुद्रापगमावरि तिला [13]मुद्रा दे हरि खेद, ।
[14]रुद्रात्मा हित कथि जसा [15]मुद्राशिप्रद वेद. ॥ ४८
चूडामणि पाठवि जणों मूर्तिमंत [16]अनुराग, ।
[17]काककथा खुण कथि म्हणे, '[18]अरिवरि करु धनु [19]रागें'. ॥ ४९

---

१. वानर. २. आस्वल. [ऋक्ष=रीस.] ३. आशा. ४. नाश. ५. पाहुनी, शोधुनी. ६. भट, वीर. ७. त्या सीतेचा. ८. अटकाव. ९. 'उपनिषद्'शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी आहे म्हणून 'ग्रथिली' असें रूप योजिलें आहे. १०. वेदांचे शेवटचे भाग. ११. अशोक वृक्षावर चढलेला. [शिंशपा=अशोकवृक्ष.] १२. नीच रावण निघून गेल्यावर. १३. आंगठी. १४. रुद्रांशधारी. (मारुति.) १५. आनंदाचा राशि देणारा. (मुत्+राशि+प्रद.) १६. प्रेमभाव. हा उत्प्रेक्षालंकार होय. १७. इंद्रकाक—याला इंद्राचा पुत्र (ऐंद्रि) असें म्हटलें आहे. राम अरण्यांत सीतेसह वास करीत असतां, एकदा या कावळ्यानें सीतेच्या स्तनप्रदेशावर पक्षतुंडनखांनीं क्षत केलें. तेव्हां रामानें त्यास शासन करण्यासाठीं त्यावर इषीकास्त्राचा प्रयोग केला, म्हणजे इषिका नांवाचें एक तृण (काश) आहे त्याची काडी अभिमंत्रित करून ती त्यावर सोडिली. त्या अस्त्रापासून आपला बचाव करण्यासाठीं तो कावळा पुष्कळ फिरला, पण त्याचें रक्षण कोणी केलें नाहीं. तें इषीकास्त्र त्याची पाठ धरून होतेंच. तेव्हां तो निरुपाय होऊन, अस्त्राघात सोसण्यास असमर्थ होत्साता, रामास शरण आला. सर्व-

कपि वन[1] भंगुनि करि रणीं लक्ष **अ**क्षसह चूर. ।
भ्रमवुनि **द**शमुख **वि**धिकडे दवडि पुरीचा धूर. ॥ ९०
पुसुनि सतीस पुन्हा उडे जेंवि शर **प्र**भुमुक्त, ।
लंघुनि जलनिधि होय तो **अं**गदादिकपियुक्त. ॥ ९१
वंदुनि चूडामणि करीं **प्र**भुच्या दे कपिहीर[2], ।
आलिंगुनि 'मी तव ऋणी' असें वदे **र**घुवीर. ॥ ९२
**प्र**भुवर भाग्यें लागतां **ज**नकसुतेचा शोध ।
योध अमित घेउनि करी जवळ जलधिचें रोधें[3]. ॥ ९३
**द**शवदनें धिक्कारितां, प्रभुतें, वंदुनि पाय ।
विनवि **बि**भीषण यासि दे अभय **र**घूंचा राय. ॥ ९४
तो शरणागत निववला देउनि **लं**काराज्य, ।
तें प्रेम तया वाढवी जेंवि ज्वलना[4] आज्य. ॥ ९५
प्रार्थुनि सागर युक्ति कथी निजजललंघनहेतुं[5], ।
आज्ञापुनि **न**ळवानरा करवि प्रभुवर सेतु. ॥ ९६
प्रभु सेतुपथें उतरुनि प्रेपी **अं**गद दूत, ।
तन्मंत्रें[6] खळ खवळला, जेंवि अतिमलिन भूत. ॥ ९७
**रा**माज्ञेनें घालिती त्या कपिपृतना[7] कास, ।
देती राक्षस हर्ष बहु होउनि मृत नाकास[8]. ॥ ९८

---

नाशापेक्षां एकनेत्रनाश बरा अशी त्यानें आपल्या मनाची समजूत केली. तेव्हां रामानें त्याचा एक डोळा काढून घेऊन त्याला मुक्त केलें—अशी कथा आहे. [अयोध्याकांड–सर्ग ९५.] या वेळेपासूनच काकाला 'एकाक्ष' असें नांव पडलें. ही गोष्ट एकांतांत झाली, कोणास माहीत नव्हती, म्हणून सीतेनें आपली ओळख पटावी यासाठीं या गोष्टीचें स्मरण करविलें. १८. शत्रु. १९. क्रोध.

१. अशोकवन. २. वानरश्रेष्ठ. ३. तीर. ['रोध' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे.] ४. अग्नीला. ५. कारण, उपाय. ६. मसलत, उपदेश; (पक्षीं) भूत घालविणारा मंत्र. ७. सेना. ८. स्वर्ग. येथें उपादानलक्षणेनें तत्रस्थ देव, ऋषि, गंधर्व, अप्सरा इत्यादिकांचें ग्रहण केलें पाहिजे. या उपादानलक्षणेची व्याख्या विश्वनाथकविराजानें 'साहित्यदर्पणां'त अशी केली आहे:—'मुख्यार्थस्येतराक्षेपो वाक्यार्थेऽन्वयसिद्धये । स्यादात्मनोऽप्युपादानादेषोपादानलक्षणा ॥' [परिच्छेद २।१४], 'स्वसिद्धये पराक्षेपः परार्थं स्वसमर्पणम् । उपादानं लक्षणं चेत्युक्ता शुद्धैव सा द्विधा ॥ ५ ॥' [काव्यप्रकाश–द्वितीय उल्लास]. यांचा भावार्थ:—ज्या लक्षणेनें

दशवदनाचे मारिले सचिव सुत हि [1]समरांत, ।
अमरांत [2]तनन होय विभुजय पद्म भ्रमरांत. ॥ ५९

आकारें [3]घटकर्ण तो केवळ पर्वत [4]साच, ।
प्रभुशर निजतेजोगुण प्रकटी सर्व तसाच. ॥ ६०

[5]रुद्रबिभीषणयुत करी लक्ष्मण [6]घननादान्त, ।
गुरुसत्संगाश्रित जसा [7]षडहितहनना [8]दान्त. ॥ ६१

[9]शक्ररथीं बैसुनि करी श्रीश [10]समरसत्रास, ।
रणमुदित क्षण जाहले सर्व अमर [11]सत्रास. ॥ ६२

धरणें पडे करावया यश [12]परमा या काय, ।
पर [13]मायाधिपतिस करिल वश [14]परमाया काय? ॥ ६३

कवि म्हणति [15]विप प्रभुशरा दशानना [16]कालाहि ।
सोसे ती [17]दुर्व्यसनजा दशा न नाकाला हि. ॥ ६४

शंका हरुनि बिभीषणा रंका [18]संगरधीर ।
[19]पंकापहगुणसिंधु दे लंका श्रीरघुवीर. ॥ ६५

---

वाक्यार्थाचा अन्वयबोध व्हावा म्हणून शब्दांच्या मुख्यार्थासह त्या मुख्यार्थानें सूचित केलेला इतर अर्थ याचें ग्रहण करतात तिला 'उपादानलक्षणा' म्हणतात. शक्यार्थाच्या सिद्धीसाठीं अशक्यार्थाचें उपस्थापन करणें आणि अशक्यार्थाच्या सिद्धीसाठीं शक्यार्थाचें समर्पण (त्याग) करणें याला 'उपा- न लक्षण' असें म्हणतात. यावरून जेव्हां स्वार्थाचा परित्याग न करतां परार्थाची उपस्थिति होते दा· — उपादानलक्षणा होय. या लक्षणेच्या विवेचनांत 'श्वेतो धावति' म्हणजे 'पांढरा धांवतो' नेव्हां ता· धांवतो), 'कुंता: प्रविशन्ति' म्हणजे 'भाले शिरतात' (भालेवाले शिपाई शिरतात) (पांढरा घोडा अशी उदाहरणें दिलीं आहेत. या लक्षणेस 'अजहत्स्वार्था लक्षणा' असेंही म्हणतात. मूळ लक्षणेचे भेद दोनः—शुद्धा आणि गौणी. शुद्धेचे भेद दोनः—उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा; या प्रत्येकीचे दोन भेदः—सारोपा व ...ध्यवसाना; यावरून शुद्ध लक्षणेचे चार भेद झाले. गौणी लक्षणेचे दोन भेदः—सारोपा व ...ध्यवसाना. याप्रमाणें लक्षणा षड्विध आहे.

१. रणांत. २. आनंददर्शक गानादि चिन्ह. ३. कुंभकर्ण. ४. साच=खरोखर. ५. मारुति. ६. घननादान्त=इंद्र...चा अंत. ७. काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, दंभ हे सहा शत्रु यांच्या नाशा. ८. जितेंद्रिय. ९. इंद्र. १०. युद्धयज्ञ. ११. भीतियुक्त. १२. या परमा यश करावया काय धरणें पडे—या उत्तम ... यश मिळविण्याकरितां शरीर (काय) धरावें लागलें. , १३. परमेश्वर. १४. दुसऱ्याचें क.प. १५. गरुड. १६. काळसर्प. १७. संकट. १८. रणधुरंधर. १९. पापनाशक.

अरि वधिल्यावरि आणवी **सी**तेतें बाहेर, ।
करुनि प्रेम न आठवूं दिलें जिला [1]माहेर. ॥ ६६
**प्र**भु तिस म्हणे, 'धुवावया [2]सोडविलीस यशास, ।
जा त्यजिलिस परकरगता व्हाविस मला कशास?' ॥ ६७
यन्मन पतिच्या चिंतनीं स्मरणीं [3]अनळस, तीस ।
[4]दिव्य काय [5]अवघड? शिवों न शके [6]अनळ सतीस. ॥ ६८
दिव्यार्थ [7]ज्वलनीं शिरे न च वचके उग्रास, ।
तिस तो होय तसा जसा ग्रीष्मीं [8]जलमुग्रास. ॥ ६९
**शं**कर **वि**धि वदले, '**वि**भो! [9]अंकरहित हें रत्न, ।
स्वीकारीं **र**घुनंदना! निष्फळ न करीं यत्न.' ॥ ७०
**द**शरथहि म्हणे, 'न छळीं [10]शुचिरुचि [11]रुचिर [12]सुदार ।
**रा**मा! स्वीकारीं, इचा महिमा परम उदार.' ॥ ७१
**श**क्र म्हणे, 'वधिला भला अरि, करि तापचि [13]माग, ।
श्री**रा**मा! [14]जगदभयदा! सुयशस्कर वर माग.' ॥ ७२
**रा**म म्हणे, 'उठिव प्रभो! **द**[15]शशतनयना! [16]कीश.' ।
उठवी वर्षुनि अमृत तों [17]अदितितनय [18]नाकीश. ॥ ७३
करवी दिव्य प्रभु असें [19]लोकप्रत्ययकाम, ।
[20]वाम [21]अंक मग शोभवी **श्री**तें स्थापुनि **रा**म. ॥ ७४

---

१. माईहर, माहेर, आईचें घर. २. यशास धुवावया (म्यां तूं) सोडविलीस=अपकीर्ति दूर करण्याकरितां म्यां तुला सोडविलें. म्यां तूं सोडविलीस, त्यजिलीस, अशा प्रकारचे कर्मणि प्रयोग मोरोपंताचे काव्यांत बरेच आढळतात. ते 'निरंकुशा: कवय:' या न्यायानें आदरणीय होत. या संबंधानें पुढील पंतांचीं पद्येंही चिंतनीय आहेत:—'**वरिलासि** मत्सखीनें; म्यांही **वरिलासि** तूं मनें; मातें । पापापासुनि रक्षीं; या माझ्या चालवूनि नेमातें. ॥ १ ॥ जाउनि तो सूत म्हणे, कृष्णे! द्यूतांत तूं स्वयें धर्में । **हारविलीस** सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्में. ॥ २ ॥. ३. आळसरहित. ४. अग्निप्रवेश करून बाहेर पडणें. Ordeal. ५. दुष्कर, कठिण. ६. अग्नि. ७. अग्नींत. ८. मेघसमूह. जलमुच्+रास. ९. कालिमा. १०. विमलकांति. ११. सुंदर. १२. उत्तम स्त्री. १३. पूर्वीं. १४. जगताला अभय देणाऱ्या. १५. सहस्राक्षा. १६. वानर. १७. इंद्र. १८. नाकी+ईश=देव+स्वामी. (इंद्र.) १९. सर्व लोकांची खातरी व्हावी अशी इच्छा ज्याची होती असा. २०. डावा. [वामांकच बायकाचें बसण्याचें स्थान.] २१. मांडी.

बसुनि विमानीं ऋक्ष कपि[1]**रा**क्षसपतिसह **राम**, ।
प्रमुदित **भ**रत करावया निघे त्रिजगद[2]भिराम. ॥ ७५

**प्र**भुजी अंकीं प्रियतमा सेतु [3]लक्षवी तीस ।
म्हणे, 'सुखाचे अविरहीं हेतु लक्ष [4]वीतीस.' ॥ ७६

दाखवुनि [5]स्वसहाय जे, त्यांचें सांगे नाम, ।
तत्तद्[6]विक्रमसत्कथा वर्णी जगद[2]भिराम. ॥ ७७

श्री**सी**तेतें निज पुढीं **अं**गद कळवी उक्त. ।
[7]प्लवगवरांच्या पातल्या [8]दारा **ता**रायुक्त. ॥ ७८

**गो**दावरीस पाहतां [9]मोदा वरी [10]सदार, ।
न त्यजि मुक्ति वरावया ज्याच्या अरीस दार. ॥ ७९

दर्शन देउनि निववीला तो **गु**हनाम [11]निषाद, ।
सकळहि पुरजनसह **भ**रत हतवियोग[12]विषाद. ॥ ८०

**प्र**भुचें **प्र**भुला नमुनी दे राज्य **भ**रत भरतप्त, ।
स्तवि निज [13]कुलतिलकासि तो [14]सप्ति [15]जयाचे सप्त. ॥ ८१

अभिषेक[16]मह [17]प्रोच्च जो इतर [18]निपट तो [19]खर्व, ।
वर्णिति पुण्ययशःसुधा तृषित ऋषि तया सर्व. ॥ ८२

श्री**राम** [20]सरस [21]मुदिर जे भक्त सकळ नर मोर, ।
[22]**सा**केत असे प्रिय तसें प्रभुदृष्टिस न [23]रमोर, ॥ ८३

निवुनि सुर सुखें नाचती **प्र**भुच्या दृष्टिसमोर, ।
प्रभुमूर्तिस कवि सेविती, जैसे वृष्टिस **मो**र. ॥ ८४

---

१. बिभीषण. २. सुंदर. ३. दाखवी. ४. समागम असला म्हणजे लक्षावधि सुखें देतेस. ५. मदतनीस. ६. पराक्रम. ७. वानर. ८. स्त्रिया. ९. आनंद. १०. सस्त्रीक. ११. भिल्ल, कोळी. १२. नष्ट झालें आहे वियोगदुःख ज्याचें असा. १३. रामाला. १४. घोडे. १५. ज्या सूर्याचे सात सप्ति (घोडे) आहेत तो. सूर्याच्या रथास सात घोडे असतात म्हणून त्याला 'सप्तसप्ति,' 'सप्ताश्व' असें म्हणतात. १६. आनंद. १७. मोठा. १८. निरुक, केवळ, अशा अर्थी या शब्दाची योजना पंतांनीं अनेकदां केली आहे. (अहा **निपट** धृष्ट मीं प्रभुवरासि कां लाजसी—केकावलि १६.) १९. लहान, ठेंगणा. २०. गजर. २१. मेघ. २२. अयोध्या. २३. रमा+उर= लक्ष्मीचें उर.

# ३७. [1]सौम्यारामायण.

(सौम्यावृत्त.)

[2]**श्री**भर्ता वाक्याचा कर्ता झाला [3]भक्ताविद्याहर्ता, ।
[4]द्रुहिण[5]**गि**रिशसुरमुनिवरशत[6]नुत सकळवरदवर **द**शरथनृपसुत. ॥ १
स्थापी राजा प्रेमें नाम श्री**कौ**सल्यापुत्रा **राम**; ।
प्रमुदित करि मन [7]कविजनशिखिघन [8]यतिपतिमतिधन [9]सुभजकझषवन. ॥ २
**कै**केयीच्या [10]पोटीं आला, ठेवी रम्या [11]आख्या त्याला, ।
**र**घुवर **द**शरथ **भ**रत असि [12]सुकवि [13]अहितमुख [14]सुकवि, [15]कुगतिसहि चुकवि. ॥ ३
स्वाद्या **मि**[16]त्रा तीचे दोघे, [17]तज्जन्में धन्यत्वा तो घे. ।
स्तुति [18]शतमख करि, सुगति चरण धरि, [19]जगदघ परिहरि, सुयश भुवन भरि. ॥ ४
[20]यन्नामीं [21]लक्ष्माच्या अंतीं [22]णें प्रेमानें ध्यावा संतीं; ।
प्रथम तनय [23]नयरत [24]ततगुण [25]शुचि, उचित निपुण [26]निजरुचिजितहिमरुचि. ॥ ५

---

१. हें रामायण सौम्या नांवाचे वृत्तांत लिहिलें आहे म्हणून यास 'सौम्यारामायण' म्हटलें आहे. 'सौम्यावृत्त' हें '**गीत्यार्या**' छंदाचा पोटभेद आहे:—१ ज्यांत सर्व लघु अक्षरांनीं झालेले असे सोळा मात्रा गण असतात, त्या छंदाला **गीत्यार्या** छंद म्हणतात. २ एका अर्धांत सर्व गुरु अक्षरें व एकांत सर्व लघु अक्षरें असतात, त्या गीत्यार्या छंदाला **शिखा** म्हणावें. ३ पहिल्या अर्धांत जर सर्व लघु अक्षरें व दुसऱ्यांत सर्व गुरु अक्षरें असतील, तर त्या छंदाला **ज्योति** म्हणावें. ४ तसेंच पहिल्या अर्धांत सर्व गुरु अक्षरें व दुसऱ्यांत सर्व लघु अक्षरें असतील तर त्या छंदाला **सौम्या** म्हणावें. यावरून या सौम्यावृत्ताच्या पूर्वार्धांत सोळा गुरु अक्षरें असतात, व उत्तरार्धांत बत्तीस लघु अक्षरें असतात, असें समजावें. **पिं**गलकृत छंदशास्त्रावर टीका लिहिणारा **ह**लायुध यानें या वृत्ताचें हें उदाहरण दिलें आहे:—'सौम्यां दृष्टिं देहि स्नेहाद् देहेऽस्माकं मानं मुक्त्वा। शशधरमुखि मुखमुपनय मम हृदि मनसिजरुजमपहर लघुतरमिह ॥' २. लक्ष्मीपति राम तो. ३. भक्तांची अविद्या दूर करणारा. ४. विधि. ५. शंकर. ६. स्तुत. ७. कविजनरूप जे मोर यांस मेघ असा. (राम.) ८. योगिश्रेष्ठांच्या बुद्धीचें धन असा. ९. उत्तम भक्तरूप जे मत्स्य त्यांचें वन (उदक) असा' राम तो. [वन=उदक; 'क्लीबं स्यात्कानने नीरे निवासे निलये **वनम्**' इति रभसः.] १०. पोटा येणें= उदरीं जन्म घेणें, पोटीं जन्मणें. ११. नाम. १२. उत्तम कवि असा. ('दशरथ' या शब्दाचें विशेषण.) १३. शत्रूंचें तोंड. १४. शुष्क करि. १५. अधोगतीला. (स्वपितरांची अधोगति दूर करी.) १६. सुआद्या—सु हें अक्षर आदीं जीच्या असी मित्रा म्हणजे सुमित्रा तीचे. १७. त्या दोघां पुत्रांच्या (लक्ष्मणशत्रुघ्नांच्या) जन्मानें. १८. इंद्र. १९. जगताचें पाप. २०. ज्याच्या नामीं. २१. 'लक्ष्म'शब्दाच्या. २२. 'ण' हा वर्ण. (लक्ष्मण असा भाव.) येथें पंतांची शब्दचित्राभिरुचि व्यक्त होते. २३. नीतिमान्. २४. विस्तार पावले गुण ज्याचे असा. २५. शुद्ध. २६. आपल्या कांतीनें जिंकिला हिमरुचि (चंद्र) ज्याणें असा.

याचा शत्रुघ्नाख्य भ्राता, [1]कैकेयीपुत्रांघ्रिध्याता; ।
रघुकुलहितकर सकलपुरुषवर [2]नयनहृदयहर [3]विमलगुणनिकर. ॥ ६
विश्वामित्राच्या यज्ञातें संरक्षी सर्वातदृज्ञातें; ।
भुलवि सुखभरित, सकलभय हरित, अरिहृदय करित [4]अतिविकल चरित. ॥ ७
वारी पादस्पर्शें तापा, तारी [5]साध्वी, नाशी शापा; ।
पुरवि जनकपण, चुरि [6]पुरहरधनु, [7]वरि विभु [8]महिजनु [9]सुरुचिरतरतनु. ॥ ८
श्रीरामभ्रात्यांला धन्या दे [10]वैदेहक्ष्माभृत् कन्या, ।
धन गज हय रथ; [11]कविवरमतकथ [12]धरि भृगुपति पथ, वरि भय दशरथ. ॥९
जिंकी लीलेनें श्रीराम [13]क्षत्रघ्नाला, दावी [14]धाम. ।
अतुल विजय करि, पुरजनमन [15]हरि, [16]भवजलनिधितरिपद [17]नरतनु हरि. ॥१०
देवांच्या [18]कार्यातें लक्षी, ताताच्या [19]धर्मातें रक्षी; ।
वन वरि [20]सदवरजमहिजनिसहित, [21]अहितदलनरुचि सुहृदयसुमहित. ॥ ११
गोदातीरीं हर्षें राहे, [22]मोदों राम [23]स्वांतीं वाहे; ।
[24]खलपलभुगधिप[25]तदवरजनि धरि [26]कुमतिस, नकटिच [27]भगवदनुज करि. ॥ १२

---

१. कैकेयीच्या पुत्राच्या (भरताच्या) अंघ्रीचें (पायांचें) ध्यानकर्ती. २. नेत्र आणि हृदय यांतें हरण करणारा (रंजविणारा) असा. ३. पवित्र गुणांचा निकर (समूह) असा. ४. अत्यंत व्याकुल, ५. अहल्या. [साध्वी='पतिं या नाभिचरति मनोवाक्कायसंयता । सा भर्तुर्लोकमाप्नोति सद्भिः साध्वीति चोच्यते ॥' इति मनुः. (मनुस्मृति–अध्याय ९ श्लोक २९.) याचा भावार्थः—जी स्त्री मन, वाणी आणि देह यांनीं संयत असून (परपुरुषसंगार्थ) भर्त्याचा त्याग करीत नाहीं ती भर्त्यासह स्वर्गादि लोकांप्रत पावते, व तिला या लोकीं शिष्ट जन 'साध्वी' असें म्हणतात. ६. शिवचाप. ७. लग्न करी. येथें तीन क्रिया आहेत आणि त्यांचा कर्ता 'विभु' आहे. यांत कारकदीपक अलंकार झाला आहे. जेथें अनेक क्रियांचा संबंध एकाच कर्त्याशीं असतो तेथें हा अलंकार होतो. याचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आढळतात. पुढें पद्य १५ उत्तरार्ध यांत हाच अलंकार आहे. ८. सीता. ९. अतिसुंदर शरीर जीचें असी. १०. जनकराजा. ११. पंडितश्रेष्ठांला संमत आहे कथा ज्याची असा. (भृगुपति.) १२. रस्ता अडवी. १३. क्षत्रियघातक परशुरामा. १४. तेज. १५. हरण करी. १६. संसारसमुद्रामध्यें नौकारूप पाय ज्याचे असा. [तरि=तरी.] १७. मनुष्यदेहधारी. १८. राक्षसनिकार्यातें. १९. सत्यातें. २०. उत्तम कनिष्ठ बंधु (लक्ष्मण) आणि महिजनि (सीता) यांसहित. २१. शत्रूच्या नाशाविषयीं आवड ज्याला असा. २२. आनंदा. २३. चित्तीं. २४. दुष्ट मांसभक्षक जे राक्षस त्यांचा धनी रावण. २५. त्या रावणाची कनिष्ठ भगिनी शूर्पणखा ती. २६. दुर्बुद्धि. २७. भगवंताचा कनिष्ठ बंधु. (लक्ष्मण.)

[1]तद्भ्राता जो ये माराया, त्या विप्रत्रासा वाराया, ।
[2]प्रभुवर [3]खरतर [4]विखरुनि शरवर, [5]वधि [6]निरवधिबळ, जरि अरि [7]खर [8]खर. ॥१३
कोपे [9]रक्षोराज द्वेषी, मोहाया [10]श्रीचित्त प्रेषी ।
कपटकनकमृग, रघुपतिस [11]चकवि, हरि [12]तिसें; गति असि घडलि कथि [13]सुकवि. १४
वैरी जो गर्वातें झाडी, खड्गें त्या [14]गृध्रेंद्रा पाडी, ।
विरथ तरि पळवि, न कुमतिस वळवि, कुलवदन मळवि, सुरधृतिस ढळवि. १५
त्या लंकेंत श्रीतें रोधी द्वेष्टा कामी लोभी क्रोधी. ।
[15]हरि [16]पदनततम जरि [17]विधिगुरुतम, तळमळचि करि [18]शमनिधि [19]विषयिसम. ॥ १६
शोकाग्नीचें वाटे [20]शोची लागे, बाष्पें दाटे, [21]शोची, ।
हुडकि अजित घन ‘अहह’ म्हणत वन, खग मृग मुनिजन रडवि, भुलवि मन. १७
गृध्रेंद्राच्या पाहे [22]मोहीं जो [23]ज्ञातात्मा बोले तो ‘[24]हाँ!’. ।
कथि [25]दशमुखकृतअवनिजनिहरण, वरि [26]भगवदुरुग [27]पतंगपति मरण. ॥ १८
[28]ताताच्या शुद्धा मित्रा त्या सीतेच्या [29]मुद्धामीं त्राल्या ।
वसवि, [30]सुकृतिशतमहित करुनि, [31]सुरपरमसदय [32]भजदमरतरु [33]निसुर. ॥ १९
[34]दोघांतें कल्पी [35]सुग्रास, [36]स्वामी [37]तारी [38]त्या [39]उग्रास; ।
[40]मग वरदचरण म्हणति सुयश बरि करु रुचिर वरुनि सुचिर गति शबरि.॥२०

---

१. त्या शूर्पणखेचा भाऊ. २. राम. ३. अतितीक्ष्ण असे. ४. पसरून. ५. त्या (खराला) वधि. ६. अमितबळ. ७. नामविशेष. (शूर्पणखेचा भाऊ.) ८. तीक्ष्ण. (‘खर’ या शब्दाचें विशेषण.) ९. रावण. १०. सीतेचें मन. ११. भुलवी. १२. त्या सीतेला पळवी. १३. वाल्मीकि. १४. जटायूला. १५. हरण करी. १६. चरणीं नम्र झालेल्यांचें अज्ञान. १७. ब्रह्मदेवापेक्षां थोर. १८. शांतीचा ठेवा असाही. (राम.) १९. विषयिलोकांसारिखा. २०. तेज, कांति, ज्वाला, ज्योति. २१. शोक करी, रडे. २२. मोह=मूर्च्छा. २३. आपण कोण हें ज्याणें जाणलें आहे असा. ‘ज्ञानात्मा’ असा पाठ आहे. २४. हाय. २५. रावणानें केलेलें सीतेचें हरण. २६. भगवान् जो राम त्याच्या मांडीवर असणारा. २७. पक्षिश्रेष्ठ जटायु तो. २८. दशरथाच्या. २९. आनंदगृहीं. (सीतेच्या त्राल्या आणि बापाच्या शुद्धा मित्रा म्हणजे जटायूला आनंदाच्या घरीं ठेवी—असा भाव.) ३०. पुण्यवंतांच्या शेंकड्यानें पूजा करण्यास योग्य असा करून. ३१. देवांचा परम कारुणिक. (राम.) ३२. भक्तांचा कल्पवृक्ष राम तो. ३३. कोणत्याही काळजींतून मुक्त झाला तो. (निष्काळजी.) ३४. रामलक्ष्मणांतें. ३५. उत्तम घांस. ३६. राम. ३७. कबंध पूर्व गंधर्वरूप पावला. ३८. कबंधराक्षसा. ३९. भयंकरा. (‘त्या’ या शब्दाचें विशेषण.) ४०. शबरि सुचिर बरि गति वरुनि सुयश रुचिर करु (करो) [असें] मग वरदचरण म्हणति—असा अन्वय.

पाहे रम्याकारा **पं**पा, तीच्या तीरीं वाहे कंपा, ।
स्मरुनि [1]अवनिजनु [2]कुतकमनुजतनु, निववि कथुनि [3]अनुजनि हित, धरि हनु. २१
वाताचा पुत्र श्री**रा**मा भेटे विश्वाच्या विश्रामा. ।
[4]रविसुत [5]सख करि विभुसि **सु**गल [6]हरि; [7]कळवि हरुनि [8]हरिजनि धन परिहरि. २२
जो मत्त भ्रात्यातें [9]वाळी [10]बंधुस्त्रीतें भोगी **वा**ळी, ।
[11]तदसु [12]अजित [13]हरि, **र**विज सकळ[14]हरि[15]महिपति पति करि, लवति अखिल अरि. २३
[16]लावी त्या **सी**तेच्या शोधा, लज्जा सर्वां अन्या योधां. ।
[17]कनकरचित [18]मणिखचित **पु**रें [19][20]भसित [21]करुनि, [22]अवनिजनिमुखविधुहि हसित. २४
[23]आश्लेष स्वामी दे [24]त्यातें **श्री**चूडामूषा देत्यातें, ।
[25]त्रिजगदवनकर बळनिधि [26]महिधर, विभु **र**विकुलवर गणि उपकृतिभर. ॥ २५
नम्रा [27]शत्रुभ्रात्या प्राज्य प्रेमें देता झाला राज्य; ।
[28]जलधि कथित करि, अमित [29]शिखरि वरि, रुचिर कुसुमतरिशत[30]ततिसम धरि. २६
[31]सेतुवंध्यानें नेला पारा सेनासिंधु **श्री**शें सारा; ।
तरि कुमति नमन न करि, [32]कलिशमन करवि बलदमन **य**मसदनगमन. ॥ २७
केलीं **सी**तानाथें युद्धें भारी **दि**क्कंठेंहि क्रुद्धें. ।
[33]प्रभु सुविजय, पळ वरि परिभव [34]खळ, अनुजतनुजबल बुडवि जरि सबल. ॥ २८

---

१. सीता. २. कौतुकानें मनुष्यशरीर धरणारा. (राम.) ३. लक्ष्मण. ४. सुग्रीव. ५. सख्य= सख्य, मैत्री. ६. वानर. ७. हरिजनि (इंद्रपुत्र-वाळी) [माझें] धन हरुनि [स्त्रीही-रुमा] परिहरि, [असें विभुला सुगळ] कळवि. ८. हरि+जनि=इंद्र+जन्म=इंद्रापासून ज्याचा जन्म तो. ९. वर्जी. १०. रुमेतें. ११. त्या वाळीचे प्राण. १२. कोणी जिंकिला नाहीं असा जो राम तो. १३. हरण करी. १४. वानर. १५. राजा. १६. 'लावी' या क्रियापदाची योजना काकाक्षिगोलकन्यायानें केली पाहिजे. १७. सुवर्णानें रचलेलें. १८. रत्नखचित. १९. लंका. २०. भस्म. २१. 'करुनि' या शब्दाचा अन्वय 'भसित' आणि 'हसित' या शब्दाशीं देहलीदीपन्यायानें लावणें इष्ट आहे. २२. सीतेचा मुखचंद्रही. २३. आलिंगन. २४. मारुतीतें. २५. त्रैलोक्याचें अवन (रक्षण) करणारा. २६. राजा. २७. बिभीषणाला. २८. जलधि [रामाचें] कथित (सांगितलेलें वचन—आज्ञा) करि [आणि] रुचिरकुसुम (ज्यांवर चित्रविचित्र सुंदर पुष्पें आहेत असे) अमित (अगणित) शिखरि (पर्वत) तरिशततति सम (नौकांच्या शेंकडों पंक्तींप्रमाणें) वरि (आपणावर) धरि (धारण करी.) २९. पर्वत. ३०. परंपरेप्रमाणें. ३१. सेतुरूप मार्गानें. ३२. कलिनाशक. (राम.) ३३. प्रभु (राम) सुविजय वरि [आणि] खळ (रावण) परिभव (पराजय) [व] पळ (पलायन) [वरि.] जरि 'अनुजाचें व तनुजाचें बळ (सैन्य) सबळ (शक्तिमान्-विपुल) होतें तरी तें बुडवी (निरुपयोगी झालें). ३४. दुष्ट. (रावण.)

ज्या ज्या दुष्टें [1]माया केल्या त्या त्या सर्वा वायां गेल्या; ।
प्रभुसि [2]पतगपति [3]पवनसुत जपति कपिकुलप तपति, [4]पर सकल लपति. ॥ २९
रामस्वामी [5]कुंभश्रोत्रा ध्वंसी जैसा [6]वज्री [7]गोत्रा. ।
[8]तदनुज हरिदवजलधरघनरववध [9]करि, रणभय यश करि अभिनव. ॥ ३०
दिक्कंठ श्रीशाच्या ताडी भ्रात्यातें, शक्तीनें पाडी. ।
प्रकटुनि विभु [10]बळलव, न लवुनि पळ, भुवनकमळजळ यश करि, दमि खळ. ३१
ओपध्यद्रीच्या [11]तो आणी शृंगा, त्याच्या [12]मोहा खाणी; ।
प्रभुवर मग [13]हरिविजयद रथ वरि, अतुल समर करि, अरिहि न भयं धरि.॥ ३२
[14]सप्ताहोरात्र श्रीराम क्रूरासीं मांडी [15]संग्राम; ।
करवुनि [15]समर [16]अमरनुत [17]चिर, वधि, भरवि [18]निजविजयसदमृत [19]निरवधि. ॥ ३३
श्रीरामीं पुष्पांच्या वृष्टी झाल्या, हर्षें कोंदे सृष्टी. ।
[20]प्रभुनुति नवि नवि करिति रसिक कवि, धरि निज [21]रुचि रवि, गतनिजधृति [22]पवि. ३४
झालीं वाद्यें नृत्यें गीतें, तत्सन्नादें पापें भीतें. ।
[23]नुति [24]नतिहुनि [25]बहु न, [26]भगवदपचिति समजति [27]बुधवर गुरुतर तपचि ति. ॥ ३५
देता झाला स्वामी प्रेता त्या सिद्धि [28]श्रेष्ठाभिप्रेता; ।
[29]तदनुज शुचिमति निजपदकृतनति करि निशिचरपति अतिसुचरितरति. ॥ ३६
[30]दिव्योत्तीर्णा सीता देवी श्रीरामाच्या [31]अंका सेवी. ।

---

१. कपटें. २. गरुड. ३. मारुति. ४. शत्रु. ५. कुंभकर्णा. ६. इंद्र. ७. पर्वता. ८. त्याचा अनुज. (लक्ष्मण.) ९. हरि (वानर), दव (वणवा, दावाग्नि), जलधर (मेघ)=वानररूप वणव्याला मेघासारखा जो घनरव (इंद्रजित्) त्याचा वध करि (लक्ष्मणानें मेघनादाचा वध केला) [आणि] रणामध्यें भय उत्पन्न करून अभिनव असें यश संपादिलें. १०. अल्प सामर्थ्य. ११. मारुति. १२. त्या लक्ष्मणाच्या मूर्च्छेला. १३. इंद्राचा जय देणारा रथ. १४. सात रात्रंदिवस. १५. युद्ध. १६. देवस्तुत. १७. पुष्कळ वेळ. १८. आपला जय हेंच उत्तम अमृत. १९. अमित, अमर्याद. २०. प्रभुस्तुति. २१. कांति, दीप्ति. २२. वज्र. २३. नमस्कार. २४. नमस्काराहून. २५. श्रेष्ठ, थोर. २६. भगवंताची पूजा. २७. शहाणा. २८. श्रेष्ठांनीं इच्छिलेली असी. २९. अतिसुचरितरति शुचिमति [आणि] निजपदकृतनति [असा] तदनुज [बिभीषण] त्याला) निशिचरपति करि—असा अन्वय. सुचरिताची (पुण्यकर्माची) ज्याला अतिशयित रति (आवड—गोडी) असा; शुद्ध मनाचा असा; आणि आपल्या पदाला (चरणाला) ज्यानें नति (नमस्कार) केला असा जो त्या (रावणाचा) अनुज (कनिष्ठ बंधु) त्याला राम निशिचरपति (राक्षसांचा राजा) करता झाला. ३०. दिव्य म्ह० खा काढणें, शपथ करणें, यांतून पार झाली असी. [दिव्य उतरणें=दिव्यांतून उतरणें, दिव्यास उतरणें= To come safe out of an ordeal.] ३१. मांडीला.

[1]स्तवि सविधि दहन, गुरु[2] इतर [3]मह न, नि[4]जविपदसहनविभुचरित गहन. ॥३७
भेटे [5]स्नेहें बोले राजा पुत्रांतें, 'कीर्तीनें साजा.' ।
[6]प्रभु वि[7]धिगुरु, पँण मिरवि [8]तनुजपण, करि नमुनि चरण विरहदवहरण. ॥३८
शक्रें सुग्रीवाचे [9]मेले युद्धीं योद्धे जागे केले. ।
[10]खंचरपतिस रघुवर कथुनि बरवि [11]संकटककपिपतितदपचिति करवि. ॥ ३९
[12]पुष्पाख्य [13]श्रीदाचें यान श्रीशा दे तो [14]लंकेशान; ।
स्वरतभरतमति निववि अजित अतिकरुणं गरुडगति दिनकरकुलपति. ॥ ४०
श्रीशें त्रैलो[15]क्येशा पूर्ण भ्रात्याची ही केली तूर्ण. ।
नृपतिपण वरुनि, भवजभय हरुनि, निववि‌लिच करुनि यश [16]अवनि वरुनि. ४१
रामस्वामी दासां मोरां ये वि[17]द्युत्वान्सा सामोरा; ।
[18]निववि भजकमन, रुचिर करि भुवन, वनमधु शमधनजनहृदयभवन. ॥ ४२

## उपसंहार.

(अनुष्टुभ्वृत्त.)

**'सौम्यारामायण'** प्रेमें असकृत्कृतवंदनें ।
वाहिलें **रामचरणीं मयूरें राम**नंदनें. ॥

---

१. सविधि (ब्रह्मदेवासह) दहन (अग्निदेव) [सीतेची] स्तुति करूं लागले, मग इतरांची कथा काय? २. मोठा. ३. उत्सव. दुसरा उत्सव यापेक्षां मोठा नाहीं. ४. आपल्या दासांची विपत्ति ज्याला सहन होत नाहीं अशा विभूचें चरित गहन आहे. ५. राम. ६. ब्रह्मदेवाचा पिता. ७. परंतु. ८. पुत्रत्व. ९. मेलेले. १०. बिभीषणास. ११. रघुवर (राम) खचरपतिस (बिभीषणाला) कथुनि (सांगून) सकटककपिपतितदपचिति (सर्व सैन्यासुद्धां वानरांचा जो अधिपति-सुग्रीव त्याची अपचिति-पूजा) बरवि करवि (उत्तम करवि). रामानें बिभीषणास सांगून सुग्रीवाची सैन्यासह उत्तम प्रकारें पूजा करविली. १२. पुष्प (पुष्पक) आहे आख्या (नांव) ज्याची तें (यान=विमान.) १३. कुबेराचें. १४. बिभीषण. (लंका+ईशान=लंकानाथ.) १५. तीन लोकांची इच्छा. १६. पृथ्वी. १७. मेघसा. १८. शमधनजनहृदयभवन (शमधन असे जे जन=मुनी त्यांच्या हृदयाचें भवन घर—आधार, ऋषिमंडळाच्या मनाचा जो आधार) तो भजकमन (भक्तांचें.चित्त) निववी (शांत आणि सुस्थ करी, सुखी करी), (आणि) वनमधु भुवन रुचिर करि=ज्यांत वन (उदक) हेंच मधु (मध) आहे असें भवन (गृह) रुचिर (सुंदर) करी.

# ३८. [1]कल्याणरामायण.

([2]पज्झटिकावृत्त.)

**श्री**पति खळ **द**शमुख माराया, [3]यशगात्यांचा [4]भव साराया, ।
जो **द**शरथ [5]गुरु करि या राया, चरणरजें स्थिरचर ताराया. ॥ १
झाला **कौ**सल्यासुत **राम** प्रभु, ज्याचें [6]श्रुतिबहुमत नाम. ।
**कै**केयीसुत **भ**रत, [7]पवित्रा [8]वी **लक्ष्मण शत्रुघ्न सु**मित्रा. ॥ २
**राम**प्रभु **लक्ष्मण** हे जोडी, **भ**रत **रि**पुघ्न यांत बहु गोडी. ।
यांची रीति त्रिजगीं थोडी, कोणाचेंहि न जी मन मोडी. ॥ ३
प्रथम [9]मुनि म्हणे, '[10]याँ विनयज्ञा संरक्षाया लाविन यज्ञा' ।
ने मागुनि, करि [11]मखरक्षण [12]हो ! प्रभु [13]इषुसि वदे, '[14]प्रखर क्षण हो'.॥ ४
करि तारुनि **र**घुराज यश शिला, लावि म्हणाया या जय शशिला. ।
मोडी [15]भवगजहरि चापातें, सुजन सुखविता अरिच्या [16]पातें. ॥ ५
[17]वसुधाप्रभवा **सी**ता बाळा प्रभुच्या कंठीं घाली [18]माळा. ।
सुमति [19]**ज**नक**ज**नकानुजकन्या वरिति तिघांसि तिघी अतिधन्या. ॥ ६
नृप झाले [20]नति करिते ज्यातें त्या [21]**रा**माच्या हरि तेजातें. ।
[22]गुरु युवराज कराया पाहे प्रभुसि, न तें **कै**केयी साहे. ॥ ७
देऊं केलें [23]वरयुग मागें कीं [24]दासीच्या मतिला लागे. ।
'पुर [25]पुत्रा, वन **रा**मा चवदा वर्षें, हर्षें द्या, [26]हूंच वदा. ॥ ८

---

१. हें काव्य शुभप्राप्तिप्रद आहे असें समजून याला 'कल्याणरामायण' असें नांव दिलें असावें. २.या वृत्ताचें लक्षण गंगादासकृत 'छंदोमंजरीं'त(पंचमस्तबक) दिलें आहे तें:—'प्रतिपदयमकितषोडशमात्रा नवमगुरुत्वविभूषितगात्रा । **पज्झटिकाया** एष विवेकः क्वापि न मध्यगुरुर्गण एकः ॥.' याचा भावार्थ:—पज्झटिका हें मात्रावृत्त आहे. याच्या प्रत्येक पादांत सोळा मात्रा असतात, प्रत्येक पादांतील नवम मात्रेचें अक्षर गुरु असतें, आणि यांत कोठेंही मध्य अक्षर गुरु आहे असा मात्रा गण नसतो. ३. यश गाणारांचा. ४. संसार. ५. पिता. ६. वेदांना बहुमान्य असें. ('नाम' या शब्दाचें विशेषण.) ७. शुद्ध असी. ('सुमित्रा' या शब्दाचें विशेषण.) ८. प्रसवे. ९.विश्वामित्र. १०.रामा. ११. यज्ञरक्षण. १२. अहो. १३. बाणासि. १४. तीक्ष्ण. १५. संसाररूप हत्तीचा सिंह राम तो. १६. पतनानें, नाशानें. १७. वसुधेपासून (पृथ्वीपासून) आहे प्रभव (उत्पत्ति) जीचा ती. १८. रामाला वरी. १९. जनकराजा आणि त्या जनकराजाचा अनुज त्यांच्या कन्या. २०. नमस्कार. २१. परशुरामाच्या. २२. दशरथ. २३. दोन वर. २४. मंथरेच्यां. (अयोध्याकांड–सर्ग ८-९.) २५. भरताला. २६. होय असें म्हणा.

सत्यच्युत[1] जो नर काजा[2] तो मुख्या चुकला, नरका जातो.' ।
या स्त्रीवचनें धार्मिक अडला, रडला राजा, मूर्छित पडला[3]. ॥ ९
प्रभु वरि गुरुच्या[4] सत्यसमवना[5], तापसविप्रापत्यसम[6] वना. ।
गेला **सी**तालक्ष्मणसहित स्वहित[7] त्रिदशमुनिश्रुतिमहित[8]. ॥ १०
निघतां प्रभु, 'हाय!' वदे पुर[9] तें, तापसवृंद[10] हर्षलें पुरतें ।
साक्ष[11] ससाध्वस[12] झाले, झुरतें तम काय तरण्युदयीं[13] उरतें? ॥ ११
सुखवि स्वविरहभीत**गु**हातें[14] जेंवि चकोरा शीतगु[15] हातें; ।
निववी नमुनि **भ**रद्वाजातें[16] म्हणती मुक्तिवरद्वा[17] जातें. ॥ १२
होय **चि**त्रकूटीं[18] सुखवासी, सुख ज्या परमसुखा मुख वासी[19]; ।
वरिला मृत्यु[20] **द**शरथक्ष्मापें[21] शापें[22] प्रियसुतविरहजतापें[23]. ॥ १३
मातुलकुलगत[24] सानुज[25] **भ**रत द्रुत[26] आणविला परमशुभरत. ।
बहु निंदी तो कवि मातेतें, दुःख जिच्या जाड्यें[27] माते[28] तें. ॥ १४
करुनि पित्याचें उत्तरकार्य, प्रभुला शरण जाय तो आर्य[29]. ।
नमुनि म्हणे नत पुरता, 'परतें, स्वपदीं, वारुनि पुरंताप[30], रतें.' ॥ १५
**रा**म म्हणे, 'त्वां म्यांहि करावें गुरुवच, धर्में याचि तरावें.' ।
बोधें तच्छोकातें जिरवी, त्यासि पादुका देउनि फिरवी. ॥ १६
**नं**दिग्रामीं तापस राहे[31], वाहे वल्क[32] जटा, श्रम साहे. ।
लाहे खेद, वदे गी[33] 'हैं[34]!' हे पाहेना वपु नष्ट कि आहे. ॥ १७

---

१. हें अर्ध सुभाषितरूप आहे. २. कामा. ३. हें कारकदीपकाचें उदाहरण आहे. ४. दशरथाच्या. ५. सत्यरक्षणासाठीं. ६. तपस्वी ब्राह्मणाच्या मुलाप्रमाणें प्रभु (राम) वना वरि (वनाला जाण्याचें अंगीकारी.) ७. स्त्रीयांचें हितकर्ता. (राम.) ८. त्रिदश (देव), मुनि आणि श्रुति (वेद) यांनीं महित (पूजित) असा. (राम.) ९. अयोध्यानगर. १०. तपस्वीजनांचा समुदाय. ११. ज्यांना नेत्र आहेत ते. १२. भयसहित. १३. सूर्योदयीं. १४. निषादराजातें. १५. चंद्र. [शीत—थंड—आहे गो (गु-किरण) ज्याचे तो हिमांशु.] १६. अयोध्याकांड—सर्ग ५४ श्लोक ५-९ पहा. १७. मुक्तीचें श्रेष्ठद्वार. १८. प्रयागापासून दहा कोसांवर चित्रकूट पर्वत होता. (सर्ग ५४ श्लोक २८-२९.) १९. पसरी. २०. राम गेल्यावर राजा आठवे दिवशीं मध्यरात्रीं मरण पावला. (सर्ग ६८ श्लोक ११-१२.) २१. राजानें. २२. श्रावणाच्या जनकाच्या शापानें. २३. आवडत्या मुलाच्या (रामाच्या) वियोगापासून उत्पन्न झालेल्या तापानें. २४. मामाच्या घरीं गेलेला. २५. शत्रुघ्नासह. २६. लवकर. २७. मूर्खपणानें. २८. माजे. २९. भरत. ३०. अयोध्या नगरांतील जनांचें दुःख. येथें पुर म्हणजे पुरजन असा अर्थ उपादानलक्षणेनें घेतला पाहिजे. (पृष्ठ १०९-टीप ८ पहा.) ३१. हें कारकदीपकाचें उदाहरण आहे. ३२. वल्कल. ३३. वाणी. ३४. हाय.

प्रभु वंदी अत्रिस, तद्भार्या सीतेतें बहु सुखवी आर्या. ।
शरभंगातें सद्गति दे [1]हा, पूजिति मुनि या करुणागेहा. ॥ १८
[2]दंडकवनगत सत्तापस जे, प्रभु वाराया [3]तत्ताप सजे. ।
प्रभुला दिव्यें [4]कुंभज शस्त्रें दे जैसीं [5]श्रीगाधिज अस्त्रें. ॥ १९
संहरिता [6]सुरशत्रुभटायु तो नमि त्या जो गृध्र जटायु. ।
तातप्रियसखवचनें [7]गोदा पाहे, पावे [8]प्राज्या मोदा. ॥ २०
[9]पंचवटींत वसे [10]कोदंडी रावणभगिनीतें तो दंडी. ।
सबळा तद्बंधु खरा खंडी, दशवदना चिडवी ती [11]चंडी. ॥ २१
श्रीला कनकहरिण खल दावी, ती त्या प्रभुसि धराया लावी. ।
प्रभु त्यातें मर्मीं शर हाणी, आर्तप्रभुपरि ऐकवि वाणी. ॥ २२
होय पतिस भय [12]भावुनि भीता, सौमित्रिस 'धाव' म्हणे सीता. ।
तो सांगे, 'प्रभुला भय नाहीं, अवलोकिसिल कुशळ नयनाहीं. ॥ २३
[13]पीडिल कोण गराक्षसमा या? हे [14]आर्योक्ति न, [15]राक्षसमाया. ।
तो प्रभुबाणें सति! [16]पर मेला, तें वाटे कटु अति [17]परमेला. ॥ २४
[18]सीता कोपें साधुसि दापी, अमृतमयी झाली [19]विषवापी. ।

१. राम. २. हें चित्रकूटासमीपच होतें असें दिसतें. ३. त्या तापसांचा ताप. ४. अगस्त्य. ५. विश्वामित्र. ६. देवांचा शत्रु भट (वीर) जो रावण त्याचें आयु (जीवित). ७. गोदा=गोदावरी नदी. केव्हां केव्हां शब्दाचें समग्र रूप न योजितां त्याचा अवयव योजण्याचा संप्रदाय 'शब्दा अवयवेष्वपि वर्तते' या न्यायानें आहे:—भीम=भीमसेन, सत्या=सत्यभामा, राम=बलराम, इत्यादि. तसेंच पुढील श्लोकांत अशा प्रकारच्या कांहीं शब्दांचा संग्रह केला आहे:—'गोदा गोदावरी नद्यां मथुरा मथुरापुरी । कविकं कविकायां च स्यात्रवेधौ गवेधुका ॥' [शब्दभेदप्रकाश]. ८. पुष्कळ. ९. अगस्त्याश्रमापासून दोन योजनावर पंचवटी होती. [अरण्यकांड–सर्ग १३ श्लोक १४.] ही पंचवटी नाशिकाजवळची नव्हे. गोदावरीच्या मुखाजवळ असावी. १०. कोदंड (चाप) धारण करणारा. (राम.) ११. कोपनशीला. १२. मानून. १३. या गराक्षसमा (गराक्ष=गर (विष) आहे अक्षांत (डोळ्यांत) ज्याच्या तो साप–चक्षुर्विष. समा=सारखा=सापाप्रमाणें तीव्र व उग्र अशा रामाला) कोण पीडा देईल? ही आर्योक्ति न (रामाची वाणी नव्हे.) राक्षसमाया (ही राक्षसाची कपटकृति आहे) हे सति! (पतिव्रते! साध्वि! सीते! वहिनि!) तो पर (शत्रु) प्रभुच्या बाणें मेला. तें (असें लक्ष्मणवचन) त्या परमेला (सीतेला) कटु (वाईट) आहे. १४. रामोक्ति. १५. मारीचराक्षसकपट. १६. शत्रु. १७. अत्युत्कृष्ट जी सीता तिला. १८. सीता रागानें साधुसि (सदाचारसंपन्न लक्ष्मणाला) दापी (दटावी-रागानें बोले). त्यावेळीं असें वाटलें कीं जी (सीता) अमृतमय ती (केवळ) विषाची विहीर झाली. हे पाप्या! लक्ष्मणा! तुझ्या मनांत माझा अभिलाष आहे. खळ दायाद (दुष्ट असा आप्त) गळा कापी. १९. विषाची तळी.

'मदभिलाष[1] धरिसी तूं पापी! कीं खळ दायाद गळा कापी.' ॥ २५
स्वविवेकसुदीपचि मालविला, उटजांतुनि देवैर[2] घालविला. ।
साश्रु शरण गेला अनघाला[3], कवि हो! या कुतुकीं मन घाला. ॥ २६
श्री असुख खळें हरिली लाहे, मायामानुषहरिलीला हे. ।
गृध्र प्रवया[4] बहु, परि सून द्रुत[5] सोडवि, हाका परिसून. ॥ २७
होउनि विरथ श्रीतें सोडी, क्षतविकळहि[6] खळ हात न जोडी. ।
धर्माची मर्यादा मोडी, खड्गें तत्पक्षातें तोडी. ॥ २८
त्या पापें नेतां ती सीता स्वालंकार[7] त्रिभुवनगीता[8] ।
पांचां प्लवगांमध्यें[9] टाकी, तच्छोकें 'हा!' वदले नाकी[10]. ॥ २९
दुष्ट दशानन नेउनि देवी[11] लंकेंत अशोकवनीं ठेवी. ।
लक्ष्मण रडत वृत्त तें सांगे, राम म्हणे, 'हा! भ्रमलिस कां गे?' ॥ ३०
त्या रघुवंशाच्या कलशाला 'हा!' म्हणवी शून्या दलशाला[12]. ।
गमला तो कविला पय शोधी करि बहु शोक विलाप यशोधी[13]. ॥ ३१
प्रभु पाहे विकळा तातातें, 'हाय!' म्हणे, घाली वातातें. ।
तो कथि, 'वत्सा! रावण सीता घेउनि गेला, त्रिभुवनगीता[14].' ॥ ३२
प्रभुच्या भजतां[15] अंका, देहीं[16] सोडी, गुरुता रंका दे हीं[17] . ।
गृध्रा प्रभु निववि निर्वापानें[18], म्हणतें हें सुयश 'निवा पानें'. ॥ ३३
जो धरि वांछुनि घात कबंध, प्रभु त्याचा हरि पातकबंध. ।
बसुनि विमानीं तो कथि रामा, 'सुगळ कपि सखा येइल कामा.' ॥ ३४
होति गदी[19] जन अंगदी[20], शबरी[21] यश सेवुनि कीं जगदीश वरी. ।
गति दे तीस जिला सनकानें गावें त्याच्याही जनकानें[22]. ॥ ३५

---

१. माझ्याविषयीं इच्छा. २. दीर. ३. निर्मळ रामाला. ४. वृद्ध. ५. लौकर. ६. जखम लागून घायाळ झालेला. ७. आपले अलंकार. ८. तीन लोकांत स्तविलेली. ९. वानरांमध्यें. १०. स्वर्गवासी जन. ११. सीता देवी. ['देवी कृताभिषेकायाम्' इति हेमचंद्रः.] १२. पर्णशाला. १३. यशाचा समुद्र राम तो. त्या रघुवंशाच्या कलशाला (श्रेष्ठ पुरुषाला) ती शून्या दलशाला (सीताविरहित पर्णकुटिका) हा (हाय हाय) म्हणवी. तो यशोधा (यशाचा सागर राम) बहु शोक विलाप करि, तेव्हां (सर्वज्ञ असा जो राम हाच कोणी सागर असतांही) तो पय (उदक) शोधी (पाणी शोधीत आहे) असा कविला गमे. १४. पद्य २९ वें यांत ही हाच शब्दसमुदाय आहे. १५. रामाच्या मांडीवर डोकें ठेवतां. १६. मरण पावे. १७. हा राम रंका (गरीबाला) गुरुता (मोठेपणा) दे. १८. पितृप्रीत्यर्थ जें तर्पण त्यानें. १९. रोगी. संसारतापानें रोगी (गदी) झालेले जन अगदी (गदरहित-निरोगी) होती. २०. निरोगी, रोगरहित. २१. हिचें नांव 'श्रमणा' असें होतें. २२. ब्रह्मदेवानें.

जरि बहु रम्या सरसी **पं**पा प्रभुला देती झाली कंपा. ।
**मा**रुतिला दे प्रभुसंग [1]महा **सु**ग्रीवासीं करि संगम हा. ॥ ३६
**सु**गळ सखा दावी श्री**रा**मा **सी**तालंकार घनश्यामा. ।
प्रभु बोले, 'सदलंकारा! हो! स्वस्थ न [2]खळपद **लं**का राहो.' ॥ ३७
**सु**गळ कळवि, 'निष्कारण वैर [3]स्वभ्राता करि, वर्ते [4]स्वैरें.' ।
प्रभु बाणें भेदुनि उर, **वा**लिप्राण हरी, [5]तज्जा कुरवाळी. ॥ ३८
झाला धन्य [6]गतासु गळाला, प्रभु दे राज्य [7]मता **सु**गळाला. ।
कपि पाठविले **श्री** शोधाया, [8]तत्कुशलें [9]वत्सल तो [10]धाया. ॥ ३९
कळवि **ज**टायुबंधु **सं**पाती [11]जी स्वासूंसि म्हणे 'संपा' ती. ।
[12]**मा**रुति शतयोजनजलधीतें लंघी भिववाया [13]खलधीतें. ॥ ४०
**लं**का शोधुनि, चिंता वाहे, मग तीस **अ**शोकवनीं पाहे. ।
तों ये खळ [14]तत्कुवच न साहे, सुज्ञ म्हणे, 'प्रभुयोग्या आहे.' ॥ ४१
देवी बहु धिक्कारी क्षुद्रा, [15]तो जातां, कपि तिस दे मुद्रा. ।
श्री**सी**ता चूडामणि अर्पी, आधीं [16]आशीरमृतें तर्पी. ॥ ४२
[17]**नं**दनवनसें उपवन मोडी, झोडी वीर **अ**क्षशिर तोडी. ।
गोडी युद्धीं बहु, करि खोडी, सोडी न, चमू राहे थोडी. ॥ ४३
**श**क्रजितें ब्रह्मास्त्रें धरिला, दाटुनि सांपडला त्या अरिला. ।
बद्ध करुनि अतिरुष्टा पाशीं ओढुनि नेला दुष्टापाशीं. ॥ ४४
काळाचा अतिबळ वीर गडी अरिला प्रभुबळ कळवी रगडी. ।
'प्रभुरत्न प्रभुला दे, चोरा! हो [18]राख न, [19]राख कुळा, घोरा!' ॥ ४५
इत्यादि कटु न तो खल साहे, घेउनि खड्ग वधाया पाहे. ।
साधु**बि**भीषणबोधें राहे, **मा**रुति म्हणे, 'हाचि बुध आहे'. ॥ ४६
त्याच्या पेटवि खल पुच्छातें, जाळी पुर, रडवी तुच्छातें. ।
[20]मणि देउनि सुखवी **रा**मातें म्हणे, 'दिलें सुख वीरा! मातें.' ॥ ४७

---

१. आनंद, उत्सवा. २. रावणस्थान. ३. वाली. ४. स्वछंद. ५. वालिपुत्र जो अंगद त्याला. ६. गतप्राण. ७. मान्य झालेल्या. ८. तिच्या क्षेमसमाचारानें. ९. कारुणिक. (राम.) १०. तृप्त व्हाया. ११. जी=सीता. 'म्हणे' या क्रियेचा कर्ता. १२. मारुति=मरुताचा (वायूचा) पुत्र. ['इ' प्रत्यय अकारांत शब्दांपुढें गोत्रापत्यार्थी होतो, जसें:—रावण, रावणि. दक्ष, दाक्षि. व्यास, वैयासकि.] १३. दुष्टमति रावणातें. १४. त्या रावणाचें दुष्ट वचन. १५. तो क्षुद्र. (रावण.) १६. आशीर्वादरूप अमृतें. १७. इंद्रोद्यानासारखें मनोहर. १८. भस्म. १९. रक्षण कर. २०. चूडामणि. (पद्य ४२ वें पहा.)

भेटे **राम पवनतनयातें**, केवळ होय अवनत नयातें. ।
प्रभु ऐकवि या स्तव नव संता हें[1] सर तो यास्तव न वसंता. ॥ ४८

मग **सुगळयुतें** त्रिजगद्धटकें नेलीं सिंधुतटा [2]कपिकटकें. ।
तोंचि **बिभीषण** आला शरण, प्रभु दे **लंका** नमितां चरण. ॥ ४९

सेतु समुद्रीं निर्मुनि उतरे, म्हणति कपि, ‘खळा ! न मर्दें [3]उतरे !’ ।
प्रथमचि **सुगळ दशास्या** ताडी, [4]सामार्थ प्रभु **अंगद** धाडी. ॥ ५०

हितबोधें न धरुनि [5]तोखें वळे, [6]सिक्तवृत [7]दहनसा तो खवळे. ।
धरवी धरिती राक्षस या जे ते [8]अहि, दूत **गरुडसा** साजे. ॥ ५१

[9]बुडवाया खळसर्वस्वा हा ‘करिन’ म्हणे ‘बळ सर्व स्वाहा’ ।
[10]समितीच्या कुकवि प्रारंभा करि, ती [11]यां **शुकविप्रा रंभा**. ॥ ५२

प्रभुची शक्तिचमू **गंगा**, तें [12]खलबळ अघ, पावे भंगातें. ।
प्रभुचे प्रसवति बहु शर भाते, न तरति [13]अरिहरि [14]हरिशरभा ते. ॥ ५३

**दशमुखसुत घनरव** [15]मायावी, त्या न जयश्री [16]अधमा यावी. ।
निववी प्रभु जो [17]नागपाशया बांधी घालुनि [18]नागपाश या. ॥ ५४

दुर्मति सर्वा हरिखे, दासी **त्रिजटा श्री**च्या हरि खेदासी. ।
[19]व्यसन उडविलें [20]खगपाळानें [21]तपनें तमसें [22]फणिकाळानें. ॥ ५५

कष्टें [23]**कलशकर्ण** जागविला, **सुगळें** प्राण हरुनि नागविला. ।
प्रभुनें [24]बळ गिळितां लोळविला, **काळचि** परलोका बोळविला. ॥ ५६

---

१. प्रभुचें यश. २. वानरसैन्यें. ३. उतास (माजास) येऊं नकोस. ४. साम (सख्य) करावें म्हणून. [साम हा चार उपायांपैकीं एक उपाय आहे. दान, दंड आणि भेद हे अन्य तीन उपाय होत.] ५. संतोष. ६. शिंपिलें तूप ज्याचे ठायीं असा. ७. अग्नीसा. ८. जे राक्षस याला धरिती ते अहि (साप). ९. हा (राम) खळसर्वस्वा (दुष्टांचें सकल धन—अत्यंत दुष्ट रावणाला) बुडवाया (मारण्यासाठीं) सर्व बळ स्वाहा करिन म्हणे. कुकवि (वेडा रावण) समितीच्या (युद्धाच्या) आरंभा करी; ती (समिती) शुकविप्रा [जशी] रंभा [तशी] या (रामाला) [होय.] ज्याप्रमाणें शुकापुढें रंभेचें येणें निष्फळ झालें त्याप्रमाणें या युद्धाचा आरंभ निष्फळ झाला, त्यापासून रामाला कांहीं अपाय झाला नाहीं. १०. युद्धाच्या. ११. रामा. १२. दुष्ट रावणाचें सैन्य. १३. शत्रुसिंह. १४. हरिरूप (रामरूप) शरभाला. (शरभ हा सिंहाचा शत्रु होय.) १५. कपटी. १६. निकृष्टा. १७. गजेंद्राच्या चित्ताला, अभिप्रायाला. (नागप+आशया=गजेंद्र+मनोरथा.) १८. अहिबंधन. १९. नागपाशबंधनरूप संकट. २०. पक्षिपतीनें. (गरुडानें.) २१. सूर्यानें. २२. सर्पांचा काळ (गरुड) त्यानें. २३. घटकर्ण. २४. सैन्य.

होतां शोक गतक्रिय साधी[1] स्वजनक; घनरव तत्प्रिय साधी[2]. ।
कपटनरा[3] सबळा परमा या प्रभुला मोही, करि पर माया. ॥ ५७

प्रेरी ऋक्षेंद्राची[4] वाणी मारुति ओषधिशृंगचि आणी. ।
तद्वातचि[5] शल्यातें खाणी, या आशी[6] दे प्रभुची वाणी. ॥ ५८

खलसुतबंधुसुभट बहु जपले, प्रलयसमयशिखि[7]विसम तपले. ।
तरि सर्व प्रभुतेजें लपले, दवदहनांत शलभसे[8] खपले. ॥ ५९

मायासीताघातें भारी शोक भ्रम दे सुत्रामारी[9]. ।
सबिभीषण गुरुहृत्प्रियकारी लक्ष्मण त्या खलपुत्रा मारी. ॥ ६०

युद्धारंभीं प्रभुशिर दावी श्रीस दशास्य, रडाया लावी; ।
अंतीं ऐकुनि घनरवपाता[10], घेउनि खड्ग कराया घाता[11]. ॥ ६१

वारी सचिव करुनि यत्नातें, 'न वधीं प्राप्तस्त्रीरत्नातें. ।
म्हण, अहितांसचि मारीन, रतो मन समरमखीं[12], मारीं[13] न रतो.' ॥ ६२

दशमुख देवीपासुनि परते, सैन्यासि म्हणे 'मारा परें[14] ते.' ।
बहुत उसळलीं नवचतुरंगें, क्षमिलें 'हूं' हें न वच तुरंगें. ॥ ६३

झाली समिति[15] हठानें मोठी, प्रभुनें वधिले परें[16] बहुकोटी. ।
वदला प्रभु रुद्रास्त्रीं बळ तें हें तुल्य असें सुज्ञा कळतें. ॥ ६४

परिसे प्रमथन तो उर्वरि[17] तें सैन्यें घे सारीं उर्वरितें[18]. ।
निघुनि करी प्रभु बळतरणातें वांछुनि कोपें जळत रणातें. ॥ ६५

बहु निजपरबळ[19] तो अरि[20] खपवी, तें पाहुनि सोडी हरिख पवी[21]. ।
सोडी शक्ति लक्ष्मणावरि, ती झाली त्यासि बंधूसी[22] वरिती[23]. ॥ ६६

ती हृदयांत शिरे, त्या मोही, 'हाय !' म्हणे शोकें प्रभु तो ही. ।
सोडी खरे[24] शर, अरितें झोडी, जोडी जय, शक्तिसही मोडी. ॥ ६७

मुनि म्हणति, 'दहन[25] न उरवि दारु[26], प्रभुहि तुझें कां न उर विदारु?' ।
तो[27] आणुनि शिखर पुन्हां आला, सौमित्रि स्वस्थ पळें झाला. ॥ ६८

---

१. मनोव्यथायुक्त. २. संपादी. ३. नरदेहधारी (रामाला.) ४. जांबवंताची. ५. त्या ओषधिशृंगाचा वारा. ६. आशीर्वाद. ७. अग्नि. ८. टोळासारखे, पतंगासारखे. ९. इंद्रशत्रु. (इंद्रजित. सुत्रामन्+अरि=इंद्र+शत्रु.) १०. मेघनादनाश. इंद्रजिताच्या वधा. ११. सीतेच्या घाता. १२. युद्धरूप यज्ञांत. १३. मदनाचे ठायीं. १४. शत्रु. १५. युद्ध. १६. शत्रु. १७. मोठा शत्रु. १८. उरलेलीं. १९. आपलें व शत्रूचें सैन्य. २०. रावण. २१. सैन्यनाश पाहून वज्र हरिख (हर्ष आनंद–गर्व) सोडी. २२. स्त्रीसी. २३. वरणारी. ती शक्ति लक्ष्मणाला समरस्वयंवरवधूप्रमाणें वरणारी झाली. २४. तीक्ष्ण, तीव्र. २५. अग्नि. २६. लांकुड. २७. मारुति.

बसुनि हरिरथीं वीरकविवरें श्रीरामें दशकंठ रविवरें ।
ब्रह्मास्त्रें उर भेदुनि वधिला, जो कंटक सद्धृदयामधिला. ॥ ६९
दशमुख निगमशिरःप्रतिपाद्यें वधितां सुर वाजविती वाद्यें. ।
करिति कुसुमवृष्टि प्रभुवरि ते, झाले साधु कवि स्तव करिते. ॥ ७०
गंधर्ववर प्रभुयश गाती, जी स्त्री होय महा वशगा ती. ।
करिति अप्सरा बहुशत नृत्यें, श्रीरघुपतिचीं गाउनि कृत्यें. ॥ ७१
करवी दशवदनोत्तरकर्म, स्थिर बसवि पदीं शिकवुनि धर्म. ।
लेववि आत्मभजनपविवर्म प्रभुवर बिभीषणा दे शर्म. ॥ ७२
दिव्य करी, प्रकटी शुद्धिस ती, प्रेक्षक निववि महाबुद्धि सती. ।
प्रभुनें दशरथवचनें वरिली, सुयशें सुरमुनिकविमति हरिली. ॥ ७३
बसुनि पुष्पकीं राम परतला, जो राज्यसुखीं भरत न रतला, ।
त्यातें भेटुनि बहु निववि, खरी संधा करि, विश्वीं शिवें विखेरी. ॥ ७४
अभिषेक स्वीकारुनि, राजा होय, सुरतरूंसि म्हणे 'लाजा.' ।
पौरांतें देवाधिक 'साजा,' विसरवि रघुसहित पितो आजा. ॥ ७५
नृपतिशतें रघुसिंहास नतें झालीं, वरितां सिंहासन तें. ।
कपिराक्षस बळसह गौरवि ते, गुण गाववि, यश शिव गौर[14] वितें[15]. ॥ ७६
वदला प्रभु निजपदराजीवप्रणता मारुतिस 'चिरं जीव, ।
कीर्तिरत धरी न दरा जीव, प्रिय करि चारु तिसें चिरंजीव.' ॥ ७७

---

१. इंद्ररथीं. २. साधूंच्या हृदयांतील. ३. वेदशिरोवंदनीय रामें. ४. उत्सवा. ५. अप्सरा—ह्या समुद्रमंथनकाळीं अप् म्हणजे उदक यापासून उत्पन्न झाल्याः—'अप्सु निर्मथनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः । उत्पेतुर्मनुजश्रेष्ठ तस्मादप्सरसोऽभवन् ॥' ह्या गंधर्वांगना असून स्वर्वेश्या होत. ह्या इंद्राच्या दासी असून त्याला कोणाच्या तपाचें भय वाटलें म्हणजे तपोभंग करण्याच्या कामीं मोठ्या कुशल, म्हणून त्याच्या आज्ञेनें ह्याच जावयाच्या आणि कार्यसिद्धि करून परत यावयाच्या. उर्वशी, मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा, सुकेशी, मंजुघोषा, इत्यादि प्रमुख सुरवेश्या होत. बाणकवीनें यांचीं चवदा कुळें असल्याविषयींचा उल्लेख 'कादंबरी'ग्रंथांत केला आहे. अप्सरा आपल्या नृत्यविलसितानें विजांस लाज आणतात असें पुराणांत वर्णन आहे. ६. उत्तरक्रिया. ७. रामभजन हेंच पविरूप (वज्ररूप) वर्म (कवच). ८. सुख. ९. प्रतिज्ञा. १०. कल्याण. ११. पसरी. १२. दशरथ. १३. अज. १४. शुभ्र. १५. प्रसवते. १६. आपल्या चरणकमळीं नम्र झालेल्या मारुतीला "चिरंजीव (दीर्घायु हो, अक्षय्य वांच) असें प्रभु वदला. जो जीव (प्राणी) कीर्तिरत (यश मिळविण्याविषयीं रत) असतो भय धरीत नाहीं. १७. भया. १८. त्या कीर्तीला.

प्रभु करि अरिपद परमगती तें, वरिति न कां पद पर मग तीतें? ।
वदलें ज्याचें मुख न वच रितें, विश्वा दावी सुख नव चरितें. ॥ ७८
¹जो रंका दे ²सुषमा नांवें अमृतरसा यत्तुष मानावें ।
त्याच्या शिर नमन सदा चरणा करु, या त्यजु न मन सदाचरणा. ॥७९

## उपसंहार.

(अनुष्टुभ्वृत्त.)

'कल्याणरामायण' हें मयूरें रामनंदनें, ।
वाहिलें रामचरणीं कृतसाष्टांगवंदनें. ॥

---

१. जो (प्रभु—राम) रंका (अनाथाला, भिकाऱ्याला) नांवें (नामस्मरणानें—नामोच्चारण केलें यास्तव) सुषमा (परम शोभा) दे [आणि] ज्या (यत्) [मधुर नांवाचें] तुष (बाहेरील टरफळ) असें अमृतरसा मानावें. (अमृतरसापेक्षांही भगवंताचें नांव मधुरतर आहे—असा भाव.) त्याच्या (त्या प्रभुच्या) चरणा शिर सदा नमन करूं. या सदाचरणा मन त्यजु न. २. अतिशय शोभा.

# मोरोपंतकृत रामायणें.

## भाग तिसरा.

## परिशिष्टें.

### १. पाठभेद.

### ३३. मंत्रगर्भसाकीरामायण.

| साकी. | अर्ध. | पाठभेद. |
|---|---|---|
| | | **बालकांड.** (पृ० २३-२४.) |
| ७ | द्वितीयार्ध | कडवी दृष्टि तयाची, वृद्धा क्षणभरि मोहीं रडवी. |
| १२ | प्रथमार्ध | रात्रदिवस सद्गुण रामाचे वर्णिति हर्षे पौर, |
| | | **सुंदरकांड.** (पृ० २८-२९.) |
| २ | प्रथमार्ध | मैनाकधरा थडकुनि पाडी ठकवुनि सुखवी सुरसा, |
| ९ | द्वितीयार्ध | परिसुनि मधुवनमथन सुखावे मति त्याही आर्यांची. |
| | | **युद्धकांड.** (पृ० ३०-३१.) |
| ४ | प्रथमार्ध | प्रभु तारात्मजदूतमुखें त्या हित कथि तें खळ न गणी, |
| १० | द्वितीयार्ध | गुरु सुखवुनि कपि उठवुनि केली त्रिजगीं कीर्ति स्फीता. |
| ११ | प्रथमार्ध | मग सुममयवरघानिं अधिष्ठुनि कपितेंही बाहुनि घे; |
| ,, | द्वितीयार्ध | परमोत्सवें सलक्ष्मण सीतेसह वेगें राम निघे. |
| १२ | प्रथमार्ध | सकल वृत्त रानीं जें घडलें, तें सीतेला कळवी, |
| ,, | द्वितीयार्ध | भेटुनि भरता तद्दुःखापह पुरजनदुःखा पळवी—किंवा दुसरा पाठ असा आहेः—व्हावें शुचि सुचिरयशें ज्याच्या क्षाळुनि पंका पतितें. |
| १३ | प्रथमार्ध | रघुवर हेमनगावर घनसा, सिंहासनीं विराजे; |
| ,, | द्वितीयार्ध | सेवक मयूर नाचति चातक, सर्व भासती राजे. |
| | | **उत्तरकांड.** (पृ० ३१-३२.) |
| १३ | प्रथमार्ध | प्रांता तारुनि अमरस्तुतगति दे पुरवी श्रितकाम, |

# २. अधिक टीपा.

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | **३२. आर्यारामायण.** | |
| २ | हा (राम), जो मत्त (माजलेला) दशकंठ (रावण) नया (नीतीला) लंघी (उल्लंघी), त्या (त्या दशकंठाला) माराया [जन्मला]–असा अन्वय लावावा. येथें जन्मला, झाला, असे–असें एखादें पद अध्याहृत समजलें पाहिजे. | १ |
| १८ | यमकांतीं अनुस्वारसाम्य नाहीं–गेले–केलें–अशीं पदें आहेत. | ३ |
| १९ | गुह आणि सचिव यांस फार दुःख झालें–असा भाव. | ,, |
| २१ | त्रास मुनीस सोडी–असा भाव. | ,, |
| २६ | सखे दास–सखेदास=ठरींव आवडतें यमक. पद्य ७६ पहा. | ,, |
| ४२ | उत्तरार्ध––दुर्जनदंडीं=दुर्जनास दंड करण्याविषयीं. | ,, |
| ५२ | उत्तरार्ध—सीता मनीं पतिनाशाचा धाक धरी–असा भाव. पतिनाशें=पतिनाश होईल तर, पतिनाशाचा प्रसंग आला असतां. | ४<br>५ |
| ५७ | उत्तरार्ध—सेवकार्या=सेवकश्रेष्ठाला. [सेवक+आर्य=भृत्य+श्रेष्ठ.] | ६ |
| ५८ | पूर्वार्ध—हा पावक (हा अग्निरूप जटायु) या तुपा (या तूपरूप रावणाला) सून (सीता) हरूं देईल काय? नाहीं हरूं देणार–असें उत्तर. पावक तुपाला स्वाहा करून टाकील, जटायु रावणाला ठार करून टाकील. | ,, |
| ६८ | पूर्वार्ध—पोत [स्व]मुखींचा घांस न गिळी, [मग] नवा [घांस] कैसा घेईल–असा अन्वय. रामानें इतका विलाप केला कीं तो ऐकून पोत (हरिणबालक) तोंडांतलाही घांस गिळूं शकला नाहीं, मग नवीन घांस कसा घेईल? अर्थात् घेणार नाहीं. | ७ |
| ७० | सानुज (लक्ष्मणासह राम) वनीं कबंधानें (शापग्रस्त गंधर्वानें) धरिला. तच्छाप (त्याचा शाप) [बाण मारून] हरी (दूर करी). याचा (या रामाचा) अरिही बंधानें (भवरूपबंधानें) न तापे (ताप न पावे, प्रभूचा शत्रुही सद्गति–संसारबंधमुक्ति–पावे). [काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–रामायण–पृ० ३४ श्लो० ११६-११७.] मोरोपंतकृत संस्कृत मंत्ररामायण–युद्धकांड–श्लोक ३५० यांतही असाच अभिप्राय प्रकट केलेला आहे. ‘मृतो रणे मद्विशिखैः पाप! पूतो भविष्यसि’ असा रामाचा रावणास निरोप आहे. | ,, |
| ९० | उत्तरार्ध—प्रथमपुरुषीं कर्मणिप्रयोग. | ९ |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
| --- | --- | --- |
| १०१ | ते नवनवे गाते (ते नवे नवे स्तुतिपाठक वानर) धांवत येउनि (एक एक त्वरेनें येऊन) त्या प्रभुमार्गणगरुडपवनवेगा अंजनातनूजा (रामबाण गरुड आणि वायु यांच्या सारखा वेग ज्याचा अशा त्या सुप्रसिद्ध मारुतीला) आनंदें गाती (आनंदानें स्तवूं लागले, मारुतीची स्तुति करूं लागले.) रामबाण, गरुड आणि पवन यांची वेगाविषयीं सुप्रसिद्धि आहे. [मार्गण=बाण.] | १० |
| १०३ | उत्तरार्ध—मारुति आपलें फार मोठें शरीर सूक्ष्म करून सुरसेच्या शतयोजन मुखांत शिरून बाहेर निघाला. देवांस ही गोष्ट आवडली. | ,, |
| १०९ | पूर्वार्ध—कोठें-कोठें या पदद्वयानें मोठें अंतर सूचित होतें. 'द्वौ क्वशब्दौ महदंतरं सूचयतः' इति रघुवंशटीकायाम्. [रघुवंश-सर्ग १ श्लोक २ टीका.] [हें '**विषम**' नामक अलंकाराचें उदाहरण होय. '**विषमं** वर्ण्यते यत्र घटनाननुरूपयोः । क्वेयं शिरीषमृद्वंगी क्व तावन्मदनज्वरः ॥' [कुवलयानंद-श्लो० ८८.] १ जेथें दोन अननुरूप पदार्थांचा संबंध वर्णिला असतो, २ जेथें कार्यकारणांत अत्यंत भिन्नपणा वर्णिला असतो, ३ जेथें एखाद्या पदार्थास प्राप्त झालेली अवस्था अनुचित असें वर्णन असतें, ४ जेथें इष्टार्थास उद्देशून केलेल्या उद्योगांत इष्टप्राप्ति न होतां अनिष्टप्राप्ति झाल्याचें वर्णन असतें, ५ जेथें अनिष्टप्राप्ति झाली असतांही ती इष्टप्राप्ति समजल्याचें वर्णन असतें, ६ जेथें एखाद्या पदार्थास अन्य पदार्थांच्या योगानें भिन्न काळीं प्राप्त झालेल्या दशेमध्यें फेर दाखविला असतो, तेथें **विषम**' नामक अलंकार होतो. याचीं उदाहरणें:-(१) सूत म्हणे-काय पुससि ? ज्याचें न कधींहि पादतळ मळलें, । तें राजरत्न तैसें जैसें धूळींत याद तळमळलें; ॥ २ ॥ ज्याच्या आंगीं अयुतद्विजबळ ऐसा समर्थ लोकेश, । जो परशतनियमनपटु, नियमी कष्टें करूनि तो केश ॥ ३ ॥ [गदापर्व-अध्याय ९], (२) चित्तीं म्हणे नृप-'अहा चंवरी ती झाडणीच कीं केली; । मोलविक्यानें काष्टें फोडाया असिलता वनीं नेली.' ॥ ७८ ॥ [आदिपर्व-अध्याय १३], (३) ती मृदुल प्रकृति कसी दुःसह शोकज्वरासि साहेल ? । राहेल सासु कैशी ? कोणाच्या आननासि पाहेल ? ॥ ९ ॥ [ऐषिकपर्व-अध्याय १], (४) पांचांसहि जो जिंकी सोडुनियां कुरुसभेंत अक्ष महा, । एकासि शकुनि मामा जिंकाया काय आजि अक्षम हा ? ॥ ५१ ॥ [विराटपर्व-अध्याय ४], (५) त्यास क्रव्याद जपति, होते बहु जपत ज्या सदा ज्ञाती; । गेली | |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | कोठें गा! ती शक्राचीशी तुझी सदाज्ञा ती? ॥ १० ॥ दुःशासनादि सोदर कोठें? कोठें तुझा सखा कर्ण? । कोठें शकुनि? जयद्रथ? ज्या भाग्य तुझें, जसें झषां अर्ण; ॥ ११ ॥ कोठें छत्र तुझें तें? बा केलीं आजि काय तीं चवरें? । गमति उतरलीं विधिच्या जीं गगनांतूनि आयतींच वरें ॥ १२ ॥ [गदापर्व–अध्याय १०], (६) पडला शात्रव-शस्त्रें समरांत स्यमंतपंचकीं काय; । कां करितां शोक उगे? पडलों रोगार्त मंचकीं काय? ॥ १३ ॥ पावे अनंतसुकृतें क्षत्रिय समरांत काय-हानि बरा; । होइल वांचोनि सुचिर रुचिर गृहीं लाभ काय हा निबरा? ॥१७॥ उरलें तेज, अधर्में वधिला धार्मिक परें बरें झालें; । आलें मनासि माझ्या तीक्ष्णहि परि पथ्य हें, जसें आलें; ॥ १८ ॥ मेलों बहु भाग्याच्या मी निहतज्ञातिबांधव स्पष्ट; । उरतों, शोकें झुरतों, स्वजनवियोगा असें नसे कष्ट' ॥१९॥ [गदापर्व–अध्याय १०], (७) कोठें दरिद्र हा मी कोठें लक्ष्मीनिवास तो स्वामी । आलिंगिलें भुजांहीं प्रेमें वक्षस्थळीं रमा धामीं ॥ ३९ ॥ [वृहद्दशम–उत्तरार्ध–अ० ८१ आ०३९ पृ० २३२], (८) मदनशत्रु शरासन हें महा मदनमूर्तिच केवळ राम हा । करिल सज्य कसा धनु आपण अहह दारुण तात! तुझा पण. ॥ [वामनपंडित कवितासंग्रह–भाग १ पृष्ठ १३ सीतास्वयंवर], (९) ताता! मी अजुनी निपुत्रिक असें या हेतुनें शाप हा माता वाटतसे, कृपा मजवरी केली तुम्हीही महा । अंतीं भूमिस जाळितो परि पुढें धान्यें बहू पेरितां, येतें पीक तिच्यांत थोर हित हें होतें जसें तत्वतां ॥ ८० ॥ [रघुवंश मराठी–सर्ग ९], (१०) जो राजसुत दुकूली सूष्णीषी चंदनागदी गेहीं । वल्की जटी फलाशी मिरवी भस्मांगराग तो देहीं. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें भाग २–अष्टमस्तोत्ररामायण–गी० २१ पृ० ६०]. या अलंकाराविषयीं 'अलंकारमीमांसा' (पृष्ठ ४३-४६) नामक पुस्तकांत बरेंच विवेचन आहे तें अवश्य पहावें. **काव्यमाला**–अंक ११० यांत या अलंकाराविषयीं सलक्षण आणि सोदाहरण प्रतिपादन आहे. तें वाचकांच्या सोईसाठीं येथें देतों:–(अथ विषमम्–) घटनानर्हयोर्यत्र घटना विषमं मतम् । क्वेयं कनकवर्णाङ्गी सुन्दरी कामिनीमणिः । क्व पतिस्तादृशो वक्रः कीदृशी घटना विधेः ॥ १२१ ॥ हेतोर्विरूपकार्यस्योत्पत्तिश्च विषमं मतम् ॥ सितान्कटाक्षान्स्रजति नेत्रमिन्दीवरप्रभम् । इष्टार्थोद्यमतोऽनिष्टप्राप्तिश्च विषमं मतम् । मार्ष्टुं कलङ्कं शीतांशुर्मुखं सोऽजनि सुभ्रुवः । तत्रापि ति- | |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|

लकव्याजात्कलङ्कक्लेशमन्वभूत् ॥ १२२ ॥ इष्टार्थोद्यमनाद्यत्र नेष्टानाप्तिश्च केवलम् । अनिष्टस्याप्यवाप्तिश्चेदपरं विषमं मतम् ॥ पाञ्चालीसङ्गसंमोद-काङ्क्षया रङ्गमन्दिरम् । प्रविष्टः कीचकस्तत्र सद्यो मर्दनमन्वभूत् ॥१२३॥ परानिष्टार्थमुद्योगात्स्वानिष्टाप्तिश्च तन्मतम् ॥ दिधक्षन्हनुमत्पुच्छमन्वभू-त्स्वपुरक्षयम् । [श्रीकृष्णविरचिता मन्दारमरंदचम्पू–१० व्यंग्यबिन्दु–पृष्ठ १३२]. उडती=मनांत दम धरून धैर्यानें राहते, रामाच्या तेजीवर उड्या मारून आहे, रामाच्या तेजावर हिच्या उड्या आहेत. रामतेज आपलें रक्षण करील असा भरंवसा धरून आहे. १०

११२ कोटिप्रभु=कोटिजनांचा प्रभु (स्वामी) रावण त्याला निंदी. ११

१२५ अरिंनीं (राक्षसांनीं) तसेंचि (पुच्छ पेटविणें इत्यादि) केलें. कीश (असें मूर्खपणाचें कृत्य केलें म्हणून मारुति) मनीं (मनांत–उघडपणें नव्हे) हांसे. तो दुष्ट (रावण) स्पष्ट [हांसे]. [मग] मृत्यूचे फांसे न गणु-नियां सेना कां हर्षेना ?=मग मृत्यु कसे फांसे टाकतो हें न समजून, सेना हर्ष कशी पावणार नाहीं ? अर्थात् हर्ष पावेल. हा **लोकोक्ति** अलंकार होय. 'तो दुष्टधी कर चोळी' असें (पद्य १२६) पुढील आर्येंत आहे, तेंही ह्याच अलंकाराचें उदाहरण समजावें. भीम तयासि पुसे, 'तूं कोण बळी ? करिशि काय हा कवळ । मद्गति हे, अन्याचें येथें मारील काय हाक बळ ?' ॥ ३ ॥ यांत '**लोकोक्ति**' नामक अलंकार आहे. जेथें लोकप्रवादाचें अनुकरण होतें तेथें '**लोकोक्ति**' नामक अलंकार होतो. याचें लक्षण:—'लोकप्रवादानुकृतिर्लोकोक्तिरिति भण्यते' [कुवलयानंद–१५५]. 'हे सखि ! डोळे मिटून कांहीं महिने सहन कर' या वाक्यांत 'डोळे मिटून' हें प्रसिद्ध लोकवादाचें अनुकरण आहे म्हणून यांत '**लो-कोक्ति**' अलंकार आहे. 'कर्ण म्हणे:–सन्माता तोकीं सुख व्हावया असु खरचिती । किंवा नेत्रें झांकुनि व्हाया सुख आपणा असुख र-चिती ?' ॥ [उद्योगपर्व–अ० ११ गी० २०] हें **लोकोक्तीचेंच** उदा-हरण आहे. १२

१२७ मारुति म्हणे:—[हे] दहना ! (हे अग्ने !) बिभीषणगृह रक्षीं, (बिभी-षणाचें घर राख, तें जाळूं नको) सुतासि वर कडबा दे (मी जो सुता-सारखा (मुलासारखा) त्या मला–मारुतीला कडबा वर दे–तृणासारखा तुच्छ असा बिभीषणगृहरक्षणरूप वर मज सुतास दे) लंकेसि (तसेंच) बा ! [दहना !] वरकड सर्व तुज करीं दिधलें (बिभीषणाचें गृह सोडून

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | लंकेसह वरकड सर्व तूं जाळ) [कडबा वर दे=कडब्यासारखा–तृणासारखा तुच्छ असा बिभीषणगृहरक्षणरूप वर दे]. | १२ |
| १६० | सुत बंधु आणि सचिव हे सर्व मरण पावले. फक्त एक मत्त मायावी मेघनाद बाकी उरला. तो म्हणेः–'रघुसत्तमा सोडुनि सीता पितृकरा यावी.' रामाला सोडून सीतेनें रावणाला वश व्हावें असें मेघनादाच्याही मनांत होतें व तदर्थ त्याचे प्रयत्नही चालले होते. | १५ |
| २२४ | [अन्यत्र] बहु सुखी प्रजा कोठेंही न पाहे [असा जो] अज (ब्रह्मदेव) [तो] याच्या रामरायाच्या राज्यांत [बहु सुखी] [व] अजरामरा (जरामरणहीना अशी) प्रजा पाहे व [तिला] धन्या [असें] सदा वर्णी (स्तवी). रामराज्यांतल्याप्रमाणें इतर कोठेंही प्रजा सुखी जरामरणहीन अशी आठवली नाहीं म्हणून अज (ब्रह्म) तिला धन्या असें स्तवी. [या पद्यांत 'अज' म्हणजे ब्रह्मदेव असा अर्थ ग्रहण करावा किंवा 'अज' (विष्णु–जन्मरहित) हें पद रामराय याचें विशेषण करून 'अजरामरायाच्या' असें एक पद करावें.] | २० |
| | ## ३३. मंत्रगर्भसाकीरामायण. | |
| | क्षत्रियमार्ग वहाया लागे=क्षत्रियधर्म सुप्रभावानें जगांत वृद्धि पावूं लागला. परशुरामाचा उपद्रव नाहींसा झाला तेव्हां क्षत्रिय निर्भय झाले हें युक्तच झालें. | २४ |
| १२ | उत्तरार्ध—यांत **विभावना** अलंकार झाला आहे. याचें लक्षणः–'विरुद्धात्कार्यसंपत्तिर्दृष्टा काचिद्विभावना । शीतांशुकिरणास्तन्वि! हंत! संतापयंति माम् ॥' (कुवलयानन्द), 'विभावना विनापि स्यात्कारणं कार्यजन्म चेत् । अप्यलाक्षारसासिक्तं रक्तं तच्चरणद्वयम् ॥' (काव्यप्रकाश). जेथें कारणाविना कार्य उत्पन्न होतें अथवा जेथें विरुद्ध पदार्थापासून कार्याची उत्पत्ति होते तेथें हा **विभावना** अलंकार होतो. येथें गौर यशाची उत्पत्ति गौरत्वविरुद्ध जें श्यामत्व तद्विशिष्टमूर्तीपासून झाली असें मानिलें आहे. गौर यशास उत्पादक कारण श्याममूर्ति असें येथें गृहीत आहे. केलें याचें अन्य उदाहरणः—'आला प्रकाश नेत्रीं, अंधत्वाचा वरें तुरे गंध. । परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध. ॥ ९३ ॥' या अलंकारास **विरोधाभास** असेंही म्हणतां येईल. 'आ- | |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | भासत्वे विरोधस्य विरोधाभास इष्यते.' जेथें विरोधाचा भास मात्र व्हावयाचा पण खरोखर विरोध असावयाचा नाहीं, तेथें विरोधाभास हा अलंकार होतो. येथें श्यामलमूर्तीपासून गौरयशाची उत्पत्ति लिहिली हा विरोध, यशःप्रसूतीचा संबंध रंगाशीं नसून मूर्तीशीं आहे आणि ती समर्थ आहे हा परिहार. या पद्यांत 'यश' यापुढें 'प्रश्न' आला असून 'श' ला गुरुत्व 'प्रन्हे वा' या सूत्रानें आलें नाहीं. 'रह्युक्ताक्षरात्पूर्वं रयुक्तात्कुपुवर्णतः । पूर्णं वर्णं विकल्पेन गुरुं केचित्प्रचक्षते ॥' असा नियम 'मंदारमरंदचंपू'नामक ग्रंथांत आहे. [मंदारमरंदचंपू–११ शेषबिंदु–पृ० १६१ काव्यमाला अंक ११४.] तसेंच मंत्रगर्भसाकीरामायण (पृष्ठ २६) अरण्यकांड–साकी ७ यांत 'हरि प्रभुच्या' येथें 'रि' ला गुरुत्व नाहीं. अशीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत क्वचित् आढळतात. | २४ |
| ५ | उत्तरार्ध—'नमुनि' या ठिकाणीं शुद्ध पाठ 'नमन' असा कदाचित् असेल. गुरुसि नमुनि (बापाला नमस्कार करून) महित (पूज्य, सन्मानित) करि. [गुरुसि] पुसुनि [व] अहित लक्षुनि (शत्रु रावणाविषयीं आपणास काय कर्तव्य आहे हें मनांत आणून) वनपथ धरि (अरण्याचा मार्ग सेवी). 'नमन' असा पाठ घेतल्यास अर्थ सरळ आहे. | २५ |
| ८ | आजवल=आजा+आलय=आर्य (आजा)+आलय=आजोळ. | ,, |
| ६ | प्रभु, जो खर राक्षस त्या जनस्थानींच्या सवळा वधी, ती जनस्था (लोकांत असणारी) आधि (मनोव्यथा–चिंता अशी शूर्पणखा) त्या नीचा (रावणाला) सीताहरणा प्रेरी–असा अन्वय. | २६ |
| ११ | उत्तरार्ध—**अर्थांतरन्यास** नामक अलंकार. | २७ |
| १३ | उत्तरार्ध—**लोकोक्ति** नामक अलंकार. | २९ |
| ३ | उत्तरार्ध—**उपमा** नामक अलंकार. ही उपमा फार चांगली साधली आहे. उपमा अलंकाराचें राजशेखरानें 'अलंकारशिरोरत्नं सर्वस्वं काव्यसंपदाम् । उपमा कविवंशस्य मातैवेति मतिर्मम ॥' असें जें वर्णन केलें आहे तें यथार्थ होय व त्याचा प्रत्यय अशा सुंदर पद्यांवरून सहज येतो [अलंकारशेखर–पृ० ३२]. पंतांच्या ग्रंथांत अनेक मनोहर उपमा आहेत. यांच्यापैकीं कांहींचा स्थलनिर्देश करतोः—मंत्ररामायण–युद्धकांड–गीति ७४२-७४३ पृ० १५३, गीति ७२१ पृ० १५१, गीति २४२ पृ० १०८, अष्टम स्तोत्ररामायण–गीति ७३ पृ० ६५. अशीं स्थलें शेंकडों असल्यामुळें त्यांचा निर्देश करण्याच्या भरीस पडत नाहीं. | |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ६ | उत्तरार्ध-**रूपक** नामक अलंकार. | ३० |
| १२ | आठां पुत्रां=मंत्ररामायण-उत्तरकांड-गीति ३७४-३७७ पृ० २००-२०१ पहा. | ३२ |

## ३४. पंचशतीरामायण.

१ उत्तरार्ध—यांत **सहोक्ति** नामक अलंकार झाला आहे. याचें लक्षण:- 'सहोक्तिः सहभावेन कथनं गुणकर्मणाम्' (दण्डी-काव्यादर्श), 'सहोक्ति सहभावश्चेद्भासते जनरंजनः । दिगंतमगमत्तस्य.कीर्तिः प्रत्यर्थिभिः सह ॥' (काव्यप्रकाश). याचीं अन्य उदाहरणें-(१) मारुनि रावण त्याचे दार तदस्रेंकरूनि न्हाणून । गेल्या निजकीर्तिसह श्रीमन्सीतासतीस आणून ॥ [वनपर्व-अ० ११ गीति ६३ पृ० १५९ काव्यसंग्रहग्रंथमाला], (२) माझ्या यशासवें ते सीता नेली दशाननें रामा! । ऐसें वदोनि, पावे अ-न्यजनालभ्यनित्यनिजधामा. ॥ [मंत्ररामायण-अरण्यकांड-गी० ८७ पृ० ६२], (३) जनरावण रावण तो सौमित्रिस त्याच शक्तिनें ताडी; । दुःखार्त देवलोचनजलवृष्टिसह क्षमातळीं पाडी. ॥ [मंत्ररामायण-युद्धकांड-गीति ६५२ पृ० १४५], (४) तेव्हां सुगलमरुत्सुतलक्ष्मणतारासुतादि वीर-मणी । म्हणति, 'विभो! भेटेल क्षितिजेसह कीर्तिही नवी रमणी ॥' [मंत्ररामायण-युद्धकांड-गी०४२ पृ० ९१], पंपेची श्री पाहुनि राम म्हणे लक्ष्मणास 'कां मातें । सीता टाकुनि गेली स्नेहासह काननीं सकामातें. ॥ [मंत्ररामायण-किष्किंधाकांड-गीति १ पृ० ६४]. ०२

४६ पूर्वार्ध—रूपकालंकार. ,,

७८ पूर्वार्ध—यत्तत्व कथाया पुरति (पुरे होतील) असे रव (शब्द) पुराणां (पुराणग्रंथांला) न योजति (योजवत नाहींत)=ज्याचें वर्णन यथार्थत्वानें करण्यास पुरे असे शब्द पुराणांना योजतां येत नाहींत. ४१

८६ 'कपटप्रेमवती ती विदरी बरवींहि प्रभुसि नको' [ही गोष्ट दृष्टांतानें कवि दृढ करितात]-कोविदरीती (कोविदस्य विचक्षणस्य रीतिरिव रीतिः येषां ते) हंस साररुचि नसतां वरिली [रुचि] न गाते-असा अन्वय. नटून मुरडून वरवर सुरेख दिसणारी कपटप्रेमवती ती राक्षसी प्रभुस (रामास) रुचली नाहीं. [याला दृष्टांत]-कोविदरीति (सारासारविवेचन-समर्थ) हंस खरी शोभा ज्यांत नसून नुसती वरपंगी शोभा आहे अशा

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | पदार्थांवर भुलत नाहीं–असा अर्थ. विदरी=विद्री=वेडीवांकडी, कुरूप, बेढब. | ४२ |
| ८८ | प्रभुवर म्हणेः–‘[हे] पुरुष सुंदरि! तूं मदनुजासी वरीं; या सुरतरुकुसुमें तें पुरुषांतरकुंद रितें पाडावें–असा अन्वय. [हे] सुंदरि! तूं मदनुजासी पुरुष (नवरा, वर) वरीं; या सुरतरुकुसुमें (या लक्ष्मणरूप कल्पवृक्षकुसुमानें) तें पुरुषांतरकुंद रितें पाडावें–असा अन्वय केला तरी चालेल. या लक्ष्मणापुढें इतर कोणाही पुरुषाची मातब्बरी नाहीं–असा भाव. या लक्ष्मणाचा अंगीकार केल्यानें इतर सर्व पुरुष फिके पडतील–असा भाव. | ,, |
| ९८ | तद्भर्त्यानें हे (मी) विनासा केल्यें–प्रथमपुरुषीं कर्मणिप्रयोग. | ४४ |
| १०४ | उत्तरार्ध—तो दुष्ट मारीचराक्षसही धन्य होय, कारण तशा मरणसमयीं तो ‘आई गे! बाबा हो!’ असें तोंड वासून रडला नाहीं, तर त्याच्या मुखीं प्रभुनामच आलें. | ४५ |
| ११० | जो (रावण) हरिच्या (इंद्राच्या सभयें कानें आयकिला (भयभीत कानानें आयकिला) तो (रावण) तों (इतक्यांत) श्रीतें हरि (सीतेला घेऊन जाई) ज्या रावणाचें नांव ऐकतांच इंद्रानें भयाभीत व्हावें अथवा इंद्राला भीति वाटते तो रावण सीतेला हरी. | ,, |
| ११२ | उत्तरार्ध—[सीतेला] सोडवि [व रावणाला] म्हणेः–अरे! (रावणा!) [तुझीं] अंडीं शोधूनि [त्या अंड्यांतें] [मी जटायु] कां न भाजीन? (त्या अंड्यांचें मी कां भस्म करून टाकणार नाहीं?) [रावणाला ही जटायुपक्ष्याची स्वजातिसामान्य शिवी असावी असें दिसतें] याहून अन्य संभवनीय अर्थ दिसतो तो असाः—अरे रावणा! तुला अंडीं (ब्रह्मांडीं) शोधून मी भाजणार नाहीं कां? | ,, |
| १२१ | उत्तरार्ध—न रुसाविच जनकजा (सीता कधीं रुसत नसे किंवा रुसावयाची नाहीं) [व] दासहि चुकतां (दासाच्या हातून चुकी झाली असतां) [त्याला ती जनकजा] गतकुत्स (अनिंद्य, निंदारहित, प्रशस्त असें) वदे. दासाची चुकी झाली तरी सीता त्याला कधींही वाईट बोलत नसे. | ४६ |
| २२५ | उत्तरार्ध—द्वितीयपुरुषीं कर्मणिप्रयोग. | ५८ |
| २३० | उत्तरार्ध—**अर्थांतरन्यासालंकार.** | ,, |
| २३१ | जेव्हां कपिवर सैन्यें (सैन्यानें) लंकेला वेढी (वेढा घाली) [तेव्हां तो वेढा] कोट (किल्ल्याचा तट असतो तसा) गमला (भासला). [त्या प्र- | |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | संगीं] ढीग (वानरसेनेचे समूह) बरवे (शोभायमान असे) न दिसती, तरि मला बरवे ढीग दिसति [असें] ती (लंका) म्हणे. ढीग हा शब्द वानरसमूहाला पंतांनीं अन्यत्रही लाविला आहे. 'ते ढीग वानरांचे अवलोकुनि जाहली पुरी वेडी' [काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें भाग १–मंत्ररामायण–युद्धकांड–गीति २८० पृ० १११]. ज्या वेळेस त्या कपिश्रेष्ठ सुग्रीवानें आपल्या सैन्यानें लंकेला वेढा घातला, त्या वेळेस ती लंका म्हणाली:—मला (हा वानरसैन्याचा) वेढा कोट आहे असें वाटतें. [हे वानर] (रूपानें) बरवे (सुंदर–शोभायमान असे) दिसत नाहींत, तरी हे माझ्याभोंवतीं बरवें (चांगले) ढीगच घातले आहेत असें मला वाटतें. | ७० |
| ३२७ | मारुतिचा गडी (सोबती) वरवीर (श्रेष्ठ वीर) अंगद (रावणाला) प्रभुची (रामचंद्राची) आज्ञा कथी. तो अरिचा भंगद (शत्रुपराभव करणारा) अंगद आपली वरवी शक्तिही प्रकटुनि (आपलें उत्तम धैर्य प्रकट करून) त्या रावणास रगडी (पराभूत करी, धाक दावी, दंडी). | ७१ |
| ३४१ | यांत शृंगार आणि वीर यांचें संमिश्रण आहे. | ७२ |
| ३९४ | उत्तरार्ध—रामांकीं सीता बसली ती घनीं अकंपा शंपा असि किति (लोक) शंका वरिती–यांत अकंप शंपेची भ्रांति लोकांस झाली आहे तेव्हां येथें भ्रांत्यलंकार जाणावा. | ७९ |
| | **३५. दोहारामायण** (प्रथम). | |
| ४ | उत्तरार्ध—तो (सुप्रसिद्ध) प्रिय (आवडता) नयज्ञ (नीतिज्ञ रामचंद्र) लक्षु (ध्यानांत धरो म्हणून) ज्या आधि (ज्या पीडा) राज्या (राज्याला असतात त्या) (रामाला) गुरु (विश्वामित्र) कथि (निवेदी). | ९४ |
| ५९ | उत्तरार्ध—विश्व उत्पन्न करणारा राम मारुतीनें सागरोल्लंघन करून आणलेली सीताविषयक वार्तासुधा अत्यादरें श्रवण करी. | ९९ |
| ६० | अन्वय–राम पवनतनयास अत्यादरें आलिंगी, जैसा अवनत मेरु स्तव करितां भरें न यास तैसा. अर्थ:–(रामचंद्राच्या पायीं) नम्र झालेल्या मेरुपर्वतानें स्तुति करतांना याला जितक्या प्रेमानें आलिंगन दिलें नाहीं तितक्या प्रेमानें रामचंद्रानें मारुतीला अत्यादरानें आलिंगन दिलें. अथवा रामचंद्रानें मारुतीला अत्यादरानें आलिंगन दिलें. इतकें कीं त्याच्या (रामाच्या) चरणीं नम्र झालेला जो मेरुपर्वत त्यानें सुद्धां इतक्या आदरानें त्यास आलिंगन दिलें नाहीं. | ,, |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ७७ | पितृमतीस (बापाचे-रावणाचे बुद्धीला) चळो (भ्रष्ट हो, चंचल हो) असें कुमतिस्वापत्याग म्हणतें. | १०० |
| | **३६. दोहारामायण** (द्वितीय). | |
| २२ | पूर्वार्ध—क्रियागत मध्यदीपकालंकार. | १०६ |
| ३० | राम म्हणतोः-न दिसे (प्रिया सीता दिसत नाहीं) या उटजाबाहेर नसे? (त्या उटजाच्या बाहेर तर नसेलना?) [या समयीं लक्ष्मण रामाला वारा घालीत होता.] यांत पुरे (वारा पुरे कर), बा लक्ष्मणा! तूं माझ्याजवळून उठ, (उटजाच्या) आंत जा आणि प्रिया (सीता) हेर (पहा.) | ,, |
| ३७ | उत्तरार्ध—विरह संपाया धृति (रामाचें धैर्य नष्ट करण्यासाठीं) ताप उठवुनि (ताप उत्पन्न करून) कंपा दे (कांपविता झाला). विरह कंपा दे—असा प्रयोग. | ,, |
| ४७ | उत्तरार्ध—तो पिसा (वेडा रावण) हतभविक (नष्टकल्याण असा, कल्याणप्राप्तीनें सोडलेला असा) सतीमुखें (सीतेच्या मुखानें) रेंच उतरूनिघे (आपली अप्रतिष्ठा करून घेता झाला) रेंच उतरणें=रेंच मोडणें, खोड मोडणें, नाककाटणी करणें, कद्द जिरविणें, गर्वपरिहार होई अशी खोड मोडणें=To take the conceit out of. रेंच उतरणें हा शब्दप्रयोग पंतांनीं अन्य ठिकाणींही योजिला आहे. [अश्वमेधपर्व-अध्याय ५।१२, वनपर्व-अ० ११।३२, सभापर्व-अ० २।३९, आदिपर्व-अ० १८।७२, उद्योगपर्व-अ० ८।७२; मोरोपंत-उद्योगपर्व-पृ० १३५-१३६ टीप ९ पहा.] | १०७ |
| ५८ | पूर्वार्ध—यांत **'लोकोक्ति'** नामक अलंकार आहे. कास घालणें ही लोकोक्ति आहे. (अधिक टीपा मागें आर्यारामायण-गी० १२५ पहा.) | १०८ |
| ५९ | रामानें दशवदनाचे सचिव आणि पुत्र मारिले तेव्हां असें झालें. विभुजयपद्मभ्रमरांत (विभूचा-रामाचा जय हेंच पद्म-कमल-त्यांतील भ्रमर भुंगे जे) अमर त्या अमरांत (देवांत) तनन (गान) होय. | ११० |
| ६४ | उत्तरार्ध—रावणाची दुर्दशा नाकाला (स्वर्गातील देवांलाही) न सोसे (सहन झाली नाहीं, रावणमरणानें देवांनाही क्षणमात्र वाईट वाटलें.) | ,, |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | **३७. सौम्यारामायण.** | |
| ३० | चतुर्थचरण—रणभवयश=रणांत मिळणारें यश=जयश्री. | ११७ |
| ३५ | अन्वयः–वाद्यें नृत्यें गीतें झालीं. तत्सन्नादें पापें भीतें (झालीं). नतिहुन नुति बहु न, बुधवर भगवदपचिति ती गुरुतर तपचि समजति. अर्थः–त्या वेळीं लोकांनीं वाद्यें वाजविलीं, नाच गाणीं केलीं. त्याच्या चांगल्या नादानें पातकें भिऊन गेलीं. 'नति'पेक्षां 'नुति' कांहीं अधिक नाहीं. म्हणजे या दोन शब्दांचा अर्थ एकच आहे. श्रेष्ठ लोक भगवंताची पूजा हीच मोठी तपश्चर्या समजतात. | ,, |
| ४२ | उत्तरार्ध—वनमधुशमधनजनहृदयभवन जो राम तो भजकमन निववि, भुवन रुचिर करि–असा अन्वय. वन म्हणजे अरण्य हें ज्यांना मधुप्रमाणें वाटतें [मुंगीला जसा मधु म्हणजे मध प्रियकर–मुंगीला मध सोडून जाणें जसें आवडत नाहीं तसें ज्यांना अरण्य सोडून जाणें आवडत नाहीं–असा भाव.] असे जे शमधनजन–शांतमुनीजन–त्यांचें हृदय हेंच आहे भवन–वसतिस्थान ज्याचें असा जो राम तो भजकमन निववि. मुनिजन हे सदोदित रामाचें ध्यान करून त्याची मूर्ति आपले हृदयमंदिरांत धरून ठेवितात म्हणून त्यांचें हृदय हें रामाचें भवन–घर–असें म्हटलें आहे. या अर्थाच्या योगानें मुनिजनांचा विशेष गौरव केल्यासारखा होऊन अर्थ सरस दिसतो. | ११८ |
| | **३८. कल्याणरामायण.** | |
| ३५ | जें यश सेवुनी, गदी जन अगदी होती–तें यश सेवुनि शबरी जगदीशातें वरिती झाली–जीला सनकानें गावें इतकेंच नव्हे तर त्याच्या जनकानेंही गावें. कीं अशी तीस (शबरीस) जगदीश गति देता झाला. | १२ |
| ४८ | राम पवनतनयातें भेटे. नयातें (विष्णूतें) भक्त जसा तद्वत् केवळ (अत्यंत) अवनत (नम्र) होय. (पृष्ठ ९९ पद्य ६० यांतही 'अवनत नयास' असाच शब्दसमुदाय आहे) त्या (मारुति) वसतां (सुखानें ज्याचे ठायीं वास करावा अशा मारुतीला) प्रभु (राम) स्तवन ऐकवी; संतां (साधुजनांला भगवद्भक्तांस) तोयास्तव (अमृतरूप उदकप्राप्तीकारणें) हें प्रभूचें यशरूपी) नव सर (नूतन सरोवर) होय. | १२ |
| ५२ | सर्व बल स्वाहा करिन=आपली सर्व शक्ति खर्चीन आणि जय मिळवीन. | ,, |

| पद्य. | पद्यांचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ६६ | रावण मेला तेव्हां पवीला आनंद झाला असें वर्णन आहे. या प्रसंगीं रावणाचा पराभव होणें अशक्य असें वाटून पवीला दुःख झालें.[पृ० ३० साकी ८; पृ० ११७ पद्य ३४ पहा.] | १२५ |
| ६७ | उत्तरार्ध—यांत '**कारकदीपक**' अलंकार आहे. | ,, |
| ७५ | उत्तरार्ध—यांत 'अधिक' नामक अलंकार आहे. जेथें एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाचें आधिक्य वर्णिलें असतें तेथें '**अधिक**' अलंकार होतो· याचें लक्षण:-(१) आश्रयाश्रयिणोरानुरूप्यमधिकम्. [अलंकारसर्वस्व-पृ० १३४.], (२) महतोर्यन्महीयांसावाश्रिताश्रययोः क्रमात् । आश्रयाश्रयिणौ स्यातां तनुत्वेऽप्यधिकं तु तत् ॥ १२८ ॥ [काव्यप्रकाश-पृ० ७८८], (३) आधाराधेययोरन्यतरस्यातिविस्तृतत्वसिद्धिफलकमितरस्यातिन्यूनत्वकल्पनमधिकम्. [रसगंगाधर-पृ० ४५३], (४) आधारादाधेयस्याधिक्येऽधिकम्. [काव्यानुशासनम्], (५) अधिकं पृथुलाधारादाधेयाधिक्यवर्णनम्. [कुवलयानंद-९४], याचीं उदाहरणें:—(१) गाधिज रामाकरवीं मार्गी गौतमसतीसि उद्धरवी, । मानी तत्पादास स्वकरसहस्रापरीस शुद्ध रवी. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला-वनपर्व-अ० १० गी० ४९ पृ० १४४], (२) लक्ष्मण निघे पदाधिक जाणुनि तत्पादसुपरमाणूस । त्यजिल गुरुभजन कैसें हें आयकिल्याहि उपर माणूस? ॥ [वनपर्व-अ० १० गी० ६७ पृ० १४६], (३) जो पीडिला रडविला देउनि माथां स्वराज्यभर तातें । तदधिक कसा नव्हे प्रभु जो दे सुख हरुनि भार भरतातें? ॥ [वनपर्व-अ० १२ गी० १४५ पृ० १९०], (४) न तसा स्वतातघातें, झालों मी तप्त जेंवि तव घातें; । शिशुसख्य आमुचें जें जाणे क्षितिवरिल लोक अवघा तें. ॥ [गदापर्व-अ० १० गी० २८], (५) व्याघ्र व्याल क्रूर, क्रूरतर क्रोध, बोध रोधक हा । क्रोधवशासि विलोकुनि बहु म्हणति स्वहिततत्वशोधक हा. ॥ [वनपर्व-अ० २ गी० ५५ पृ० २०], (६) तरि कर्णाला आज्ञा द्या तो त्या पांडवांसि मारील । मारी लक्षहि न तदिषुहुनि अधिक प्राणिजात सारील ॥ [भीष्मपर्व-अ० १० गी० १६], (७) म्हणतां तुम्हिच जपावें पार्थिववपुपरिस बहु यशोदेहा । सन्मतिस यशःसंग्रह सर्वस्वाधिक जसा यशोदे हा. ॥ [भीष्मपर्व-अ० ११ गी० ३३]. | १२६ |

# ३. मूळग्रंथाचें शुद्धिपत्र.

| गीति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| | | **३२. आद्यार्यारामायण.** | | |
| ४ | १ | शत्रुघ्न | शत्रुघ्न | १ |
| ८ | ,, | नवा सवारंभा | नवा सवारंभा | २ |
| १८ | २ | 'हा वनीं केलें' | 'हा' वनीं केलें | ३ |
| ३० | १ | अवश्यशब्दच | अवश्य शब्दच | ४ |
| ३२ | ,, | अंगरांग माल्यें | अंगरांग माल्यें | ,, |
| ३६ | ,, | छदालयीं | च्छदालयीं | ,, |
| ३९ | ,, | 'वेड्ये | 'वेड्ये ! | ,, |
| ४२ | २ | दुर्जनदंडी | दुर्जनदंडीं | ,, |
| ५४ | १ | ज्ञातस्त्रीकाम | ज्ञात स्त्रीकाम | ६ |
| ५८ | ,, | हरुं | हरूं | ,, |
| ६१ | २ | गमे ना | गमेना | ,, |
| ६८ | ,, | पोतमुखींचा | पोत मुखींचा | ७ |
| ८७ | ,, | दे सागरीं तोयें | दे सागरीं तोय | ८ |
| ९६ | ,, | रडे | उडे | ९ |
| ९९ | १ | जन्म कर्म | जन्मकर्म | १० |
| १०१ | ,, | प्रभुमार्गण गरुड पवनवेगा | प्रभुमार्गणगरुडपवनवेगा | ,, |
| ११० | २ | राज्याची | राजाची | ११ |
| १११ | ,, | निजहंसा | निजहंसां | ,, |
| ११२ | ,, | कोटी, प्रभु | कोटिप्रभु | ,, |
| १२५ | १ | अरिनीं–मनीं–तो | अरिनीं–मनीं,—तो, | १२ |
| १२७ | २ | दहना—दिधले | दहना!–दिधलें | ,, |
| १३८ | ,, | खळबळ | खळ बळ | १३ |
| १४० | १ | सेनातें | सेनांतें | ,, |
| १४६ | २ | घटकर्ण करी | घटकर्णा करि | १४ |
| १४९ | १ | तत्कर्ण घ्राण | तत्कर्णघ्राण | ,, |
| १५१ | ,, | तरुनीं | तरुंनीं | ,, |
| १५२ | ,, | सुग्रीव बळा | सुग्रीवबळा | ,, |
| १५३ | ,, | छेदी | च्छेदी | ,, |

| गीति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| १७३ | १ | नें हो | नें हो | १६ |
| १७५ | ,, | दशास्य भंगातें | दशास्यभंगातें | ,, |
| १९४ | २ | सुखवी–रक्षी | सुखवीं–रक्षीं | १८ |
| २२४ | ,, | अज रामरायाच्या | अजरामरायाच्या | २० |
| २२५ | १ | वदान्य 'संप | वदान्यसंप ' | २१ |
| २२९ | ,, | छात्र | च्छात्र | ,, |

## ३३. मंत्रगर्भसाकीरामायण.

| गीति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| १० | १ | अजजनकाची | अज जनकाची | २५ |
| ६ | २ | आधिजनस्था | आधि जनस्था | २६ |
| १२ | १ | 'नम्रा स्पर्शुनि हनु हो | 'नम्रा' स्पर्शुनि हनु, 'हो | २७ |
| ३ | २ | सप्तसाल | सत्पताल | ,, |
| ६ | १ | कार्या.' | कार्या. | २८ |
| ,, | २ | आर्या—प्रभुभार्या | 'आर्या–प्रभुभार्या' | ,, |
| १३ | ,, | हरि ज्याचा | हरी ज्याच्या | ३१ |

## ३४. पंचशतीरामायण.

| गीति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| ३ | २ | खळजनता शासनरस | खळजनताशासनरस | ३२ |
| ३५ | १ | घेइ | घेई | ३७ |
| ४४ | ,, | न कळे | न वळे | ३८ |
| ६९ | ,, | दर्शन सर | दर्शनसर | ४० |
| ७५ | ,, | 'निभय—राहें' | 'निर्भय'—'राहें' | ४१ |
| ८७ | २ | रमवि न–गमवि न–जाणे | रमविन–गमविन–जाणें | ४२ |
| १०८ | १ | सर्वाहि–संता | सर्वांहि–संतां | ४५ |
| ११० | २ | हरिच्या | हरिच्या | ,, |
| ११२ | १ | तिला रोधूनि नभा जीनें | तिला, रोधूनि नभा, जीनें | ,, |
| ,, | २ | भाजीन.' | भाजीन? | ,, |
| १५८ | १ | किष्किंधेप्रति | किष्किंधेप्रति | ४९ |
| २१५ | ,, | उडुनीं | उडुनी | ५७ |
| ,, | २ | उडुंनी | उडुनीं | ,, |

| गीति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| २३७ | १ | षष्टि | षष्ठि | ६० |
| २७७ | २ | नगरी | नगरीं | ६५ |
| ३०५ | १ | भीउन | भिउनी | ६७ |
| ३१२ | ,, | लांब रुंद | रुंद, लांब | ६९ |
| ३२१ | ,, | वेढी | वेढी, | ७० |
| ,, | २ | कोट म्हणे तीन | कोट, म्हणे ती न | ,, |
| ३३० | १ | जा | गा | ७१ |
| ३३४ | २ | वदनाहीं | वदनांहीं | ७२ |
| ३४८ | ,, | सेनाहीं | सेनांहीं | ७३ |
| ३९३ | ,, | देवादिजना | देवादिजनां | ७९ |
| ४०६ | १ | गावें | गांवें | ८० |
| ,, | २ | गांवें | गावें | ,, |
| ४३२ | ,, | उडूनीं | उडूंनीं | ८४ |
| ४३३ | ,, | आज्यातें | आजातें | ,, |
| ४४३ | ,, | प्रभुयश | प्रभु यश | ८५ |

## ३५. दोहारामायण (प्रथम).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १९ | १ | छात्र | च्छात्र | ९५ |
| ,, | २ | आशीपात्र | आशीःपात्र | ,, |
| ६० | ,, | करिता | करितां | ९९ |
| ८० | १ | उठलें | उठले | १०१ |

## ३६. दोहारामायण (द्वितीय).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ | २ | छेदवी | च्छेदवी | १०१ |
| २४ | १ | ती | तो | १० |
| ३० | ,, | उटजाबाहेर, | उटजाबाहेर? | ,, |
| ,, | २ | पुरे आंत, प्रिया! | पुरे, आंत प्रिया | ,, |
| ४७ | ,, | हतभ विकपिसा | हतभविक पिसा | १० |
| ५९ | ,, | विभुजय पद्म भ्रमरांत | विभुजयपद्मभ्रमरांत | ११ |
| ७१ | १ | छळीं | च्छळीं | ११ |

| ओति. | अर्ध. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|
| | | **३७. सौम्यारामायण.** | | |
| ३० | २ | रणभय | रणभव | ११७ |
| ४२ | ,, | वनमधु शमधनजनहृदयभवन | वनमधुशमधनजन हृदयभवन | ११८ |
| | | **३८. कल्याणरामायण.** | | |
| ८ | १ | मागें | मागे | ११९ |
| २३ | ,, | धाव | धांव | १२१ |
| ३५ | ,, | शबरी यश | शबरीयश | १२२ |
| ,, | ,, | वरी | व्ररी | ,, |
| ४७ | २ | म्हणे, दिलें | कथि,'दिधलें (असा पाठ असावा) | १२३ |
| ४८ | ,, | स्तव नव संता | स्तवन वसंता | १२४ |
| ,, | ,, | तो यास्तव न वसंता | तोयास्तव नव संता | ,, |
| ७२ | ,, | प्रभुवर बिभीषणा | प्रणत बिभीषण त्या (असा पाठ असावा) | १२६ |

# ४. टीपांचें शुद्धिपत्र.

| टीप. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| १६ | नृप (राम) | नृप (दशरथ) | ३ |
| १० | =नीच+राक्षस | =राक्षस+नीच | ५ |
| ३ | 'हाय म्हणे' | 'हाय' म्हणे | ६ |
| १६ | 'कठारे | कठोर | ,, |
| ९ | बालकमुखींचा | बालक | ७ |
| १ | अध्याय ५७ | सर्ग ५८ | ९ |
| ६ | तिला ताप दे | मला ताप दे | ,, |
| १९ | असे रामलक्ष्मण | असा मारुति | १४ |
| ११ | पृथ्वी | पृथ्वीवर | २० |
| १५ | सर्व टीप रद्द | राम | २५ |
| १२ | दुष्टजनांचा समुदाय | अमृतापेक्षां स्वजनाचें शासन हाच रस अधिक मान पावेल. | ३२ |
| ९ | श्रीकटाक्षेण | स्त्रीकटाक्षेण | ३३ |
| ,, | गंघसार | गंधसार | ,, |
| १० | नवरजोनार्यां | नवरजो नार्यां | ,, |
| १४ | भुला [असे] | भुला [असें] | ३५ |
| १४ | [अध्याय ९] | [सर्ग ९] | ३७ |
| ७ | याचा भावार्यः- | याचा भावार्थः- | ३९ |
| ९ | सत्वनिवृत्ति | स्वत्वनिवृत्ति | ४२ |
| १४ | कामकत्व | कामुकत्व | ४६ |
| ,, | जा [शरण ये] असा अर्थ दिसतो | गा (स्तवन कर) | ७१ |
| २२ | जय ज्ञाला | जय झाला | ८९ |
| १९ | देशांत होतो | देशांत होता | ९८ |
| १३ | २३ | १३ | १० |
| ९ | हरि (वानर) | हरि (इंद्र) | ११ |
| ,, | वानररूप वणव्याला | इंद्ररूप वणव्याला | ,, |

KÂVYASANGRAHA. 18.

# THE RÂMAYÂṆAS

OF

# MOROPANTA

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

*'The Râmâyaṇa is the only poem which inspires our breasts with a love of goodness in the entire sense of the word.*

*R. T. H. GRIFFITHS, M. A.*

## PART IV.

Containing 4 Râmâyanas.

(39-42)

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

AND

S'IVARÂMA TÂNBÂ DUBE, B. A.

FIRST ASSISTANT MASTER, NEILL CITY HIGH SCHOOL, NAGPORE.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1896.

*Price 2½ Rupees.*

काव्यसंग्रह. १८.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# रामायणें.

## भाग चवथा.

(३९-४२)

अष्टोत्तरशत केलीं जेणें **रामायणें** पृथग्रस तीं, ।
भारत भागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं. ॥

हा

**वामन दाजी ओक,**

हेडमास्तर, हायस्कूल, रायपूर;

व

**शिवराम तानबा दुबे, बी. ए.**

फर्स्ट असिस्टन्ट मास्तर, नील सिटी हायस्कूल, नागपूर,

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन
आणि चार परिशिष्टें जोडून तयार केला.

तो

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९६.

किंमत २॥ रुपये.

महाराष्ट्र भाषेचें आणि कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं पाहणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करतों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.



# परिशिष्टें.

## सूचना.

हा भाग तयार करण्याच्या कामीं आम्हांस अनेक 'काव्यसंग्रह'हितैषी जन मनापासून साहाय्य केलें. रा० रा० दत्तात्रय घनश्याम सबनीस, सदाशिव मोरे भिडे, नागनाथ केशव गोडबोले; केशव विश्वास फणसे; मोरो गणेश लोंढे, राम विष्णु सोमण; गोविंद विष्णु श्रीखंडे, प्रो० श्रीधर विष्णु परांजपे, बी० ए० नागपुरास असणारे आमचे जुने विद्यालयीन वयस्य यांनीं अर्थनिर्णायक टीपांतील दे छापील प्रतींतील अशुद्धें, दुर्बोध पद्यांचा अर्थ इत्यादि प्रकरणीं मार्मिक लेख पाठ साहाय्य केलें यास्तव या सकल सज्जनांचे फार फार आभार मानून व 'वारंवार अश मदत करावी' असें सविनय सुचवून हा लेख पुरा करितों.

'काव्यसंग्रह'कार.

# मोरोपंतकृत रामायणें.

## भाग चवथा.

## ३९. अनुष्टुब्रामायण.[1]

(अनुष्टुभ् वृत्त.)

### बालकांड.

श्रीश ब्रह्मादि देवांहीं करुनि स्तुतिवंदन, ।
प्रार्थितां रावणवधा होय दशरथनंदन.[2] ॥ १
कौसल्या प्रसवे रामा, कैकेयी भरता सती, ।
जी सुमित्रा लक्ष्मणाख्या[3] शत्रुघ्नाव्हा[3] सुतास ती. ॥ २
राम लक्ष्मण मागोनि ने, ज्या गाधिज नाम, हा, ।
ज्यांच्या नामें न संसारीं बाधे आधि[4] जना महा. ॥ ३
अस्त्रें दे शत, अत्युग्रा ताटका[5] पर मारवी, ।

---

१ या काव्याचें वृत्त 'अनुष्टुभ्' आहे म्हणून यास **'अनुष्टुब्रामायण'** असे नांव दिलेलें आहे. या वृत्ताचें लक्षण श्रीक्षेमेंद्रकृत 'सुवृत्ततिलक' नामक ग्रंथांत आहे तें येथें देतों:—'पंचमं लघु सर्वेषु सप्तमं द्विचतुर्थयोः । गुरु षष्ठं च सर्वेषामेतच्छ्लोकस्य लक्षणम् ॥ १४ ॥ असंख्यो भेदसंसर्गादनुष्टुप्छन्दसां गणः । तत्र लक्ष्यानुसारेण श्रव्यतायाः प्रधानता ॥ १५ ॥' (सुवृत्ततिलक–प्रथम विन्यास), 'अनुष्टुप्छन्दसां भेदे कैश्चित्सामान्यलक्षणम् । यदुक्तं पंचमं कुर्याल्लघु षष्ठं तथा गुरु ॥४॥ तत्राप्यनियमो दृष्टः प्रबंधे महतामपि । तस्मादव्यभिचारेण श्रव्यतैव गरीयसी ॥ ५ ॥' (सुवृत्ततिलक–द्वितीय विन्यास). याचा भावार्थ:–अनुष्टुप्छंदाच्या प्रत्येक पादांत पांचवें अक्षर लघु आणि सहावें अक्षर गुरु असावें; द्वितीय आणि चतुर्थ पादांचें सातवें अक्षर नित्य लघु असावें. हें या छंदाचें सामान्य लक्षण आहे. याचे असंख्य भेद आहेत आणि मोठमोठ्यांच्या प्रबंधांत पूर्वोक्त सामान्य लक्षणाचें उल्लंघन केल्याचें आढळतें, तथापि प्रत्येक पादाचें पंचम अक्षर लघु आणि षष्ठ अक्षर गुरु असावें हा नियम अवश्य पाळला पाहिजे. श्रुतिसुखत्व अथवा सुश्रव्यत्व हेंच या छंदाचें प्रधानलक्षण होय. या काव्यांत कोणतीही चित्ररचना साधावयाची नसल्यामुळें हें पंतांच्या इतर रामायणांपेक्षां बरेंच सुरस, मनोहर आणि सुबोध उतरलें आहे. २. दशरथपुत्र. ३. आख्या=आव्हा=नाम. ४. मनोव्यथा. ५. ताटका ही सुकेतु नामक यक्षाची कन्या होती. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु, असे दोन पुत्र झाले. विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकाळीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीच उडून समुद्रांत जाऊन पडला तेव्हांपासून तो लंकेंत जाऊन राहिला. (भा० प्रा० ऐ० कोश.)

स्ववंशजप्रभुजयें[1] धरि भा[2] परमा रवी. ॥ ४
विघ्नकर्ते प्रभु पुढें टिकले न खर[3] क्षण, ।
श्रीलक्ष्मणाग्रजें केलें लीलेनें मखरक्षण[4]. ॥ ५
रामें लावुनि पायाच्या रजाच्या पवना[5] शिला ।
अहल्या[6] तारिली, श्रोत्यांगात्यांचा भव[7] नाशिला. ॥ ६
भंगी भर्गधनुष्यातें[8], मनुष्यां तें न पाहवे, ।
वाहवे न सुरां दैत्यां, गुणध्वनि[9] न साहवे. ॥ ७
ज्यां[10] माता भूमि, तें कन्यारत्न देऊनि सादरें, ।
जामात जनकें केला, त्यजिलीच रसा[11] दरें[12]. ॥ ८
सीता देउनि रामा, दे लक्ष्मणा मग ऊर्मिळा, ।
दिल्या भरतशत्रुघ्ना बंधुच्या दोन[13] दुर्मिळा[14]. ॥ ९
भजोनि परधर्मा[15] जी[16] उग्रा भार्गवराम ती ।
श्रीरामाच्या पुण्यतेजें लावी मार्गवरा मती[17]. ॥ १०
म्लानि[18] कंटक हे दोष सारसा केतका, पुरा[19] ।
त्या न, तें स्वयशें हांसे सार साकेत कापुरा. ॥ ११

---

१. स्ववंशांत उत्पन्न झालेल्या प्रभूच्या (रामाच्या) जयामुळें. २. शोभा, कांति. ३. खरप्रमुख चवदा हजार राक्षस. ४. यज्ञसंरक्षण. ५. पवन=वायु. ६. अहल्या ही गौतममुनीची पत्नी. हिचें इंद्रानें धर्षण केलें, म्हणून तिला 'तूं शिला होशील' असा शाप मुनीनें दिला. पुढें हिच्या प्रार्थनेवरून 'दाशरथी रामाच्या पदरज:कणानें तुझा उद्धार होईल' असा उ:शाप दिला. त्याप्रमाणें रामानें तिचा उद्धार केला—अशी कथा आहे. ७. संसार. ८. महादेवाच्या धनुष्यातें. ९. प्रत्यंचेचा आवाज. १०. ज्या कन्यारत्नाला भूमि माता आहे तें कन्यारत्न. ११. पृथ्वी. १२. भयें. १३. दोन कन्या. (मांडवी आणि श्रुतकीर्ति.) १४. दुर्लभ अशा. १५. पराच्या (दुसऱ्याच्या, विप्राहून अन्याच्या=क्षत्रियाच्या) धर्मा. १६. जी मति उग्रा झाली ती. १७. उत्तममार्गा.परधर्मा भजोनि जी मति उग्रा (तीव्रा—भयंकरा) [झाली] ती (मति) भार्गवराम (परशुराम) श्रीरामाच्या पुण्यतेजें उत्तम मार्गाला लावी. १८. म्लानि (निस्तेजपणा—कोमेजून जाणें) हा सारसा (कमळाला) दोष आहे, कंटक (कांटे) हा केतका (केवड्याला) दोष आहे. [परंतु] हे दोष त्या पुरा (अयोध्येला) न (नव्हते.) त्या अयोध्यानगरींत म्लानि (गरिबी) आणि कंटक (दुष्ट लोक) नव्हते—असा भाव. तें सार (श्रेष्ठ) साकेत (अयोध्यानगर) कापुरा स्वयशें हांसे=कापुरापेक्षां अयोध्यानगराचें यश अधिक शुभ्र होतें. १९. अयोध्येला. २०. हें 'संदष्टक' नामक यमकाचें उदाहरण आहे. जेव्हां द्वितीय पाद चतुर्थ पादीं आवृत्त होतो तेव्हां त्या यमकाला 'संदष्टक' असें म्हणतात. ['प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति ॥' काव्यालंकार—अध्याय ३ श्लोक ७.] याप्रकारचीं यमकें पंतांच्या काव्यांत अनेक आहेत.

## अयोध्याकांड.

यौवराज्याभिषेक स्वज्येष्ठपुत्रीं करावया ।
राजा योजी, गुरु म्हणे, 'हा विचार बरा वेया.' ॥ १२
मागे स्ववर कैकेयी [3]मंथराभिन्नधी, 'रतो ।
मनुवर्षें वनीं राम' जाहला खिन्न धीर तो. ॥ १३
पुत्रराज्यार्थ करितां प्रियेनें अंतराय हा, ।
सत्यपुत्रप्रेमपाशीं म्हणे तो [6]संतराय 'हा!' ॥ १४
श्रीसत्यधर्म रक्षाया सोडिली सत्वर [8]क्षिती, ।
कीं [9]साधुपुत्र ताताचें सर्वस्वें सत्य रक्षिती. ॥ १५

---

१. वसिष्ठ. २. वयोमानानें पाहिलें असतां. ३. मंथरेनें भिन्न (बिघडविलेली आहे) धी (मति), जीची ती. मंथरेच्या उपदेशानें जिच्या मतींत बदल अथवा फितूर झाला ती. मंथरा ही विरोचनकन्या. रावणवधरूप देवकार्य साधण्यासाठीं देवांनीं या कुब्जावेषधारिणी अप्सरेला केकयराजाकडे पाठविलें होतें. केकयराज अश्वपति यानें दासी म्हणून हिला कैकयीपाशीं ठेविलें होतें. (सर्ग ७ श्लोक १-३० पहा.) ४. चवदा वर्षें. मनु=हा शब्द 'चवदा' याचा पर्याय आहे. कारण, मनु एका कल्पांत चौदा होतात. सहा मनु होऊन गेले. प्रस्तुतचा मनु सातवा आहे व पुढें सात मनु व्हावयाचे आहेत. प्रत्येक मनूच्या कालसत्तेस 'मन्वंतर' असें म्हणतात. ४३,२०,००० मानुष वर्षांनीं एक मन्वंतर होतें आणि अशा चौदा मन्वंतरांनीं ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. या चौदा मनूंचीं नांवें:—(१) स्वायंभुव, चैत्र शुद्ध ३ चंद्रवार, कृत्तिका नक्षत्र. (२) स्वारोचिष, चैत्र शु० १५ बुधवार, चित्रा नक्षत्र. (३) औत्तमि, ज्येष्ठ शु० १५ बुधवार, ज्येष्ठा नक्षत्र. (४) तामस, आषाढ शु० १० शुक्रवार, स्वाती नक्षत्र. (५) रैवत, आषाढ शु० १५ शुक्रवार, उत्तराषाढा. (६) चाक्षुष, श्रावण वद्य ८ रविवार, रोहिणी. [इतके मनु झाले.] (७) वैवस्वत, भाद्रपद शु० ३ शुक्रवार, हस्त. [हा चालू मनु आहे]. (८) सावर्णि, आश्विन शु० ९ रविवार, श्रवण. (९) दक्षसावर्णि, कार्तिक शु० १२ गुरुवार, उत्तराभाद्रपदा. (१०) ब्रह्मसावर्णि, कार्तिक शु० १५ सोमवार, कृत्तिका. (११) धर्मसावर्णि, पौष शु० ११ शनिवार, रोहिणी. (१२) रुद्रसावर्णि, माघ शु० ७ मंगळवार, अश्विनी. (१३) देवसावर्णि (रौच्यसावर्णि) फाल्गुन शु० १५ गुरुवार, उत्तराफाल्गुनी. (१४) इंद्रसावर्णि, फाल्गुन व० ३० मंगळवार, रेवती. [हे शेवटचे सात मनु यापुढें यावयाचे आहेत.] ५. विघ्न. ६. साधुश्रेष्ठ. ७. हाय. ८. पृथ्वी, राज्य. ९. उत्तम पुत्र. हें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. विशेष गोष्ट सांगून तिला बळकटी आणण्यासाठीं म्हणजे तिचें समर्थन (दृढीकरण) करण्यासाठीं सामान्य गोष्ट सांगितली म्हणजे 'अर्थांतरन्यास' झाला. बापाचें वचन पाळण्यासाठीं रामानें राज्य सोडून दिलें तें ठीकच केलें अशी गोष्ट सांगून त्यावरून त्याच्या समर्थनासाठीं 'सत्पुत्र सर्व संपत्तीची हानि पत्करून बापाचें सत्य राखतात' अशी सामान्य गोष्ट (असा सामान्य नियम) सां-

सीतालक्ष्मणसंयुक्त श्रीराम प्रभु सद्रसें ।
गुरुतें वंदुनि निघे, वन मानुनि भद्रसें. ॥ १६
वदले वल्कलधरा रामा पाहोनि 'हा!' यती; ।
म्हणे अयोध्या निश्रीका शोका वाहोनि 'हाय!' ती. ॥ १७
राजाज्ञतें सुमंत्रे तो रथीं प्रार्थूनि वाहिला; ।
शृंगवेरीं प्रियसखें गुहकें साश्रु पाहिला. ॥ १८
जटा रचुनि दे आज्ञा सुमंत्रा 'परतें' असी. ।
त्यास होय प्रिय हित प्रभूक्त पर तें असी. ॥ १९

---

गितलीं आहे. केव्हां केव्हां आधीं सामान्य गोष्ट सांगून नंतर तिच्या समर्थनासाठीं विशेष गोष्ट सांगितली असते तेव्हां ही 'अर्थांतरन्यास' होतो. याचें लक्षण:—'सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते। यत्र सोऽर्थांतरन्यास: साधर्म्येणेतरेण वा ॥' [काव्यप्रदीप—दशम उल्लास—कारिका २३—काव्यमाला-पृ० ४१३.] या अलंकारांत 'जें झालें तें ठीक झालें, तें तसेंच व्हावयाचें किंवा व्हावें अथवा करावें, तसें करणें अथवा होणें हा सामान्य नियम आहे' असें प्रतिपादन केलेलें असतें. या अलंकाराचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत:—'दुर्बुद्धि आवडे मूढा, गाढवा जेंवि गाढवी.' [अनुष्टुभ्रामायण—श्लो० ४४.]

१. मोठ्या प्रेमानें. २. मंगलप्रद. ३. अयोध्या=अयोध्यावासीजन हें उपादानलक्षणेचें उदाहरण आहे. या उपादानलक्षणेची व्याख्या विश्वनाथकविराजानें 'साहित्यदर्पणां'त अशी केली आहे:—'मुख्यार्थस्येतराक्षेपो वाक्यार्थेऽन्वयसिद्धये । स्यादात्मनोऽप्युपादानादेषोपादानलक्षणा ॥' [परिच्छेद २।१४], 'स्वसिद्धये पराक्षेप: परार्थं स्वसमर्पणम् । उपादानं लक्षणं चेत्युक्ता शुद्धैव सा द्विधा ॥ ५ ॥' [काव्यप्रकाश—द्वितीय उल्लास]. भावार्थ:—ज्या लक्षणेनें वाक्यार्थाचा अन्वयबोध व्हावा म्हणून शब्दांच्या मुख्यार्थासह त्या मुख्यार्थानें सूचित केलेला इतर अर्थ याचें ग्रहण करतात तिला 'उपादानलक्षणा' म्हणतात. शक्यार्थाच्या सिद्धीसाठीं अशक्यार्थाचें उपस्थान करणें आणि अशक्यार्थाच्या सिद्धीसाठीं शक्यार्थाचें समर्पण (त्याग) करणें याला 'उपादान लक्षण' असें म्हणतात. यावरून जेव्हां स्वार्थाचा परित्याग न करतां पदार्थाची उपस्थिति होते तेव्हां ती उपादानलक्षणा होय. या लक्षणेच्या विवेचनांत 'श्वेतो धावति' म्हणजे 'पांढरा धांवतो' (पांढरा घोडा धांवतो), 'कुंता: प्रविशन्ति' म्हणजे 'भाले शिरतात' (भालेवाले शिपाई शिरतात), अशी उदाहरणें दिलीं आहेत. या लक्षणेस 'अजहत्स्वार्था लक्षणा' असेंही म्हणतात. मूळ लक्षणेचे भेद दोन:—शुद्धा आणि गौणी. शुद्धेचे भेद दोन:—उपादानलक्षणा व लक्षणलक्षणा; या प्रत्येकीचे दोन भेद:—सारोप व साध्यवसना; यावरून शुद्ध लक्षणेचे चार भेद झाले. गौणी लक्षणेचे दोन भेद:—सारोप व साध्यवसना. याप्रमाणें लक्षणा षड्विध आहे. ४. शोभारहित. ५. डोळ्यांत अश्रु (आसवें) आणून. ६. रामवचन. ७. परंतु. ८. खड्ग.

